# धांवत्या जगाविषयीं



पंडीत जवाहरलाल नेहरू यांच्या "धांवत्या जगा"चा (Glimpses of world History) हा प्रथम खंड वाचकांच्या हातीं देतांना आम्हांस आनंद वाटत आहे.

धांवतें जग पंडीतजींनीं आपल्या लाडक्या मुलीला उद्देशून पत्रमालेच्या रूपानें लिहीलें असून, त्या दृष्टीनें त्यांत पितृहृदयाचा नैसर्गिक जिव्हाळा फुललेला दिसेल. परंतु "धांवतें जग" म्हणजे सामान्य अर्थानें इतिहास नव्हे. खुद्द पंडीतजींचीही या ग्रंथाला इतिहासविषयक पुस्तकांत स्थान मिळावें, अशी अपेक्षा नाहीं. पंडीतजींना वेळोवेळीं तुरुंगामध्यें जो रिकामा वेळ मिळे त्याचा उपयोग करावा, स्वतःच्या मनाला विरंगुळा मिळावा व त्याच बरोबर आपल्या कन्येच्या मनांतही जागतिक इतिहासाची आवड उत्पन्न व्हावी, या हेतूनें त्यांनीं ही पत्रमाला लिहावयास घेतली. या ग्रंथाबाबतचें आणखीही एक वैशिष्ठ्य लक्षांत घेण्याजोगें आहे व तें म्हणजे त्यांत पंडीतजींचा स्वभाव पहावयास मिळतो. जवाहरलालजींची लेखनशैली आत्मनिष्ठ (Subjective) आहे. ठरावीक वेळेच्या आपल्या ठराविक मनोव्यापारांची

वाचकांना बरोबर कल्पना आणून देण्याची जवाहरलालजींची हातोटी असामान्य आहे. "धांवतें जग" याचकरितां, एकाद्या कादंबरीपेक्षांही मनोरंजक झालें आहे.

स्वत: जवाहरलाल नेहरू हे समाजसत्तावादाचे महान पुरस्कर्ते व अत्यंत पुरोगामी विचारसरणीचे आहेत. मानवी इतिहास, विवक्षीत काळ सोडला, तर सारखा प्रगतीपथावरून पुढें पुढें धांवत आहे, असें त्यांना वाटतें. प्रत्येक गोष्टीकडे ते चिकित्सक दृष्टीनें पहातात. जवाहरलाल नेहरूंची दृष्टी चिकित्सक असली तरी सहानुभूतिशून्य नाहीं. गतकाळाचें सिंहावलोकन करतांना त्यांना गुणदोष दिसून आले; पण दोष पहातांना, कठोर दृष्टीकोन न ठेवतां, त्यांनीं त्याकडे सहानुभूतीच्या दृष्टीनेंच पाहिल्याचें दिसून येईल. एच. जी. वेल्स यांनीं आपल्या Outlines of World History या ग्रंथांत स्वीकारलेला चिकित्सक पण कठोर दृष्टीकोन व जवाहरलाल नेहरूनीं स्वीकारलेला मार्मिक व सहृदय दृष्टीकोन यामधील भेद वाचकांच्या नजरेंत चटकन आल्यावांचून राहात नाहीं. जवाहरलालजींच्या मतें, आजच्या जगाकडे सनातनी दृष्टीकोनांतून पहाणें जसें चुकीचें ठरेल, तसेंच इतिहासकाळांतील गोष्टींना आधुनिक निष्कर्ष लावणेंही अयोग्य ठरेल.

" धांवतें जग " हें जवाहरलालजींच्या विविशीत मनोव्यापारांचें प्रतिबिंब आहे इतकें सांगितल्यावर, त्यांत पंडितजींनी आपल्याला प्रिय असणाऱ्या गोष्टींची थोडी सविस्तर चर्चा करावी व नको असलेल्या गोष्टींचा केवळ ओझरता उल्लेख करावा, हें अपरिहार्य होय. परंतु साकल्यानें विचार केला तर असें आढळून येईल कीं, इतिहास-काळांतील महत्वाच्या व दूरगामी अशा सर्व गोष्टींचा त्यांत उहापोह करण्यांत आला आहे. इतिहास म्हणजे थोड्याफार व्यक्तींच्या किंवा राजेरजवाड्यांच्या हालचालींची जंत्री नसून, मानवी चळवळींची प्रगति, असें जवाहरलालजी मानतात. " धांवत्या जगां "तून कांहीं व्यक्तींचा उल्लेख आला नसेल; पण मानवी समाजावर परिणाम करणारी अशी कोणतीही गोष्ट घडलेली दिसत नाहीं कीं, जिचा त्यांनीं परामर्ष घेतलेला नाहीं.

जवाहरलालजींनीं कु. इंदिरा नेहरू यांना लिहलेलीं हीं पत्रें आज वाङ्मयांत अमर होऊन राहिलेली आहेत. जणूं काय आपल्या कन्येची मूर्ति हृदयांत साठवून जवाहरलालजींनीं तीं साऱ्या बालबालिकांना उद्देशून लिहिलीं आहेत, असें वाटतें. भाषा सुबोध, शब्दरचना सुटसुटीत, जिव्हाळ्यानें ओथंबलेली विचारसरणी व उपदेशाचा संपर्कही नाहीं, असें

" धांवत्या जगा "चें थोडक्यांत वर्णन करतां येईल. प्रत्येक व्हान मुलांमुलींच्या हातांत, त्यांच्या शिक्षणाच्या दृष्टीनें आवश्यक असा हा ग्रंथ दिला गेला पाहिजे. मोठ्या माणसांनींही " धांवतें जग " जरूर नजरेखालून घालावें. आपल्याला शिकण्याजोग्या कितीतरी गोष्टी त्यांत असल्याचें त्यांना आढळून येईल.

शेवटीं, या ग्रंथाच्या प्रकाशनाच्या व अनुवादाच्या बाबतींत आम्हाला वेळोवेळीं मदत केल्याबद्दल श्री. खांडेकर, श्री. अनंत अंतरकर, श्री. वरेरकर, श्री. कमतनूरकर, श्री. एस्. बी. चिटणीस, श्री. चित्रकार दलाल, श्री. एम्. बी. चिटणीस, श्री. प्र. ह. खाडीलकर, श्री. व्ही. जी. सचनीस, श्री. आर. एम्. माणगांवकर, श्री. एस्. व्ही. कुरणे व श्री. अ. वा. मराठे यांचे आम्हीं मनःपूर्वक आभार मानतो.

—अनुवादक

# धांवतें जग



[ पं० जवाहरलाल नेहरू यांच्या Glimpses of world History या पुस्तकाचा अनुवाद ]

## भाग पहिला

# वाढदिवसानिमित्त लिहिलेलें पत्र

(प्रियदर्शिनी इंदिरा हिला
१३ व्या वाढदिवसानिमित्त लिहिलेलें पत्र)

मध्यवर्ति तुरुंग, नैनी
२६ आक्टोबर १९३०

दरवर्षी तुला तुझ्या वाढदिवसानिमित्त पुष्कळ भेटी येतात. तुझं अभिष्ट चिंतन होतं. मी आजही तुझं मुक्त कंठानं अभिष्ट चिंतन करूं शकेन; पण या तुरुंगातून मी तुला कसली भेट पाठवूं शकणार! माझ्या भेटी फारशा पार्थिव अगर भरीव नसल्या तरी दयाळू देवतेप्रमाणं त्या मनोमय अंतःकरणाच्या कळकळीनं भरलेल्या असणार आणि तुरुंगांतील उंच भिंती त्यांना प्रतिबंध करूं शकणार नाहींत.

इंदू, प्रवचन झोडणं अगर उपदेश करणं या दोन्ही गोष्टींचा मला तिटकारा आहे हें तूं जाणतेसच. तथापि जेव्हां कां मला उपदेश करण्याचा मोह होतो; तेव्हां मी पूर्वी एकदां वाचलेल्या एका अतिशहाण्या माणसाची गोष्ट आठवतो. कदाचित् ही गोष्ट ज्या पुस्तकांत आहे तें पुस्तक तूं पुढं वाचशील. १३०० वर्षांपूर्वी, ज्ञानार्जनाच्या उद्देशानं चीनचा एक महान् प्रवासी हिंदुस्थानांत आला. त्याचं नांव ह्युएन त्सँग. त्यावेळीं प्रवास करणं किती धोक्याचं असे! वाटेंत किती अडथळे नि संकटे येत! पण ह्युएन त्सँगची ज्ञानलालसा फार जबर होती. त्यानं संकटांना दाद दिली नाहीं. उत्तरेकडील उत्तुंग पर्वत नि वाळवंट ओलांडून तो हिंदुस्थानांत

आला. हिंदुस्थानांत त्यानं पुष्कळ वर्षं घालविलीं. विशेषतः पाटली-पुत्राजवळील नालंद या प्राचीन शहरांतील विश्वविद्यालयांत त्यानं अध्ययन व अध्यापन अशीं दोन्ही कार्यें बरीच वर्षें चालू ठेविलीं होतीं. लवकरच तो तत्कालिन सर्व विद्यांत पारंगत झाला. त्याला कायदेपंडीत ( बौध्द कायदेपंडीत ) ही पदवी प्राप्त झाली. पुढें त्यानं सर्व हिंदुस्थानभर प्रवास करून, या पुरातन देशांतील तत्कालिन लोकांच्या परिस्थितीचा व राहणीचा अभ्यास केला व प्रवास वर्णनंही लिहिलीं. या प्रवास वर्णनांतच, मी वर उल्लेखलेली अतिशहाण्या माणसाची गोष्ट आहे. बिहारमधील सद्यःकालीन भागलपूरच्या आसपास पूर्वी कर्णसुवर्ण नांवाचं शहर होतं. या शहरीं दक्षिण हिंदुस्थानांतील एक विक्षिप्त मनुष्य येऊन गेला. पोटा भोंवती साखळदंड बांधलेला, डोक्यावर जळती मशाल ठेवलेली व हातांत लांबलचक काठी घेतलेली, अशा थाटांत हा मनुष्य गावोगांवीं भटकत असे. पुष्कळजण त्याच्या या तऱ्हेवाईक पेहरावाबद्दल विचारीत तेव्हां तो उत्तर देई, 'माझी विद्वत्ता फार दांडगी आहे. मी जर पोटाभोंवती साखळदंड बांधला नाहीं तर, या विद्वत्तेचं अजीर्ण होऊन माझं पोट फुटेल! नि आज जे अजाण लोक अज्ञानरूपी अंधःकारांत दिवस कंठीत आहेत, त्यांची मला कींव येत असल्यामुळं मी डोक्यावर जळती मशाल धारण केली आहे.'

माझी मात्र खात्री आहे कीं, अतिशय विद्वत्तेन माझं पोट फुटण्याची कधींच पाळी येणार नसल्यामुळं साखळदंड बांधण्याची अगर चिलखत घालण्याची मला जरूरी नाहीं. शिवाय दुसरी गोष्ट म्हणजे माझ्याजवळ जी थोडीबहुत विद्वत्ता आहे ती खास माझ्या पोटांत नाहीं. माझ्या विद्वत्तेचं वास्तव्य कुठं कां असेना, तिथं जादा विद्वत्तेला जागा आहे. ही जागा विद्वत्तेनं संपूर्णतः व्यापिली जाईल, अशी कधीं पाळीच येणार नाहीं. खुद्द

माझीच विद्वत्ता इतकी मर्यादित आहे तर शहाण्या माणसाचं ढोंग तरी मला कसं आणतां येईल नि दुसऱ्यांना उपदेश करण्याचा तरी मला काय अधिकार राहील ? माझी अशी खात्री झाली आहे कीं, खरं कोणतं, खोटं कोणतं, काय करावं नि काय करूं नये, हें शोधून काढण्याचा सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे उपदेशानं भरलेलीं प्रवचन झोडणं हा नसून, संभाषणं व चर्चा करणं हा होय. यामुळें थोडं कां होईना सत्य प्रगट होतं. मी आतांपर्यंत तुझ्याशीं पुष्कळ बोललो आहे व पुष्कळ गोष्टींविषयीं चर्चाहि केली आहे; पण आपलं जग अफाट आहे व जगाच्या पलीकडे इतकीं अनंत विश्वं आहेत कीं, कोणत्याही माणसानं ह्युएन शँगच्या गोष्टीतील मूर्ख माणसाप्रमाणं ' आतां आपण पूर्ण शहाणे झालों, नि नवीन कांहीं शिकावयाचं राहिलं नाहीं, ' अशी कल्पना करून घ्यायाचं कारण नाहीं. शिवाय आपण सर्वज्ञ न होणंच बरं. सर्वज्ञ माणसाला, या जगांत आपल्याला नवीन कांहीं शिकायला उरलं नाहीं, म्हणून उदासीनता वाटण्याचाच संभव फार. असले पूर्ण शहाणे, नवीन शोध, नवीन गोष्टी शिकण्याच्या अगर नवी साहसं करण्याच्या आनंदाला मुकतील. जीवनांत साहसं नसली तर त्यांत स्वारस्य ते काय राहिलं ?

मी उपदेश करण्याच्या कां विरुद्ध आहे, हें तुला आतां समजून येईल. पण उपदेश करायचा नाहीं तर करायचं काय ? पत्र म्हणजे संभाषण नव्हे. चित्राची एक बाजू ती. म्हणून माझ्या पत्रांतून मी तुला उपदेश करतो आहे असं तुला वाटलं तर, तो कडू गोळी प्रमाणें त्याज्य असं समजूं नकोस. जणु काय आपण एकमेकांशीं बोलत आहोत व तुझ्या विचारशक्तीला चालना देणारी मी सूचनाच करीत आहे अशी कल्पना करीत जा.

इतिहासांत आपण राष्ट्रांच्या जीवनांतील महत्वाच्या भागांची, थोर स्त्रीपुरुषांची व त्यांच्या अद्वितीय पराक्रमांची हकिकत वाचतो. साहजिकच त्यांचा आपल्या मनावर परिणाम होतो. आपण जणूं काय त्या काळांतच वावरत आहोंत व त्या काळांतील पराक्रमी स्त्रीपुरुषांप्रमाणं आपण पराक्रम गाजवीत आहोंत, असं आपल्याला वाटतं. जोन डी ' आर्कचं चरित्र वाचतांना, खुद्द तूंच किती रंगून गेली होतीस ! जोन डी ' आर्कप्रमाणं आपणही पराक्रम गाजवावा, अशीही तुझी महत्वाकांक्षा होती. सर्वसाधारण स्त्रीपुरुष फारसे साहसी नसतात. पोटाची विवंचना, मुलंबाळं व घरदार यांतच ते गुरफटलेले असतात. पण एक काळ असा येतो कीं, हे सर्वसाधारण लोकच एका उच्च ध्येयानं प्रेरित होतात. ही साधी माणसंसुध्दां नांव गाजवितात आणि इतिहास अशा स्फूर्तिदायक व युगप्रवर्तक हकिकतींनीं भरून जातो. साध्या लोकांतही चेतना उत्पन्न करून, त्यांना मोठमोठीं कृत्यं करावयास लावण्याचं सामर्थ्य थोर पुढाऱ्यांत असतं खरं.

तूं ज्यावर्षी जन्मलीस, तें १९१७ साल इतिहासांतील संस्मरणीय सनांपैकीं एक आहे. गरीब व पददलित जनतेविषयीं सहानुभुति व कळवळा असणाऱ्या एका महान् पुढाऱ्यानं या सालीं आपल्या बांधवांना, इतिहासांतील एक उदात्त व कधींही विस्मृति न पडणारा असा भाग लिहावयास लाविला. लेनिन हे या पुढाऱ्याचं नांव. तूं १९१७ च्या ज्या महिन्यांत जन्मलीस, त्याच महिन्यात लेनिननं रशियन राज्यक्रांतीला आरंभ केला व रशिया—सैबिरिया यांचं स्वरूप थोड्या अवधींत बदलून टाकलं. आणि आज हिंदुस्थानांतहि, लेनिनसारखाच पीडिताविषयीं कळवळा असलेला व त्यांना मनापासून मदत करूं इच्छिणारा दुसरा एक महान पुढारी आहे. या पुढाऱ्यांनं आपल्याला उदात्त त्यागाची शिकवण दिली असून,

महान् कार्य करण्याची स्फूर्ति आपल्यांत उत्पन्न केली आहे. त्याच्यायोगे आपण निःसंशय स्वतंत्र होऊं व भुकेल्या, गरीब व पददलित जनतेचा असह्य झालेला भार हलका करूं यांत संशय नाहीं. आज बापूजी ( महात्मागांधी ) तुरुंगांत आहेत. पण जादूप्रमाणें त्यांच्या संदेशानं लाखो लोकांच्या हृदयाचा ठाव घेतला असून आज कित्येक स्त्रीपुरुष व लहान मुलंही धैर्यानं पुढं येऊन, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितां लढण्यास सिध्द झाले आहेत. आज हिंदुस्थानांत आपण इतिहास बनवित आहोंत. तुझं माझं भाग्य थोर कीं, आपण हें सर्व प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहात आहोंत; नव्हे आपल्याला त्यांत प्रत्यक्ष भाग घेण्याची संधि लाभली आहे.

खरंच, या महान् लढ्यांत, आपण कसं वागावं ? त्यांत आपल्याला कोणतां भाग घेतां येईल ? अर्थात या लढयांत कोणता भाग आपल्या वांट्याला येईल, हें मला सांगता येत नाहीं. पण कोणता कां भाग येईना, आपल्या ध्येयाला अगर आपल्या लोकांना काळिमा फासला जाईल असं कोणतंही कृत्य आपल्या हातून घडतां कामा नये. जर आपल्याला हिंदुस्थानचं सैनिक व्हायचं असेल तर, आपण हिंदुस्थानची इभ्रत राखली पाहिजे. आपल्या राष्ट्राची इभ्रत हा आपला पवित्र ठेवा. पुष्कळ वेळां काय करावं याविषयी आपलं मन संशयांत गिरक्या खातं. खरं कोणतं व खोटं कोणतं, हें ठरविणं कांहीं सोपं काम नाहीं. पण ज्यावेळीं तुझ्या मनांत संशय येईल त्यावेळीं पुढील लहानशी कसोटी लावून पहा; ती तुला उपयोगी पडेल. गुप्त, अगर लोकांपासून लपवून ठेवावीशी वाटेल अशी कोणतीहि गोष्ट तूं करूं नकोस. अशी वृत्ति म्हणजेच भीति, व भीति तर वाईट नि लांच्छनास्पद. प्रथम तूं धैर्य अंगी आणण्याचा प्रयत्न कर, मग बाकीच्या गोष्टी त्यामागून आपोआपच येतील. तूं जर धैर्यशाली होशील,

तर तुला कधींहि भीति वाटणार नाहीं व लज्जास्पद अशी कोणतीही गोष्ट तूं करणार नाहींस. तुला माहितच आहे कीं, गांधीजींच्या नेतृत्वाखालील आपल्या आजच्या चळवळींत गुप्ततेला व लपवा छपवीला स्थान नाहीं. आमच्या जवळ लपविण्याजोगं कांहींच नसल्यामुळं काय करावं नि काय बोलावं, याची आम्हांला कधींच भीति वाटत नाहीं. जें काय करायचं, तें आम्ही उघड्या वातावरणांत—स्वच्छ उजेडांत करतो. आपल्या खाजगी जीवनांत सुद्धां सूर्य हा आपला मित्र असून, प्रकाशांत आपण काम करावयास शिकलं पाहिजे. गुप्तता अगर चोरून कोणतीहि गोष्ट करण्याची वृत्ति यांना आपण फांटा दिला पाहिजे. पुष्कळ वेळां आपल्याला एकांत लागतो; पण एकांत म्हणजे गुप्तपणा नव्हे. यागोष्टी जर तूं आचरणांत आणशील तर तूं प्रकाश-कन्या बनून, तुझ्यांत निर्भयता, प्रसन्नता यांचा विकास होईल. तूं कधींहि डगमगणार नाहींस.

मी तुला फारच लांबलचक पत्र लिहिलं तरीसुद्धां अजून कितीतरी गोष्टी लिहावयाच्या राहिल्या आहेत. पत्रांत त्या सर्वांचा कसा समावेश करतां येईल !

मी पूर्वीचं ह्मटलं आहे कीं, आज आपल्या देशांत जो स्वातंत्र्याचा लढा चालू आहे तो पहाण्याची संधि तुला लाभली असून, त्या दृष्टीनं तूं भाग्यवान आहेस. आणखीही एका दृष्टीनं तूं भाग्यवान आहेस. तुला एक शूर व अद्वितीय स्त्री आई ह्मणून लाभलेली आहे. ज्या ज्या वेळीं तुझ्या मनांत शंका येतील अगर तुला त्रास होईल, त्या त्या वेळीं तूं आपल्या आईचा सल्ला घेत जा.

आपल्या मातृभूमीच्या सेवेकरितां, तूं पराक्रमी सेविका व्हावं हीच माझी इच्छा !

## २

# नूतन वर्षाची देणगी

**नूतन वर्षारंभ १९३१**

दोन वर्षांपूर्वी तूं मसूरीला असतांना, मी अलाहाबादेहून लिहिलेली पत्रं तुला आठवतात कां ? ती पत्रं तुला फार आवडल्याचं तूं मला त्यावेळीं सांगितलंस. साहजिकच मी असा विचार केला कीं, ती पत्रमाला पुढं चालवून तुला जगाची अधिक माहिती कां सांगूं नये ? पण त्या बाबतींत मी आतापर्यंत दिरंगाईच चालविली आहे. गतकालीन जगाच्या तसंच पूर्वीच्या थोर स्त्री-पुरुषांच्या व त्यांच्या पराक्रमाच्या हकिकती वाचणं मनोरंजक असतं. इतिहास वाचणं चांगलं खरं; पण त्याहीपेक्षां प्रत्यक्ष इतिहास बनविण्याच्या बाबतींत सहभागी होणं हें अधिक भाग्याचं व रम्य आहे. आणि तूं जाणतेसंच कीं, आपल्या देशांत आज इतिहास बनविला जात आहे. हिंदुस्थानच्या गतइतिहासाला, फार पुरातन काळापासून आरंभ होतो, त्यामुळें त्यावर विस्मृतिचं पटल चढलं आहे. आपल्या इतिहासांत पुष्कळ तापदायक व लाज वाटण्यासारख्या गोष्टी असल्या तरी एकंदरीत विचार केला तर, आपला इतिहास रमणीय व अभिमान वाटण्याजोगा आहे. शिवाय आज आपल्याला गत कालाचं निरिक्षण करण्यास फारसा वेळ नाहीं. आपली मनें भविष्यकाळाच्या विचारांनीं भारून गेलीं आहेत. आपण भविष्यकाळाचं चित्र रेखाटीत आहोत.

या बंदीशाळेंत मला माझ्या मनाप्रमाणं वाचन अगर लेखन करण्यास पुष्कळ वेळ आहे; पण मन सारखं भ्रमण करीत असून बाहेर आपला लढा कसा चालला असेल, आपले सहकारी काय करीत असतील, मी

जर मोकळा असतो तर काय केलं असतं, यांच विचारांनीं तें व्यग्र झालं आहे. माझ्या मनांत वर्तमानकाळ व भविष्यकाळ यांचे पडसाद उमटत असल्यामुळें, भूतकाळाविषयीं विचार करण्यांत मला क्वचितच वेळ मिळतो. मात्र कधीं कधीं माझं मलाच वाटतं कीं आपण चुकत आहोत. मला जर बाहेरच्या घडामोडींत भाग घेतां येत नाहीं तर त्यांचा मी विचार करून डोक्याला शीण देण्यांत काय अर्थ आहे ?

अर्थात्, तुला पत्र न लिहिण्याची ही सबब झाली. आतांपर्यंत मी तुला पत्रं लिहिण्याच्या बाबतींत टाळाटाळ करीत आलों, याचं खरं कारण निराळंच आहे. माझ्या मनांत अलीकडे अशी शंका येऊं लागली आहे कीं, तुला शिकविण्याइतकं मला तरी ज्ञान आहे कां ? तुझी बौद्धिक-वाढ झपाट्यानं होत आहे व तूं इतकी शहाणी होत चालली आहेस कीं, मी शाळा कॉलेजांतून व नंतरहि जें शिकलों तें त्यामानानं अगदींच अपुरं असण्याचा संभव आहे. निदान ते साठलेल्या पाण्यासारखं असूं शकेल. कांहीं दिवसांनीं तूंच माझी गुरु बनून मला पुष्कळ गोष्टी शिकवूं लागशील. पोट फुटूं नये म्हणून साखळदंड बांधलेल्या त्या अतिशहाण्या माणसासारखी माझी स्थिति खास नाहीं.

तूं मसूरीला होतीस, त्यावेळीं मी तुला जगाच्या आरंभीची माहिती सांगितली. तें काम फारच सोपं होतं. कारण त्या वेळचा इतिहासच मुळीं पुसट व तर्कावर उभारलेला आहे. पण जसं जसं आपण त्या काळातून बाहेर येतो तसंतसं ज्ञात इतिहासाला व त्याबरोबरच पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांतील माणसांच्या अद्भुत जीवनक्रमाला आरंभ होतो. माणसांचा हा जीवनक्रम कधीं योग्य व कालानुरुप तर कधीं कधीं पिसाट व मूर्खपणा, अशा परस्पर विरोधी प्रसंगांनीं भरलेला आहे; त्याची सुसंगति लावणं

कठीण. कदाचित् योग्य संदर्भ ग्रंथ मिळाले तर तसा प्रयत्नही करतां येईल. पण या बंदीशाळेत तसे ग्रंथ कोठून मिळणार ? यामुळें माझी पुष्कळ इच्छा असली तरी, जगाचा इतिहास सुसंगतवार कथन करणं मला शक्य वाटत नाहीं.माझ्याविषयीं म्हणशील तर, मुलामुलींनीं एका विवक्षित देशाचा इतिहास शिकावा व तोसुद्धां त्यांतील कांहीं थोडा भाग व सनावळी घोकून, ही पद्धतच मला मुळीं आवडत नाहीं. इतिहास म्हणजे अखंडधाग्यांनीं विणलेलं एक वस्त्र. म्हणून सर्व जगांत काय चाललं आहे, याची माहिती करून घेतली नाहीं तर, एका विवक्षित देशाच्या इतिहासांतील रहस्य उमगणं शक्य नाहीं. तूं मात्र एक दोन देशांचा अभ्यास वरील आकुंचित दृष्टीनं न करतां सर्व जगाचं सिंहावलोकन करावसं अशी माझी इच्छा आहे. लक्षांत ठेव, आपल्याला जितका वाटतो तितका भेद निरनिराळ्या राष्ट्रांतील लोकांत नाहीं. नकाशांत निरनिराळे देश निरनिराळ्या रंगांत दाखविले आहेत. अर्थात् निरनिराळ्या देशांतील लोकांत विसदृश्यता आहे; पण विसदृश्यतेपेक्षां सदृश्यता अधिक आढळून येते. म्हणूनच नकाशांतील भिन्न राष्ट्रांच्या भिन्न रंगामुळं आपण बिचकून जाण्याचं कांहींच कारण नाहीं.

तुझ्याकरितां मी माझ्या आवडीचा इतिहास लिहू शकत नाहीं. त्याकरितां तुला वेगळे इतिहास ग्रंथ वाचावे लागतील. मी फक्त तुला भूतकाळ, त्या काळांतील लोक व त्यांनीं जगाच्या रंगभूमीवर कोणत्या भूमिका वठविल्या याविषयीं सर्व साधारण माहिती सांगेन,

माझीं पत्रं तुला मनोरंजक वाटतील अगर त्यामुळं तुझी जिज्ञासा जागृत होईल कीं नाहीं हें मला माहित नाहीं. कदाचित् माझी पत्र फार उशीरा तुला मिळतील, किंवा ती मिळणारही नाहींत. खरंच, आपण अगदीं

एकमेकाजवळ असूनही आपल्या मधील अंतर अमर्याद भासावं हें नवल नाहीं कां? मसूरीला असतांना तूं माझ्यापासून कित्येक मैल दूर होतीस; पण इच्छेला येईल तितक्यांदा मी तुला लिहूं शकत होतो व तुला भेटण्याची इच्छा अनिवार होतांच तुजकडे धांवून येत होतो. उलट आज तूं यमुना नदीच्या एका कांठावर, मी दुसऱ्या कांठावर, इतक्या जवळ आहोंत; पण बंदीशाळेच्या उंच भिंतीनीं आपली ताटातूट केली आहे. पंधरा दिवसांनीं मी एक पत्र लिहावं, पंधरा दिवसांनीं मला एक पत्र यावं आणि पंधरा दिवसांनीं मला एकाद्याला वीस मिनिटें भेटतां यावं! असं आहे तरी मला वाटतं, ही बंधनं आहेत हेंच बरं आहे. कारण ज्या वस्तू आपल्याला सहजगत्या अगर स्वल्परित्या मिळतात, त्यांची आपल्याला फारशी किंमत वाटत नाहीं. म्हणूनच माझं असं ठाम मत झालं आहे कीं, शिक्षणाच्या दृष्टीनं प्रत्येकाला तुरुंगवास आवश्यक आहे. सुदैवानं आज या देशांतील हजारो लोक हा शिक्षणक्रम पुरा करीत आहेत.

माझीं हीं पत्रं तुला आवडतीलच असं नाहीं; पण माझ्या मानसिक समाधानाकरितां मी तीं तुला लिहिण्याचं ठरविलं आहे. या पत्रामुळं मी तुझ्याजवळ असून, तुझ्याशीं प्रत्यक्ष बोलतच आहे असं मला वाटतं. तुझ्या विषयीं मी नेहमींच विचार करतो; पण आज तुझी मूर्ती डोळ्यापुढून हालतच नाहीं. आज नूतन वर्षारंभ. पहाटेची गोष्ट. आकाशांतील ताऱ्यांकडे पहात मी बिछान्यावर पडलों असतां, मला गेल्या वर्षांत आपण बाळगून असलेल्या आशा, झालेला त्रास नि आनंद यांची स्मृति झाली. केलेलीं मोठमोठालीं कार्येंहि आठवलीं. नि ओघाओघानंच ज्यानीं आपल्या जादूच्या कांडीनं या देशांत चैतन्य व स्फूर्ति निर्माण केली ते बापूजी येरवड्याच्या बंदीशाळेंत काय करीत असतील, हा विचार मनांत आला

ानि थोड्यांच वेळांत दादू (पंडित मोतीलाल नेहरू) व इतरांचीही आठवण झाली. विशेषतः तूं व तुझ्या आई संबंधीचे विचार मनांत घोळूं लागले. अंमळ उशीरानं बातमी आली कीं, तुझ्या आईला अटक करून तुरुंगांत नेलं म्हणून! नवीन वर्षाची ही देणगी मला फारच बहारीची वाटली. तुझ्या आईला अटक होणार हें मी जाणूनच होतो व खुद्द तुझ्या आई-लाही त्यामुळं फार समाधान वाटलं असेल यांत संशय नाहीं.

तुझ्या आईच्या अटकेमुळं तुला मात्र आतां एकटं एकटं वाटत असेल. पंधरा दिवसांनीं तूं एकदां तुझ्या आईला व पंधरा दिवसांनीं एकदां मला भेटशील व आमचे निरोप एकमेकांना पोचवशीलहि. मी मात्र कागद पेन्सिल घेऊन तुझाच विचार करीत बसेन. तूं मुग्धपणें माझ्याजवळ येशील व आपण पुष्कळ गोष्टी संबंधी बोलूं. आपण भूत-काळाचीं स्वप्नें पाहूं व भूतकाळापेक्षां भविष्यकाळ उज्वल कसा होईल, याचा मार्ग शोधण्याचा प्रयत्न करूं. आज आपण नूतन वर्षानिमित्त एक निश्चय करूं या. हें वर्ष जुनं होऊन कालसागरांत विलीन होण्याच्या आंत आपण कल्पना चित्रांत रंगविलेला उज्वल भविष्यकाल वर्तमानसृष्टींत आणूं व हिंदुस्थानच्या भूतकालीन इतिहासाला एक तेजस्वी भाग जोडूं !

---

३

# इतिहासाचा धडा

५ जानेवारी १९३१

मी तुला जगाचा इतिहास कथन करण्याचं ठरविलं खरं; पण लिहूं काय ? कुठून सुरवात करूं ? गतकाळाचा विचार करूं लागलो कीं, माझ्या मनःचक्षुपुढून भूतकाळाची अगणित चित्रं जातात. त्यापैकीं कांहीं इतरांपेक्षां अधिक वेळ टिकतात आणि ती माझी आवडती चित्रं असल्यानं लागलीच माझ्या मनांत त्यांच्याविषयीं विचारांचं चक्र सुरू होतं. नकळत मी भूतकाळांतील गोष्टींची, सध्यां डोळ्यापुढं घडत असलेल्या प्रसंगाशीं तुलना करूं लागतो आणि माझ्या मार्गदर्शनासाठीं मी त्यांतून तात्पर्य काढण्याचाहि प्रयत्न करतो. माणसाचं मन म्हणजे गोंधळखानाच. चित्रं अस्ताव्यस्त स्थितींत पडलेल्या एकाद्या प्रदर्शनालयाप्रमाणं ते तुटक तुटक विचारांनीं भरलेलं; पण याचा सब दोष आपलाचं आहे असं मात्र नव्हे. आपणापैकीं बहुतेक जन निरानिराळ्या प्रसंगाची सुसंगतवार मांडणी करूं शकतील; पण कांहीं कांहीं वेळां हे प्रसंगच इतके विचित्र असतात कीं, त्यांची सुसंगतवार मांडणी करणंच मुळीं कठीण जातं.

इतिहासाच्या अध्ययनापासून आपण काय शिकलं पाहिजे, या विषयीं मी तुला एकदां लिहिल्याचं मला आठवतं. या जगाची हळुंहळुं पण खात्रीपूर्वक प्रगति कशी होत गेली, आरंभीच्या साध्या प्राण्यांच्या ठिकाणीं सुधारलेले प्राणी कसे अस्तित्वांत आले व शेवटीं प्राणिमात्रांचा राजा जो मनुष्य तो कसा निर्माण झाला व आपल्या बुद्धीमत्तेच्या जोरावर त्यानं इतर प्राण्यावर कशी मात केली, या गोष्टी आपल्याला इतिहासाच्या

अध्ययनानं कळल्या पाहिजेत. आरंभी रानटी स्थितींत असलेला मनुष्य नंतर कसा सुधारला, हा इतिहासाचा विषय समजला जातो. पूर्वीच्या कांहीं पत्रांतून अलीकडे आपल्यांत सहकार्याची भावना कशी उद्‌भवली आहे व समाजाच्या सुखाकरितां सहकार्यानं वागणं हे आपण आपलं ध्येय ठेवलं पाहिजे, याबद्दल मी लिहिलं आहे; पण इतिहासाचं सिंहावलोकन केलं तर, सहकार्याची ही भावना आपल्यांत रुळली आहे, त्याबाबतींत आपण बरीच प्रगति केली आहे, असं मला वाटत नाहीं. आपल्यांत अजूनही सहकार्याचा अभाव आहे. स्वार्थासाठीं एक देश दुसऱ्या देशावर आक्रमण करीत असल्याचं अगर एक मनुष्य दुसऱ्या माणसाची पिळवणूक करीत असल्याचं दृश्य आपण आजही पहातो. लाखों वर्षांच्या प्रगति नंतरही जर आपण इतके मागासलेले व अपूर्ण आहोंत तर शहाणपणानं व योग्य रीतीनं वागायला आपल्याला आणखी किती कालावधि लागेल, कोण जाणे ! कांहीं कांहीं वेळेला तर, इतिहासांतील गतकालिन कारकीर्दी आमच्याहून अधिक बऱ्या, अधिक सुधारलेल्या व अधिक सुसंस्कृत वाटतात. तेव्हां साहजिकच अशी शंका येते कीं, आपण पुढं जात आहोंत कीं मागं ! आपल्या हिंदुस्थानाविषयीं बोलावयाचं झाल्यास असं म्हणावं लागेल कीं, आपल्या भूतकाळच्या इतिहासांत अशा कांहीं उज्वल कारकिर्दी झाल्या कीं त्या आजच्यापेक्षा प्रत्येक बाबतींत खात्रीनं सरस होत्या.

हिंदुस्थान, इजिप्त, चीन, ग्रीस आदिकरून बऱ्याच देशांच्या गतकालीन इतिहासांत उज्वल काल होऊन गेला असला तरी या पैकीं बहुतेक देशांना आज अवनत दशा प्राप्त झाली आहे. पण त्यामुळं आपण हताश मात्र होता कामा नये. हें जग अफाट आहे आणि एकाद्या

देशाची तात्पुरती भरभराट अगर अवनति यांचा जागतिक परिस्थितीवर फारसा परिणाम होत नाहीं.

अलीकडे पुष्कळ लोक आपल्या सुधारणेची व आश्चर्यकारक शास्त्रीय प्रगतिची बढाई मारतात. खरोखरच शास्त्रीय संशोधनानी पुष्कळ चमत्कार केले आहेत व त्याबद्दल शास्त्रज्ञ निःसंशय आदरास प्राप्त आहेत. पण जे लोक बढाई मारतात ते क्वचितच थोर असतात. आपण ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, पुष्कळ बाबतींत आपण इतर प्राण्यांहून फारशी प्रगति केलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर, काहीं बाबतींत तर प्राणीच मनुष्यापेक्षां श्रेष्ठ आहेत. पुष्कळांना माझें हे विधान मूर्खपणाचें वाटेल व ज्यांना फारशी माहिती नाहीं ते त्याबद्दल हंसतीलही; पण नुकतीच तूं मेटरलिंकनें लिहिलेली मधमाशा व मुंग्या यांची उद्बोधक माहिती वाचली आहेस. तीवरून तुला कळून आलेंच असेल कीं, या प्राण्यांतहि थक्क कर-णारी अशी संघटना आहे. आपण या प्राण्यांना क्षुद्र समजतो; पण सर्वांच्या सुखाकरितां त्याग व सहकार्य कसें करावें ही गोष्ट या प्राण्यांना मानवा पेक्षांहि अधिक चांगल्या रीतीनें कळल्याचें दिसून येतें. ज्या दिवशीं मी या मुंग्यांची माहिती वाचली, त्या दिवसापासून त्यांच्या विषयीं माझ्या हृदयांत ओलावा उत्पन्न झाला आहे. जर परस्पर सहकार्य व समाजाच्या सुखाकरितां वैयक्तिक सुखाचा त्याग करणें, हीं दोन संस्कृतीची लक्षणें असतील तर मुंग्या त्या बाबतींत माणसापेक्षां अधिक श्रेष्ठ आहेत, असेंच म्हणावें लागेल.

आपल्या संस्कृत भाषेंत याविषयीं एक सुंदर सुभाषित आहे. 'कुटुंबाकरितां व्यक्तीचा त्याग करा, समाजाकरितां कुटुंबाचा त्याग करा, देशाकरितां समाजाचा त्याग करा, आणि आत्म्याकरितां देशाचा त्याग करा. अर्थात आत्मा म्हणजे काय, हे आपल्यापैकीं

फारच थोड्यांना माहित आहे. त्याचा प्रत्येकजण निरनिराळा अर्थ करतो. पण वरील सुभाषिताची मूलभूत शिकवण ही कीं, सर्वांच्या सुखाकरितां त्याग व सहकार्याची आवश्यकता आहे. आपण हिंदी लोक पुष्कळ वर्षे उन्नतीचा हा राजमार्ग विसरलों होतों व म्हणूनच आपल्याला वाईट दशा आली. आज हा राजमार्ग पुन्हां दिसूं लागला असून, सर्व देशांत प्राण संचारला आहे. देशांतील स्त्रीपुरुष, इतकेंच नव्हे तर मुलेंही, दुःखाची अगर कष्टांची मुळींच पर्वा न करतां हंसत मुखानें व निर्भयपणें पुढें जात असल्याचें दृश्य आज आपण पहात आहोंत ते किती अपूर्व आहे ! ते हसत आहेत आणि त्यांची हृदयें आनंदानें फुललीं आहेत. याचें कारण एका उच्च ध्येयाकरितां झगडण्याचें भाग्य त्यांना लाभलें आहे. आणि ज्यांना हें भाग्य लाभलें आहे, त्यांनाच त्यागाचें समाधान लाभत आहे. आज आपण आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळावें म्हणून झगडत आहोंत. आपल्या दृष्टीनें हें पवित्र कार्य आहे; पण त्यापेक्षां व्यापक कार्य म्हणजे खुद्द मानवतेचें. जगांतील दुःख व दारिद्र्य यांचा नायनाट करण्यासाठीं मानवजातीचा जो महान् लढा चालला आहे त्याचा एक भाग म्हणजेच आमचा लढा, अशी आपली मनोमय खात्री असल्या मुळेंच, जगाच्या प्रगति प्रीत्यर्थ आपण थोडी कां होईना मदत करीत आहोत, हें समाधान आपल्याला लाभत आहे.

सध्यां तूं आनंदभवनात, तुझी आई मलाकाच्या बंदीशाळेंत व मी नैनीच्या तुरुंगांत अशी आपली पांगापांग झाली आहे. एकमेकाशिवाय आपल्याला फार चुकल्याचुकल्या सारखें वाटतें नाहीं ? पण ज्या दिवशीं आपण तिघेहि पुन्हां एकत्र येऊं त्या दिवसाचा विचार कर. मी स्वतः त्या दिवसाची उत्सुकतेनें वाट पहात असून, त्या दिवसाच्या विचारानें माझें हृदय हर्षभरीत व हलकें झालें आहे.

---

४

# इन्किलाब झिंदाबाद

## ( क्रांति चिरायू होवो ! )

७ जानेवारी १९३१

प्रिय दर्शिनी. नांवाप्रमाणं तुझं दर्शन माझ्या नेत्रांना प्रिय आहे. पण दृष्टीसमोर नसलीस तर तूं मला अधिक प्रिय वाटतेस. आज मी तुला पत्र लिहावयास बसलो तोंच अस्पष्ट मेघगर्जनेप्रमाणे अंधूक आरोळ्या माझ्या कानांवर पडूं लागल्या. या आरोळ्या कसल्या याचा प्रथम उमज मला पडेना; पण थोडयांच वेळांत त्या माझ्या परिचयाच्या आहेत असं आढळून आलं. माझ्या हृदयांत त्यांचें पडसाद उमटले. हळुंहळू त्या आरोळ्या स्पष्ट होऊं लागल्या. ' इन्किलाब झिंदाबाद, इन्किलाब झिंदाबाद, ' या स्फूर्तिदायक घोषाचा पडसाद सर्व बंदीशाळेंत उमटला व आमची हृदयें आनंदानं भरून आलीं. आमच्या बंदीशाळेनजीकच युद्ध घोषणा करणार लोक कोण हें समजावयास मार्ग नव्हता. कदाचित् ते शहरांतील असतील अगर खेडया-तील शेतकरी असतील. या गर्जना कोणत्या प्रसंगामुळें केल्या जात आहेत हेंही समजूं शकले नाहीं. पण क्रांतीचा घोष करणारे लोक कोणी कां असनांत; पण त्या ऐकून आम्हांला हर्ष झाला. आम्हीं पण त्यांच्या अभि-वादनांना, मुग्धपणें प्रत्युत्तर देऊन, त्याविषयीं सदिच्छा प्रदर्शित केली.

खरंच आम्ही ' क्रांति चिरायु होवो ! ' असा जयघोष कां करतो ? आम्हांला क्रांति अगर परिवर्तन कां हवं ? आज हिंदुस्थानला आमूलाग्र बदल झाला तर पाहिजेच आहे. पण आपल्याला पाहिजे असलेलं परिवर्तन घडून आलं नि आपण स्वतंत्र झालो तरी आपण स्वस्थ बसतां कामा नये

या जगांत कोणतीही सजीव वस्तू स्थिर राहूं शकत नाहीं. निसर्ग दिवसागणिक नव्हे, मिनिटागणिक बदलत आहे. अशा या बदलत्या वातावरणांत फक्त मुडदेच वाढ न होता स्थिर राहूं शकतील. जलप्रवाहांत नवीन पाणी येतं; पण त्याच प्रवाहांला तुम्हीं धरण घातलं तर तें स्थगित होतं. हीच गोष्ट मनुष्याची व देशाची. आपल्याला आवडो किंवा न आवडो, वृद्धपण येतेंच. अर्भकं मुलं होतात, मुलं मोठी होतात, प्रौढ बनतात व हळुंहळूं वृद्ध होत जातात. या घडामोडींत आपल्याला जीवन कंठावेंच लागतं. पुष्कळ लोक जग हे स्थिर आहे असं धरून चालतात. नवीन विचारांचा आपल्या डोक्यांत ते प्रवेशच होऊं देत नाहींत. विचाराइतकी दुसरी कोणतीच गोष्ट त्यांना भीतिदायक वाटत नाहीं. याचा परिणाम काय ? जग आपलं तसंच पुढं जातं; पण असले लोक मात्र बदलत्या परिस्थितीला साजेसं वागत नाहींत. म्हणून जगांत वेळोवेळीं प्रचंड स्फोट होतात. १४० वर्षांपूर्वीं झालेली फ्रेंच राज्यक्रांति व १२ वर्षांपूर्वीची रशियन राज्यक्रांति या सारख्या मोठ्या क्रांत्या घडून येतात. आज आपल्या देशांतहि आपण क्रांतिपथावर आहोत. अर्थात् आपल्याला स्वातंत्र्य तर पाहिजेच; पण त्याशिवाय आपल्याला कांहीं तरी अधिक पाहिजे. आपल्याला देशांत सांचलेलीं डबकीं नाहींशीं करून, प्रत्येक ठिकाणीं शुद्ध पाण्याचे प्रवाह आणावयाचे आहेत. आपल्याला देशांतील उकिरडा हालवून दारिद्र्य व दुःख यांचं उच्चाटन करावयाचं आहे. याशिवाय विचारशक्तिला अडथळा आणणारीं अशीं अनेक लोकांच्या मनांतील कोळीष्टकं नष्ट करावयाचीं आहेत. हे कार्य मोठ आहे व त्याला कालावधीहि बराच लागेल. आज निदान आपण या कार्याला चालना देऊं या. ' इन्किलाब झिंदाबाद. '

आज आपण क्रांतिच्या प्रवेशद्वारांत उभे आहोत. भविष्य काळांत काय घडेल तें सांगतां येत नाहीं; पण सध्याच्या काळांतसुद्धां आपल्या

श्रमाला गोड फळं आल्याचं दृश्य दिसत आहे. हिंदी स्त्रियाकडेच पहा. किती अभिमानानं त्या आजच्या लढ्यांत भाग घेत आहेत! कोमल पण शूर व अदमनीय अशा आमच्या स्त्रिया आज अनेकांना मार्गदर्शक होत आहेत. आणि पडदा? आपल्या अनेक शूर व सुंदर भगिनींना व देशाला शापवत् अशी ही पडदापद्धति आज कुठं आहे? गुपचूपपणें तिचं उच्चाटन होत आहे. लवकरच दुर्मिळ वस्तू म्हणून तिला प्राचीन वस्तु-संग्रहालयांत स्थान द्यावं लागेल.

स्त्रियांची जी गोष्ट तीच मुलांची. वानरसेना, बालबालिका सभा, त्यांच्यांमधील क्रांतिच्या द्योतक होत. या मुलांपैकीं बऱ्याच जणांच्या आई-बापांनीं गतकालांत भेकड अगर गुलामाला शोभणारीं कृत्यं केलीं असतील! पण आजची ही पिढी, गुलामगिरी व भीरूपणा सहण करणार नाहीं. याबद्दल शंका घेण्याची कोणाची छाती आहे?

कालचक्र फिरत आहे. जे खालीं होते ते वर येत आहेत व वर असलेले खालीं जात आहेत. आपल्या देशांत या पूर्वीच हें चक्र फिरावयास पाहिजे होतं; पण उशीरा कां होईना आपण त्याला इतकी गति दिली आहे कीं, याला कोणी थांबवूं शकणार नाहीं.

'इन्किलाब झिंदाबाद!'

---

५

# आशिया व युरोप

८ जानेवारी, १९३१

प्रत्येक गोष्ट सतत बदलत आहे, असं मी गेल्या पत्रांत म्हटलं आहे. इतिहास म्हणजे तरी काय ? परिवर्तनांची जंत्रीच. म्हणून गतकालांत फारच थोड्या घडामोडी झाल्या असल्या तर इतिहासही फारच थोडा लिहावा लागला असता.

आपण शाळा कॉलेजांत जो इतिहास शिकतो तो फारसा नसतोच. इतर लोकांची मला माहिती नाहीं, पण माझ्याविषयीं सांगावयाचं म्हणजे मी शाळेत इतिहासाचं फारच थोडं ज्ञान संपादन करूं शकलों. हिंदुस्थानचा अल्प, अगदींच अल्प व ब्रिटनचाही थोडकाच, इतिहास मला शिकतां आला. शिवाय हिंदुस्थानचा जो इतिहास मी शिकलो तो खोटा, विपर्यस्त व आपल्या देशाकडे दूषित दृष्टीकोनांतून पहाणाऱ्या लोकांनीं लिहिलेला असा होता. हिंदुस्थानची गोष्ट वगळली तर दुसऱ्या देशांच्या इतिहासाचं माझं ज्ञान अगदींच तुटपुंजं आहे. मला जो थोडा फार खरा इतिहास वाचावयास मिळाला तो कॉलेज सोडल्यावर. सुदैवानं, वरचेवर घडणाऱ्या कारागृहवासामुळं, माझं इतिहासविषयक ज्ञान सुधारण्याची व त्यांत भर टाकण्याची संधि मला मिळाली.

पूर्वीच्या कांहीं पत्रांतून मी प्राचीन हिंदुस्थानची संस्कृति, द्राविडी लोक व हिंदुस्थानांतील आर्यांचं आगमन, याविषयीं लिहिलं आहे. आर्यांच्या आगमनापूर्वीच्या काळाविषयीं मला फार लिहितां आलं नाहीं; याचं कारण त्याविषयीं खुद्द मलाच फारशी माहिती नाहीं; पण तुला

ऐकून गंमत वाटेल ! गेल्या कांहीं वर्षांत हिंदुस्थानांतील फार प्राचीन संस्कृतीचे अवशेष सांपडले आहेत. हे अवशेष हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्द प्रांतांतील मोहेंजोदारोच्या आसपास मिळाले. लोकांनीं तेथें खोदलें नि हे पांच हजार वर्षांपूर्वीचे अवशेष शोधून काढले. इतकेंच नव्हे तर, त्या ठिकाणीं त्यांना इजिप्तमधील प्राचीन काळच्या मम्मीप्रमाणें मानवी मृतदेह सांपडले. कल्पना कर ! आर्यांचें आगमन होण्यापूर्वी एक हजार वर्षांची ही गोष्ट यावेळीं युरोप जंगली स्थितींत असलं पाहिजे.

आज युरोप बलाढ्य व प्रबळ बनलं आहे. तेथील लोक सर्व जगांत आपणच जास्त सुधारलेले व सुसंस्कृत असं मानतात. आशिया व आशियांतील लोक हीन दर्जाचे अशी त्यांची भावना असून, आशियांतील देशांतून जे काय लुबाडता येईल तें ते लुबाडून जातात. काळ किती बदलला आहे ! आपण युरोप–आशिया या दोन्ही खंडाकडे बारकाईनें पाहूं या. नकाशा उघड. छोटा युरोप महान आशिया खंडाला चिलगल्याचं तुला दिसून येईल. युरोप म्हणजे आशियाचा थोडासा वाढविलेला विस्तार असं वाटेल. ज्यावेळीं इतिहास वाचशील त्यावेळीं तुला आढळून येईल कीं, दीर्घ कारकिर्दीच विस्तृत काळपर्यंत आशियाचं प्राबल्य होतं. समुद्राच्या लाटा प्रमाणं आशियांतलि लोक निघाले व त्यांनीं युरोप काबीज केलं. या लोकांनीं युरोप जसा लुटला, तसाच सुसंस्कृतहि केला. आर्य, सिथीयन, हूण, अरब, मोंगल, तुर्क हे आशियांतलि कोणत्या तरी भागांतून बाहेर पडले व तें सर्व आशिया व युरोप खंडभर पसरले. आशियांतून निघालेले हे लोक म्हणजे एक टोळधाडच. खरोखर पुष्कळ काळपर्यंत युरोप ही आशियाची वसाहत होती. आणि अशा लोकांचे वंशज म्हणून अर्वाचीन युरोपांतलि पुष्कळ लोकांकडे बोट करतां येईल.

एकाद्या अवाढव्य झोंपलेल्या राक्षसाप्रमाणें, आशिया नकाशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलेला दिसतो. त्यामानानं युरोप फारच छोटा आहे. पण आशिया युरोपपेक्षां आकारानं मोठा म्हणून तो थोर असा मात्र याचा अर्थ नव्हे. आकार ही माणसाच्या अगर देशाच्या मोठेपणाची अगदीच हीन कसोटी होय. युरोप हे सर्वांत लहान खंड असलं तरी तें आज श्रेष्ठ असल्याचं आपण जाणतो. आपल्याला हेहि माहित आहे कीं, त्यांतील बऱ्याच देशांच्या इतिहासांत उज्वल काळ होऊन गेला. तेथें मोठमोठें शास्त्रज्ञ झाले. या शास्त्रज्ञांनीं अनेक शोध लावून मानवी सुधारणांत आश्चर्यकारक प्रगति घडवून आणली. लाखों स्त्री–पुरुषांचं जीवन सुलभ केलं. त्यांच्यांत मोठमोठे लेखक, तत्वज्ञानी, कलावंत संगीतज्ञ व कर्तबगार लोक झालेले आहेत. युरोपचा मोठेंपणा मान्य न करणं मूर्खपणाचं ठरेल.

पण युरोपचा मोठेपणा कबूल करतांना आपण आशियाचा मोठेपणा विसरलों तर तेहि मूर्खपणाचं ठरेल. आपण युरोपच्या वैभवानं दिपून जाऊन, गतकाळ विसरणं संभवनीय आहे. लक्षांत ठेव, भूतकाळांत आशियानंच विचारवंत असे महान नेते व जगांतील प्रमुख धर्मांच्या संस्थापकांना जन्म दिला असून, त्यांच्याच विचार सरणीची छाप, जगावर दुसऱ्या कोणाहीपेक्षां व कशाहिपेक्षां, अधिक पडलेली आहे. जगांतील अत्यंत प्राचीन धर्मांपैकीं एक असा हिंदूधर्म हा हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून चालत आला असून, जगांतील दुसरा मोठा असा बौद्ध धर्म त्याचा उगमहि हिंदुस्थानांतच झाला. आज हा धर्म चीन, जपान, ब्रम्हदेश, तिबेट, सिलोन वगैरे अफाट प्रदेशांवर पसरलेला दिसतो. ज्यू व ख्रिश्चन हे धर्महि आशियाचींच अपत्यें असून, आशियाच्या पश्चिम किनाऱ्यावरील

पॅलेस्टाईन ही त्यांची मायभूमि. पारशी धर्म इराणांत उद्भवला व मुसलमानी धर्मांचा संस्थापक महमंद पैंगबर अरबस्थानांतील मक्का येथें जन्मला. कृष्ण, बुद्ध, झोरोॲस्टर, खिस्त, महमंद, चीन मधील महान तत्वज्ञानी कॉन्फ्युसिअस व लावो-त्सी-थोडक्यांत सांगावयाचं म्हणजे आशियांतील मोठमोठ्या विचारवंतांच्या नांवांनीं तुला पानंच्या पानं भरून काढतां येतील. तसंच आशियांतील कर्तबगार लोकांच्या नांवांनींही तुला कित्येक पानं भरून काढता येतील. याशिवाय इतर अनेक प्रकारें, आपला हा जुना खंड गतकालांत किती श्रेष्ठ व महत्वाचा होता हें मी दाखवूं शकेन. काळ किती बदलला आहे. ! नि आजहि आपल्या डोळ्या देखत तो बदलत आहे. मध्येंच मिळालेली गति अगर मधून मधून होणारे स्फोट सोडले तर इतिहासाची प्रगति मंद गतीनेंच होते. तथापि आज आशियांत इतिहास झपाट्यानं संचलन करीत असून, हा प्राचीन खंड दीर्घकालीन झोपेंतून जागा होत आहे. जगाचे डोळे आशियाकडे लागले आहेत. प्रत्येकाला माहीत आहे कीं, भावी काळांत आशिया एक महत्वाची भूमिका वठविणार !

---

## ६

# प्राचीन संस्कृति व आमचा वारसाहक्क

९ जानेवारी १९३१

'भारत' या हिंदी नियतकालिकांत काल मला तुझ्या आईविषयींचं वृत्त वाचावयास मिळालं. तुझी आई मलाक्काच्या तुरुंगांत असून, तिला चांगल्या रीतीनं वागविण्यांत येत नाहीं व लवकरच तिची लखनौच्या तुरुंगांत रवानगी होणार असल्याचं कळलं. तुरुंगांत आम्हाला बाहेरच्या जगांतील थोड्याफार घडामोडी निवेदन करणारं हें एवढंच द्विसाप्ताहिक. तुझ्या आईविषयींची बातमी ऐकून मन विषण्ण झालं. कदाचित् भारतमधील बातमी खरी नसेल; पण मनांत संशय येणं हेंहि कांहीं बरं नाहीं. मनुष्य एकवेळ स्वतः वाटेल त्या हालअपेष्टा सहन करूं शकतो. नव्हे, त्यामुळें बराचसा फायदाच होतो. हालअपेष्टांची संवय नसली तर आपण नुसतें फुसफुशींत बनूं; पण ज्या व्यक्ती आपल्याला प्रिय आहेत, त्यांना दुःख भोगावं लागतं, ही कल्पना सहन करणं फारसं सोप नाहीं. विशेषतः त्यांचं दुःख हलकं करण्याबाबत आपण कांहींच करूं शकत नाहीं असं आढळून आल्यावर, ही गोष्ट विशेषरीतीनं जाणवते. भारतनें माझ्या मनांत शंका उत्पन्न केल्यामुळं मला तुझ्या आईविषयीं काळजी वाटूं लागली ती यामुळेंच. तुझी आई वीर स्त्री असून, तिची छाति सिंहीणीची आहे; पण ती अशक्त आहे. अशा स्थितींत तिच्या अशक्ततेंत भर पडावी हें मला बरं वाटत नाहीं. आपण किती खंबीर छातीचे असो; पण आपल्या शरीरानं दगा दिला तर आपण काय पराक्रम गाजावणार ? आपल्या हातून कांहीं तरी कार्य व्हावं असं वाटत असेल तर, आपली प्रकृति चांगली असली पाहिजे, देह धडधाकट व निरोगी पाहिजे.

कदाचित् तुझ्या आईची लखनौला रवानगी केली तर तें एका दृष्टीनं चांगलंच. तिथं तिला अधिक मोकळं व बरं वाटेल. सध्या ती मलाक्काच्या तुरुंगांत एकटीच असावी. पण अशा स्थितींतहि, ती आमच्या बंदी-शाळेपासून फारशी दूर नसून, अवघ्या चार पांच मैलावर आहे, हा विचार मनांत येऊन समाधान वाटतं. अर्थात् हा विचार म्हणजे मूर्खपणाची लाटच. तुरुंगाच्या दृष्टीनं पांच मैल काय नि १५० काय दोन्हीं सारखेच.

दादू अलाहाबादेला परत आले असून, त्यांची प्रकृति बरी आहे नि ते तुझ्या आईला भेटायलं मलाक्काला गेले आहेत, हें ऐकून समाधान वाटलं. कदाचित् नशीब असेल तर मी तुम्हांला उद्यां भेटूं शकेन. उद्यां माझा ' मुलाखत का दिन '. हा आम्हांला कपिलाषष्ठीचा योग वाटतो. मी दादूना गेलें दोनतीन महिने पाहिलेलं नाहीं. त्यांना पाहून त्यांची प्रकृति खरंच सुधारत आहे, याची मी खात्री करून घेईन आणि तुला मी पुष्कळ दिवसानंतर– पंधरा दिवसानंतर पाहीन. तूं मला आपली व आपल्या आईची हकीगत केव्हां सांगशील असं मला झालं आहे.

पण हा, मी हें काय चऱ्हाट वळत बसलों आहे ? मी तुला जगाचा इतिहास सांगायला बसलो आहे, हें विसरलोंच कीं ! क्षणभर आपण वर्तमानकाळ विसरून २००० ते ३००० वर्षांपूर्वींच्या काळांत प्रवेश करूं.

इजिप्त व क्रीटमधील प्राचीन नोसेस या विषयीं थोडीफार माहिती मी तुला पूर्वीच्या कांहीं पत्रांतून दिलीच आहे. या दोन देशांत व त्याच प्रमाणें इराक किंवा मेसोपाटेमिया, चीन, ग्रीस, हिंदुस्थान या ठिकाणीं प्राचीन संस्कृतीनीं मूळें धरलीं. अर्थात ग्रीसमधील संस्कृति बाकीच्या देशा-पेक्षां अंमळ उशीरा आली. संस्कृतीच्या बाबतींत हिंदुस्थान हें इजिप्त चीन आणि इराक यांच्या बरोबरीचे असून, प्राचीन ग्रीससुद्धां, या देशा-पेक्षां वयोमानानं कनिष्ट ठरतं. या प्राचीन संस्कृति आज कुठं आहेत ?

नोसोस आजच काय; पण गेलीं ३००० वर्षे अस्तित्वांत नाहीं. नोसोसची संस्कृति मागाहून आलेल्या ग्रीक लोकांनीं नष्ट केली. इजिप्तच्या हजारों वर्षांच्या संस्कृतीचीही अशीच वासलात लागली. आज तिचा माग-मूस फक्त पिरामिडस्, स्फींक्स्, मोठमोठाल्या देवालयांचे अवशेष व मम्मीज्च्या रूपानें दिसतो. आज तोच इजिप्त देश आहे, इजिप्तमधून तीच नाईल नदी वाहात आहे, इतर देशाप्रमाणें आजही इजिप्तमध्यें स्त्री-पुरुष राहतात; पण इजिप्तमधील अर्वाचीन लोक व त्यांच्या देशाची प्राचीन संस्कृति यांच्या मधील दुवा निखळला आहे.

इराक व इराण—किती साम्राज्यें तिथं उदयास आलीं नि काळाच्या पोटांत गडप झालीं ! या ठिकाणचीं सर्वांत जुनीं साम्राज्यें म्हणजे बाबि-लोनिया, ॲसिरिया, चाल्डीया हीं असून, बाबिलोन, निनेवेह हीं तेथील मोठीं शहरें होत. बायबलच्या जुन्या करारांत, या प्रदेशांतील लोकांविषयीं कितीतरी माहिती मिळतें. पुढें या प्राचीन काळांतील प्रदेशांत आणखी कांहीं साम्राज्यें भरभराटीला आली, नि आलीं तशीच लयाला गेलीं. आरबी भाषेंतील सुरसकथा मधील जादू नगरी—बगदाद येथेंच होती. साम्राज्यें उदयास येतात नि नाश पावतात. मोठे मोठे राजे नि सम्राट या जगाच्या रंगभूमीवर चमकतात व थोड्याच काळांत नाहीसे होतात; पण संस्कृती तशाच टिकतात. फक्त इराक, इराण व इजिप्त या देशांतील संस्कृतीच अपवादादाखल संपूर्णतः नष्ट झाल्या आहेत.

ग्रीस हें प्राचीन काळीं खरोखरंच श्रेष्ठ होतं व आजही आपण ग्रीसच्या वैभवाच्या गोष्टी जिज्ञासेनं वाचतो. ग्रीसमधील संगमरवरी पुतळे पाहून आपण थक्क होतो व ग्रीसच्या प्राचीन इतिहासांतील जेवढा भाग वाचावयास सांपडेल, तेवढा भाग आदरानं व साश्चर्य वाचतो. आजचं

युरोप हें प्राचीन ग्रीसचं अपत्य आहे असं म्हणतात. ग्रीसच्या आचार विचारांचा युरोपवर पगडा बसला आहे. पण ग्रीसचं हें प्राचीन वैभव कुठं आहे ? कित्येक शतकापूर्वींची ग्रीसची संस्कृति नाहिशी झाली असून, तिची जागा आज दुसऱ्या गोष्टींनी घेतली आहे. आज ग्रीस युरोपच्या आग्नेय भागांतील केवळ एक छोटासा देश म्हणून अस्तित्वांत आहे.

इजिप्त, नोसोस, इराक, ग्रीस सर्व नाहींशी झाली. त्यांची पुरातन संस्कृती आणि बाबिलोन, निनेवेह हीं मोठीं शहरें लयाला गेलीं. या जुन्या संस्कृतीच्या रांगेतील, दुसऱ्या दोन प्राचीन देशांची--हिंदुस्थान व चीन यांची वाट काय ? इतर देशाप्रमाणेंच या दोन देशांतहि साम्राज्या-मागून साम्राज्यें झालीं; स्वाऱ्या, लुटालूट वगैरे प्रकार मोठ्या प्रमाणावर घडले. कित्येक राजवंशांनीं येथे शेकडों वर्षं राज्यें केलीं व कालानु-क्रमानुसार त्यांची जागा दुसऱ्यांनीं घेतली. हिंदुस्थान, चीन कुठेंहि जा, तोंच प्रकार; पण हिंदुस्थान व चीन हे दोन देश सोडले तर, संस्कृतीचा अखंडपणा कोठेंच टिकला नाहीं. अनेक उलथापालथी, युद्धं होऊनही, या दोन्ही देशांतील प्राचीन संस्कृतीचा प्रवाह अखंडपणें चालू आहे. आज हे दोन्ही देश खोल गर्तेत पडलेले आहेत. त्यांच्या थोर व प्राचीन संस्कृतीवर धूळ व कित्येक शतकांची बरीचशी धाण सांचली आहे; पण अशाही स्थितींत त्या टिकल्या आहेत. आजही प्राचीन हिंदू संस्कृति हिंदी जीवनक्रमाचा पाया आहे. नवीन सुधारणा अस्तित्वांत येत आहेत. वाफे-वर चालणारीं मोटमोठी नौकायनें, आगगाड्या, कारखाने यामुळं जगाचं स्वरूप बदलून गेलं आहे व त्यामुळं पुढं मागं हिंदुस्थानचं स्वरूपही बदलून जाईल; पण या बदलत्या कालांतहि, अगदीं पुरातन काळापासून तो आजतागायत, हिंदी संस्कृतीचा विशाल प्रवाह अखंडपणें वहात आला आहे, ही गोष्ट मनोरंजक व विस्मयकारक नाहीं कां ? एका अर्थी

हिंदुस्थानच्या हजारों वर्षांच्या या संस्कृतीचं आपण वारसदार आहोंत. प्राचीनकाळीं, वायव्य सरहद्दप्रांत ओलांडून आमचे जे पूर्वज ब्रम्हावर्त, आर्यावर्त, हिंदुस्थान वगैरे नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या या रमणीय देशांत पसरले, त्यांचे आपण थेट वंशज आहोंत. मोठमोठे पर्वत उतरून खालच्या अज्ञात प्रदेशांत आलेल्या आर्यांचं चित्र आजहि डोळ्यापुढं रहात नाहीं कां? आमचे हे पूर्वज मोठे शूर, धाडशी व साहसप्रिय होते. जगांतील आनंद उपभोगण्याचा खरा मार्ग म्हणजे निर्भयता संपादन करणं, पराभव व अनर्थ यांनीं न खचणं असं ते मानीत; आणि पराभव संकट तर अशा निर्भय लोकांपासून दूर पळतात. विचार कर. आमचे हे पूर्वज किती दूरच्या प्रदेशांतलि; पण ' आगेबढो ' वृत्तीमुळें बादशाही दिमाखानं संथपणें वाहणाऱ्या प्रशान्त गंगेच्या तीरावरील प्रदेशांत येऊन दाखल झाले. असला हा सुपकि व रमणीय प्रदेश पाहून, त्यांना किती हर्ष झाला असेल! गंगेपुढें विनम्र होऊन ते आपल्या संपन्न व नादमधूर भाषेंत तिची प्रार्थना करीत, तें उगीच नाहीं.

आपण त्यांचे वारसदार आहोंत ही समाधानाची गोष्ट होय; पण त्यामुळें आपण मदांध होतां कामा नये. आपण जसें त्यांच्या सत्कृत्यांचे वारसदार आहोंत, तसेंच दुष्कृत्यांचेहि आहोंत. आपणाला त्यांच्याकडून वारसा हक्कानं ज्या गोष्टी मिळाल्या आहेत, त्यांत बऱ्याच गोष्टी अशा आहेत कीं, त्यामुळं जगांत आपल्याला खालचा दर्जा प्राप्त झाला आहे, आपला श्रेष्ट देश दारिद्र्यांत खितपत पडला आहे आणि त्याच्या नशिबीं परकीयांचं खेळणं होणं आलं आहे. अर्थात, आज आपण ही स्थिति अशीच पुढे चालूं न देण्याचं ठरविलं नाहीं कां?

७

# हेलेन्स अर्थात् ग्रीक लोक

१० जानेवारी १९३१

आज तुम्हांपैकीं कुणीच भेटायला आलं नाहीं. 'मुलाखत कां दिन' कोराच गेला. निराशा झाली माझी. विशेषतः मुलाखत पुढें ढकलण्याचं जे कारण कळलं, तें अगदीच चिंताग्रस्त करणारं होतं. दादूंची प्रकृति ठीक नाहीं, यापेक्षां जास्त कांहींच समजलं नाहीं. असो! मुलाखत होत नाहीं असं दिसून आल्यावर, मी चरखा हातीं घेतला नि थोडा वेळ सूत काढलं. माझा असा अनुभव आहे कीं, चरख्यावर सूत काढणं व हात मागावर विणणं यामुळं दुःखभार हलका होऊन, प्रसन्नता येते. म्हणून मन शंकाकुल होईल तेव्हां सूत काढींत जा.

गेल्या पत्रांत आपण युरोप व आशियाची तुलना केली. त्या काळीं युरोप कसं असलं पाहिजे हें समजावून घेण्याकरितां प्राचीन युरोपचं ओझरतं सिंहावलोकन करूं. दीर्घ काळपर्यन्त लोकांची अशी समजूत होती कीं, युरोप म्हणजे भूमध्य समुद्राच्या आसपासचा प्रदेश. तत्कालीन युरोपच्या उत्तरेकडील देशांची कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. जर्मनी, इंग्लंड, फ्रान्स या देशांत रानटी व क्रूर टोळ्यांची वसती आहे, असं भूमध्य-समुद्राच्या प्रदेशांतील लोक मानत. भूमध्य समुद्राच्या पूर्वेकडील देशा-पुरतीच संस्कृति मर्यादित आहे असं तेथील लोकांना खरोखरंच वाटे. तुला माहितच आहे कीं, इजिप्त व नोसोस या देशांनीं प्रथम आघाडी मारली. हळुहळूं आर्यलोक आशियांतून पश्चिमेकडे पसरले व त्यांनीं ग्रीस व लगतचे देश जिंकले. आतां आपल्याला ज्ञात झालेले हेच ते आर्य ग्रीक

लोक. प्राचीन ग्रीक म्हणून आपण त्यांचं कौतुक करतो. मला वाटतं, ग्रीसमध्यें गेलेल्या या आर्य लोकांत व हिंदुस्थानांत आलेल्या आर्यांत फारसा भेद नसावा. पण हळुंहळूं आर्यांच्या या दोन शाखांत फरक पडत चालला व लौकरच या दोन शाखा भिन्नवर्णीय समजण्यांत येऊं लागल्या. हिंस्थानांतील आर्यांवर त्यांच्यापेक्षांहि पुरातन अशा दोन संस्कृतींचा परिणाम झाला. एक द्रविडी संस्कृति व दुसरी म्हणजे, जिचे अवशेष आपण मोहेंजोदारी येथें पाहिले, ती पुरातन संस्कृति. आर्य व द्राविडी यांनीं बरीचशी देवाण घेवाण करून, हिंदुस्थानकरितां एक सर्व साधारण संस्कृति उभारली.

याचप्रमाणें, जे आर्य लोक ग्रीसमध्यें गेले त्यांच्यावरही, त्यावेळीं तेथें उन्नत स्थितींत असलेल्या नोसोसच्या संस्कृतीचा बराच परिणाम झाला असला पाहिजे; पण अशा रीतीनं तिचा परिणाम झाला असला तरी, ग्रीकांनीं नोसोस आणि तेथील बाह्य अशा बऱ्याच संस्कृतीप्रवण गोष्टींचा नाश करून, या नाशावरच स्वत:ची अशी संस्कृति उभारली. आपण लक्षांत ठेवलं पाहिजे कीं, तत्कालिन ग्रीक आर्य काय नि हिंदी आर्य काय, दोघेहि आडदांड व क्रूर शिपाई गडी होते. त्यांची वृत्ति जोमदार असल्यामुळें, त्यांनीं पुढें आलल्या सर्व सौम्य आणि अधिक सुधा लेल्या लोकांना धुळीस मिळवलं किंवा त्यांना शरण यावयास लावलं.

ख्रिस्तापूर्वी एक हजार वर्षे नोसोसचा नाश करून, नवीन ग्रीक लोक ग्रीस व आजूबाजूच्या बेटांत स्थायिक झाले. पुढें ते समुद्रमार्गे आशियामायनरच्या पश्चिम किनाऱ्यावर, दक्षिण इटलि व सिसिली, इतकंच काय, पण दक्षिण फ्रान्सपर्यंत गेले. त्यांनींच फ्रान्समधील मार्सेल्सची स्थापना केली. कदाचित् त्याच्यापूर्वी तेथें फोएनीशीयन लोकांची

वसाहत असावी. फोएनीशीयन मूळचे आशियामायनॉर मधील. ते धाडशी खलाशी असून, व्यापाराच्या शोधार्थ दूरदूरच्या देशांत संचार करीत. आरंभीच्या काळांत ते इंग्लंडपर्यंतहि जाऊन पोहोचले होते. इंग्लंड त्यावेळीं रानटी स्थितींत असून, जिब्राल्टरच्या सामुद्रधुनींतून प्रवास करणेहि त्यावेळीं धोक्याचं असे.

हळुं हळूं ग्रीसच्या प्रमुख स्थळीं, अथेन्स, स्पार्टा, थेब्ज, कोरीन्थ, यासारखी प्रसिद्ध शहरें उदयास आलीं. ग्रीकांच्या-त्यांना हेलेन्सही म्हण-तात--आरंभीच्या काळाची मोठी रसभरीत वर्णनं, इलीयड व ऑडीसी या दोन महाकाव्यांत आढळून येतात. तुला या दोन महाकाव्याविषयीं थोडी फार माहिती आहेच. एका दृष्टीनं आपल्याकडील रामायण व महाभारताशीं त्यांचं साम्य आहे. अंधळ्या होमरनं हीं काव्यं लिहिलीं असं म्हणतात. रुपवति हेलेनला, पॅरिसनं आपल्या ट्रॉयनगरींत कसं पळ-वून नेलं व तिच्या सुटकेकरितां ग्रीक राजे व सरदार यांनीं ट्रॉयवर कसा छापा घातला, या संविधानकावर इलियड हें काव्य रचण्यांत आलं आहे. ऑडीसी म्हणजे, ट्रायच्या छाप्यानंतर परत येत असतांना ओडीशियस् अर्थात् उलिसेस् यानं केलेल्या भ्रमणाची हकिगत. ट्रॉय म्हणजे आशिया-मायनॉरमधील समुद्र किनाऱ्यापासून फारसं दूर नसलेलं छोटसं शहर. गेलीं कित्येक शतकें, तें अस्तित्वांत नसलं तरी एका कवीच्या प्रतिभेनं तें अमर केलं गेलं आहे.

हेलेन्स अथवा ग्रीक लोक अशा रीतीनं, झपाट्यानं प्रबळ बनत असतांनाच, दुसरी एक सत्ता नकळतपणें उदयास येत होती. याच सत्तेनं पुढं ग्रीस जिंकून, त्याला वैभवाच्या शिखरावरून खालीं ओढलं. ग्रीकांच्या भरभराटीच्या काळांतच रोमची स्थापना झाली. त्याला

जगाच्या रंगभूमीवर महत्व येण्यास अद्याप कालावधि होता; पण ज्या शहराला पुढें 'जगाची सम्राज्ञी' 'शाश्वत शहर' अशी नांवं प्राप्त झालीं, त्या थोर शहराचा उदय खास उल्लेखनीय आहे. रोमच्या स्थापनेविषयीं बऱ्याच चमत्कारिक दंतकथा रूढ आहेत. या कथाप्रमाणें ज्यांनीं रोमची स्थापना केली, त्या रेम्स व रोम्युलस् यांना एका लांडगीनं पळवून नेलं होतं. कदाचित् ही गोष्ट तुला माहितहि असेल.

रोमच्या स्थापनेच्या सुमारास किंवा त्या पूर्वी थोडे दिवस प्राचीन जगांतील आणखी एक शहर अस्तित्वात आलं. हें शहर म्हणजे आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर फ़ीएनीशीयन लोकांनीं वसविलेलं कार्थेज. कार्थेजचं समुद्रावरून प्रभुत्व दांडगं असून, त्याचं रोमबरोबर हाडवैर होतं. या दोघांत पुष्कळ युद्धं झालीं. शेवटीं रोमचा विजय होऊन, त्यानं कार्थेजचा पुरा नाश केला.

यानंतर आपण पॅलेस्टाईनकडे ओझरती नजर फेकूं. अर्थात् पॅलेस्टाईन यूरोपमध्यें नाहीं किंवा त्याला फारसं ऐतिहासिक महत्व नाहीं. पण बायबलच्या जुन्या करारांत पॅलेस्टाईनचा उल्लेख असल्यामुळं, पुष्कळ लोकांना पॅलेस्टाईनच्या पूर्वेतिहासाबद्दल कुतुहल वाटतं. ज्यू लोकांच्या टोळ्या या लहान प्रदेशांत स्थायिक झाल्या होत्या नि त्यांचं बाबिलोनिया ॲसिरिया व इजिप्त या शेजारच्या राष्ट्रांशी वरचेवर कलह होत असें असं नमूद आहे. अर्थात् ही हकीगत पुढें ज्यू व ख्रिश्चन धर्मांत समाविष्ट झाली नसती तर पॅलेस्टाईनबद्दल फारच थोड्या लोकांना माहिती असती.

नोसोसचा नाश झाला त्या सुमाराची गोष्ट. यावेळीं पॅलेस्टाईनमधील इस्रायल या प्रांतावर सॉल हा राजा होऊन गेला. त्याच्यानंतर डेव्हीड व डेव्हीडच्या मागून सालोमन गादीवर आला. सालोमनची चाणाक्षपणाबद्दल

अतिशय ख्याति होती. मी या तीन नांवांचा उल्लेख करीत आहे, याचं कारण तूं त्यांच्या विषयीं ऐकलं असशील—कदाचित् ती तुझ्या वाचनांतही आलीं असतील.

---

८

# ग्रीक नगर संस्थानें

११ जानेवारी १९३१

गेल्या पत्रांत, मी तुला ग्रीकलोकांबद्दल थोडी फार माहिती दिली. आपण पुन्हा एकवार त्यांच्याकडे नजर टाकून ते कशाप्रकारचे होते याची माहिती घेऊं. ज्यांना आपण कधींही पाहिलं नाहीं. अशा लोकां-विषयीं, योग्य व खरं मत बनविणं, अर्थातच कठीण आहे. आपण सध्यांच्या परिस्थितीला व जीवनक्रमाला सरावलेले असल्यामुळं आपल्याहून पूर्णपणे भिन्न अशा जगाची आपल्याला क्वचितच कल्पना करतां येते. तसं पाहिलं तर प्राचीन परिस्थिति—मग ती हिंदुस्थानांतील असो अगर चीन व ग्रीसमधील असो—सद्यःस्थितीपेक्षां फारच निराळी होती. आज आपल्याला तत्कालीन लोकांचे ग्रंथ, इमारती व इतर अवशेष यावरून तर्क बांधणं एवढीच गोष्ट शक्य आहे.

ग्रीससंबंधीची एक उद्बोधक हकिगत सांगायची म्हणजे, ग्रीक लोकांना मोठमोठीं राज्यें अगर साम्राज्यें आवडत नसत. त्यांना लहान लहान नगरसंस्थानें आवडत असत. हीं नगर संस्थानें म्हणजे छोटीं छोटीं प्रजासत्ताक राज्यें असून, मध्यभागीं शहर, सभोंवार शहरांतील अन्न पुरवठा करणारी शेतें, अशी त्यांची रचना असे. तुला माहितच आहे कीं, प्रजा-सत्ताक राज्यांत राजा नसतो या नगरराज्यांतही राजा नसे. सर्व राज्य-कारभार नगरांतील श्रीमंत लोकच पहात; सर्व साधारण माणसाला राज्य-कारभारांत थोडा किंवा मुळींच वाव नसे. याशिवाय पुष्कळ गुलाम असे होते कीं, त्यांना कसलेहि हक्क नव्हते. तीच स्थिति स्त्रियांची. अशा

प्रकारें शहरांतील लोकसंख्येपैकीं थोड्यांनाच नागरिकत्वाचे हक्क असून, त्यांनाच सार्वजनिक बाबतींत मतं देतां येत असत. त्याकाळीं सर्व नागरिकांना नगरांतील एका विविक्षित ठिकाणीं जमविता येत असल्यामुळं, त्यांची मतं घेणंही अवघड जात नसे. आज सर्व हिंदुस्थानांतील, इतकंच काय पण बंगाल अगर आग्रा प्रांतांतील मतदार एकत्र जमले आहेत, अशी कल्पना कर ! अगदींच अशक्य गोष्ट आहे ती. इतर देशापुढें हीच अडचण उभी राहिली व त्याला 'प्रातिनिधीक सरकार' हा तोडगा शोधून काढण्यांत आला. याचा अर्थ, देशांतील सर्व मतदारांनीं एकत्र जमण्याऐवजीं, त्यांनीं आपले प्रतिनिधी निवडून द्यावयाचे. या प्रतिनिधींनीं एकत्र जमून, सार्वजनिक प्रश्नांची चर्चा करावयाची व देशाकरितां कायदे करावयाचे. अशा रीतीनं सर्व साधारण मतदार देशाचा राज्यकारभार चालविण्याला मदत करतो, असं मानण्यांत येतं.

पण या पद्धतीचा ग्रीसशीं संबंध नाहीं. ग्रीसनें नगर संस्थानांपेक्षां मोठीं राज्यें न स्थापून, हा प्रश्न अंगाबाहेर टाकला. ग्रिक लोक सर्व ग्रीसभर पसरले. इटली व सिसीलीमध्यें त्यांनीं प्रवेश केला, भूमध्यसमुद्रालगतच्या प्रदेशावरही त्यांनीं आपला पाय रोविला; पण आपल्या नियंत्रणाखालील कोणत्याही प्रदेशावर त्यांनीं एक सरकार अगर साम्राज्य स्थापन करण्याचा प्रयत्न केला नाहीं. ज्या ज्या ठिकाणीं ते गेले, त्या त्या ठिकाणीं त्यांनीं नगर संस्थानेंच स्थापिली.

तुला असं आढळून येईल कीं, आपल्या हिंदुस्थानांतही पूर्वी ग्रिक नगर संस्थानासारखी छोटींछोटीं प्रजासत्ताक राज्यें होतीं, पण तीं फार काळ न टिकतां त्यांना मोठ्या राज्यांत समाविष्ट व्हावं लागलं. अशाहि स्थितींत, आमच्या ग्रामपंचायतींना बराच काळ पुष्कळशी सत्ता होती.

मला वाटतं, उत्साहाच्या भरांत, आर्य लोक प्रथम जिथं जिथं गेले, तिथं तिथं त्यांनीं नगर संस्थानें स्थापन केली. पण पुढें भौगोलिक परिस्थिती व जुन्या संस्कृतीशीं आलेला संबध यामुळें, वसाहती केलेल्या बहुतेक देशांत, त्यांना ही कल्पना सोडून द्यावी लागली. इराणमध्यें मोठें राज्य स्थापन करण्याकडे कल होऊं लागला. ग्रीसमध्यें तेवढी हीं नगर संस्थानें बराच काळ. जगप्रसिद्ध ॲलेक्झांडरच्या काळापर्यंत टिकलीं. ॲलेक्झांडरनं मात्र नगर संस्थानांना धक्का देऊन, जग जिंकण्याचा प्रथम प्रयत्न केला. या ॲलेक्झांडरबद्दल आपल्याला पुढं बोलायचं आहे.

ह्या नगर संस्थानांचें एकीकरण करून, एक मोठें राष्ट्र अगर लोकसत्ताक राज्य करण्याची खुद्द ग्रीकांची तयारी नव्हती. त्यांनीं वेगवगळीं व स्वतंत्र राज्यें कायम राखिलीं. इतकच नव्हे तर, त्यांच्यांत इतक तीव्र वितुष्ट असें कीं, त्याचा बहुधा युद्धांत स्फोट झाल्याशिवाय रहात नसे.

आणि अशा स्थितींतही या सर्व नगर संस्थानांना सांधणारे समान असे बरेच दुवे होते. त्यांची भाषा एक, संस्कृति एक व धर्महि एकच होता. त्यांच्या धर्मात अनेक देवदेवता असून, हिंदुधर्माप्रमाणेंच त्यांची पुराणं संपन्न व रमणीय आहेत. ग्रीक लोक सौंदर्याचे उपासक होते. त्यांनीं घडविलेल्या पाषाणाच्या व संगमरवरी पुतळ्यांपैकीं अद्यापहि कांहीं अस्तित्वांत असून, ते नितांत सुंदर वाटतात. आरोग्य व शरीरसौष्ठवावर त्यांचा कटाक्ष असे व याकरितां त्यांनीं विविध खेळ व शर्यती यांचा उपक्रम सुरु केला. दरवर्षीं ऑलिम्पीया येथें प्रचंड प्रमाणावर मर्दानी खेळांचे सामने होत नि त्याकरितां ग्रीसच्या सर्व भागांतील लोक तेथें जात. सध्यां ऑलिम्पीक सामनें होतात, हें तुला ऐकून माहीत असेलच. ऑलिम्पीक हे नांव, ऑलिम्पीया येथें होणाऱ्या जुन्या ग्रीक साम-

त्यांवरून घेऊन ते सध्यां निरनिराळ्या देशामध्यें होणाऱ्या जागतिक सामन्यांना देण्यांत आले आहे.

अशा रीतीनं ग्रीक नगर संस्थानें अलग जीवन कंठीत, खेळांच्या निमित्तानं एकत्र येत व सदां एकमेकांशी लढत. मात्र जेव्हां बाहेरून एक मोठें परचक्र आलं, तेव्हां त्याला प्रतिकार करण्यासाठीं, ते एकवटले. हें परचक्र म्हणजे इराणची स्वारी. पण त्याविषयीं आपल्याला पुढें चर्चा करावयाची आहे.

---

९

# पश्चिम आशियांतील राज्यें

१३ जानेवारी १९३१

समाधानाची गोष्ट म्हणजे काल तुम्हां सगळ्यांना भेटतां आलं. पण दादूना पाहून मला धक्काच बसला, आजारामुळं दादूंची प्रकृति फारच खराब झालेली दिसली. त्यांच्यावर चांगलं लक्ष ठेव व त्यांना पूर्वी-सारखं निरोगी नि धडधाकट कर. काल तुझ्याशीं मला फारसं बोलतां आलं नाहीं. असल्या घाईघाईच्या भेटींत काय बोलतां येणार ? म्हणूनच आपल्याला मुलाखतींत जे बोलतां येत नाहीं त्याची उणीव मी ही पत्रं लिहून काढीत आहे. पण त्यांच्या मानानं पत्रं म्हणजे अगदींच दरिद्री प्रकार व पत्रद्वारें आणलेलं उसनं अवसानही फार वेळ टिकत नाहीं. तथापि या उसन्या अवसानामुळेंहि कधीं कधीं बरं वाटतं.

नुकतीच आपण प्राचीन ग्रीकलोकाबद्दलची माहिती घेतली. यावेळीं इतर देशांत काय चाललं होतं ? तत्कालीन युरोपांतील दुसऱ्या देशांचा विचार करून, डोक्याला शीण देण्याचं कारण नाहीं. त्यांची तत्कालीन उद्बोधक अशी माहिती उपलब्ध नाहीं, निदान मला तरी ती अज्ञात आहे. यावेळीं कदाचित् उत्तरयुरोपांतील हवामान बदलत असावं व त्यामुळं नवीन स्थिति उद्भवली असावी. तुला कदाचित् आठवत असेल कीं, फार फार पूर्वी, सर्व उत्तरयुरोप व उत्तरआशियाची हवा अत्यंत थंड होती. या काळाला हिमयुग म्हणतात. इथूनच बर्फाचे प्रचंड थर ( हिमनद्या ) वहात वहात थेट मध्ययुरोपपर्यंत येत. मनुष्यप्राणी त्या-काळीं कदाचित् अस्तित्वांत नसावा; अगर असला तरी त्याच्यांत माणसा-

पेक्षां जनावराचा अंश अधिक असावा. त्या काळीं हिमनद्या वहात असत हें मी सांगत असल्याचं पाहून तुला कदाचित् आश्चर्य वाटेल! अर्थात, त्यांची माहिती कोणत्याहि ग्रंथांत असणं शक्य नाहीं. त्याकाळीं ग्रंथ नव्हते व ग्रंथ-लेखकहि नव्हते. मला वाटतं, तूं निसर्गाच्या लेखनकार्याविषयीं विसरली नसशील. निसर्गाची लेखनाची एक विशिष्ट पद्धत आहे. आपला इतिहास तो मोठमोठ्या खडकांवर व शीळावर सतत लिहीत असतो. ज्यांना हा इतिहास वाचण्याची इच्छा आहे त्यांना तो वाचतांहि येईल. हा इतिहास म्हणजे निसर्गाचं एक प्रकारचं आत्मचरित्रच होय. हिमनद्या ज्या प्रदेशांतून वहातात त्या प्रदेशांत आपल्या अस्तित्वाच्या खुणा ठेवतात. एकदां ह्या खुणा ओळखतां येऊं लागल्या कीं, तूं त्या क्वचितच विसरशील. या खुणा तुला अभ्यासावयाच्या असतील तर, हिमालय अगर आल्प्स पर्वतावरील सध्यांच्या हिमनद्याकडे जावं लागेल. आल्प्स पर्वतावरील मौंट ब्लॉकच्या आजूबाजूच्या हिमनद्या तूं पाहिल्या आहेस; पण तुला त्यावेळीं त्यांच्या विशिष्ट खुणा कुणी सांगितल्या नसतील. सध्यां काश्मिर व हिमालयाच्या इतर भागांत पुष्कळ प्रेक्षणीय हिमनद्या आहेत. आपल्याला अगदीं जवळची हिमनदी म्हणजे पिन्डरी. आल्मोराहून या ठिकाणीं पायीं जाऊन पोहोचायला एक आठवडा लागतो. मी लहान—तुझ्यापेक्षांहि पुष्कळ लहान—असतांना तिथं एकदां गेलो होतो. मला त्याची चांगली स्मृति आहे.

खरंच, पूर्वीचा इतिहास सांगायचं सोडून, मी हिमनद्या नि पिंडरी यांतच अक्षरशः वहावत चाललो! हा उसन्या अवसानाचा परिणाम! जणूं काय तूं माझ्याजवळ असून, मी तुझ्याशीं बोलत आहे, असं मला वाटलं पाहिजे आणि तसं वाटण्यासाठीं, मधून मधून हिमनद्या व तत्सम गोष्टीकडे वळलं पाहिजे.

हिमयुगाचा उल्लेख आला म्हणूनच आपण हिमनद्याकडे वळलो. हिमनद्या मध्ययुरोप व इंग्लंडपर्यंत वहात आल्या असं आपण म्हणतो. याचं कारण तशा खुणा तिथं सापडतात. ह्या खुणा जुन्या खडकांवर आढळून येतात नि त्यामुळें, त्या काळीं सर्व मध्य व उत्तर युरोपांत अतिशय थंडी असली पाहिजे, असं वाटायला लागतं. हळुं हळूं हवामान उष्ण होऊं लागले व हिमनद्या नाहींशा होत चालल्या. भूगर्भशास्त्रज्ञांच्या मतें अतिशय थंडी नंतर उष्णतेची लाट आल्यामुळें, त्याकाळीं युरोपमध्यें, सध्यां पेक्षांहि अधिक उष्ण हवामान होतं. याच उष्ण हवामानामुळं, युरोपांत दाट जंगलं वाढलीं.

आर्यलोक भटकतां भटकतां मध्ययुरोपांतही गेले. तिथं त्यांनीं त्या काळीं नमूद करण्याजोगं कांहीं केलं असल असं दिसत नाहीं. अशा स्थितींत या प्रसंगीं आपण त्याच्याकडे दुर्लक्ष केलं तरी चालेल. या काळांतलि मध्य व युरोपांतील लोकांत, ग्रीस व भूमध्य प्रदेशांतील सुधारलेले लोक रानटी समजत. पण हे रानटी लोक जंगलांतलि व खेड्यापाड्यांतील निरोगी व लढाऊ जीवनक्रम कंठीत असत. अशा रीतीनं न कळत ते दक्षिणेकडील सुधारलेल्या लोकांचीं राज्यें उलथून पाडण्याची पूर्व तयारीच करीत होते. पण ही पुष्कळ दिवसानंतरची गोष्ट. त्याबद्दल आजच तर्क करण्याची जरूरी नाहीं.

उत्तर युरोपची थोडीतरी माहिती मिळाली. पण तत्कालीन इतर खंडांची व अनेक देशांची कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. अमेरिका कोलंबसानं शोधून काढली असं म्हणतात. याचा अर्थ असा नव्हे कीं, कोलंबसापूर्वी, अमेरिकेंत सुधारलेले लोक नव्हते. पण कांहीं कां असेना, ज्या काळाविषयीं आपण बोलत आहोत, त्या काळच्या अमेरिकेविषयीं

कांहींच माहिती नाहीं. याशिवाय इजिप्त व भूमध्य समुद्र किनारा वग-ळला तर बाकीचे आफ्रिका आदि खंड आपल्याला अज्ञातच आहेत. या सुमारास इजिप्तमधील थोर व प्राचीन संस्कृति घसरगुंडीला लागली होती. तरीहि तो एक देश म्हणून अस्तित्वांत होता.

आतां आशियांतील घडामोडीचा विचार केला पाहिजे. तुला माहितच आहे कीं, आशियांतील प्राचीन संस्कृतीचीं केंद्रें तीन आहेत. मेसोपोटेमिया हिंदुस्थान व चीन.

या आरंभीच्या काळांत, मेसोपोटेमिया इराण व आशियामायनॉर-मध्यें साम्राज्यामागून साम्राज्यें आलीं नि गेलीं. ॲसिरीयन, मेडीयन, बाबीलोनियन व शेवटीं पार्शियन अशीं हीं साम्राज्यें झालीं. हीं साम्राज्यें आपसांत कशीं लढलीं, कांहीं काळ त्यांचे संबंध कसे सलोख्याचे असत, त्यांनीं एकमेकांचा कसा नाश केला, याच्या तपशीलांत शिरण्याचं आपणांस कारण नाहीं. तुला ग्रीक नगर संस्थानें व पश्चिम आशियांतील साम्राज्यें यांतील भेद लक्षांत येईल. अगदीं आरंभापासून या देशांत, मोठं राज्य अगर साम्राज्य याबद्दल अभिलाषा आढळून येते. कदाचित् त्यांच्या प्राचीन संस्कृतीचाहि हा परिणाम असेल किंवा त्याला दुसरीं कांहीं कारणं असतील.

याच काळांतील एक नांव तुला मनोरंजक वाटेल. हें नांव म्हणजे क्रोएसस्. तूं तें एकलंहि असशील. ' क्रोएसस् सारखं श्रीमंत होणं ' अशी इंग्लीशमध्यें म्हणच पडली आहे. क्रोएसस् किती श्रीमंत नि घमेंडखोर होता, पण शेवटीं त्याचा मद कसा उतरला, याबद्दलच्या गोष्टी तूं वाचल्याहि असशील. क्रोएसस् हा लिडीयाचा राजा. हें लिडीया आशि-याच्या पश्चिम किनाऱ्यावर, सध्यां जेथें आशियामायनॉर आहे, तेथें होतं. समुद्राला लागूनच हा देश असल्यामुळं, त्या ठिकाणचा व्यापारहि

मोठा असला पाहिजे. या काळांत सायरच्या अमलाखालीं पर्शियन साम्राज्य बलाढ्य होत होतं. पुढें सायरस व क्रोएसस् यांच्यांत वितुष्ट येऊन सायरसनं क्रोएससचा पराभव केला. या पराभवाची हकिगत व दारिद्र्य आल्यामुळें मदांध क्रोएसस् कसा भानावर आला याची माहिती हेरोडोटस नामक एका प्रसिद्ध ग्रीक इतिहासकारानं लिहून ठेवली आहे.

सायरचं मोठं साम्राज्य असून, कदाचित् तें पूर्वेकडे हिंदुस्थानच्या सीमेपर्यंत भिडलेलं असावं. त्याच्या वारसापैकीं डरीयसचं साम्राज्य तर त्याहूनहि मोठं होतं. इजिप्त, मध्यआशियांतील व हिंदुस्थानांतील सिंधूनदीजवळील कांहीं प्रदेश, त्याच्या साम्राज्यांत मोडत असे. हिंदुस्थानांतील त्याच्या अंकित प्रदेशांतून बरंच खनिज सोनं त्याच्याकडे खंडणीदाखल रवाना होई. यावरून त्याकाळीं, सिंधूच्या आसपास बरंच सोनं सांपडत असावं असं दिसतं. सध्यां तिथं सोनं तर सांपडत नाहींच; पण तो सर्व प्रदेश उजाड आहे तेथील हवामान बदललं आहे याचं हें निदर्शक आहे.

तूं जर इतिहास वाचून गतकालीन परिस्थितीचा विचार करून त्याची सद्य:स्थितीबरोबर तुलना करशील तर, एक गोष्ट विशेष मनोरंजक वाटेल तुला. ती म्हणजे मध्य आशियांतील झालेलीं स्थित्यंतरें. याच प्रदेशांतून स्त्रीपुरुषांच्या असंख्य टोळ्या निघाल्या व त्या दूरदूरच्या प्रदेशांत पसरल्या. याच प्रदेशांत श्रेष्ठ, बलाढ्य, संपत्तीमान व दाट वस्तीचीं-आजच्या कलकत्ता अगर मुंबईहून फार मोठीं शहरें असून, त्यांचीं तुलना युरोपांतील सध्यांच्या महत्वाच्या राजधान्यांशीं होईल. याच प्रदेशांत हिरवीगार वनश्री व सुंदर उद्यानं असून, हवामान समशीतोष्ण व आल्हाददायक होतें. पण या साऱ्या झाल्या गेलेल्या गोष्टी. आज कित्येक शतकें, हाच प्रदेश उजाड व जवळ जवळ वालुकामय आहे. तेथील प्रसिद्ध

शहरांपैकीं, समरकंद, बुखारा अद्यापहि तग धरून आहेत. त्यांच्यामुळें अनेक स्मृति–चित्रें डोळ्यापुढें येतात; पण आज ती फक्त आपल्या गतकालीन 'स्वत्वा'चीं पिशाच्यें म्हणून वावरत आहेत.

मी पुन्हां तर्क लढवीत आहे. आपण ज्या काळाचा विचार करीत आहोत, त्या काळांत समरकंद व बुखारा हीं शहरें नव्हतीं. त्यांचा उदय व्हावयाचा होता. त्यांच्यावर अद्याप भविष्य काळाचा पडदा पडावयाचा होता नि मध्य आशियाची भरभराट व पतन या गोष्टी घडावयाच्या होत्या.

———

१०

# जुन्या रुढींची अडगळ

१४ जानेवारी १९३१

तुरुंगांतील जीवनक्रमामुळं, मला कांहीं विचित्र संवयी जडल्या आहेत. यापैकींच एक म्हणजे मी फार लवकर—अगदीं पहाटेपूर्वी—जागा होतो. ह्या संवयीला प्रारंभ गेल्या उन्हाळ्यापासून झाला. पहाट होत असतांना आकाशांतील तारे एकामागून एक मावळत असल्याचं दृश्य मला आवडे. पहाटेपूर्वीचा चंद्रप्रकाश व प्रभातकाळांतील मंद परिवर्तन, तूं कधीं पाहिलं आहेस कां ? चंद्रप्रकाश व अरुणोदय यांचं द्वंद्व मी पुष्कळ वेळां पाहिलं आहे. या द्वंद्वांत अरुणोदय नेहमीच विजयी होतो. पहाटेपूर्वी जो चमत्कारिक अर्धवट प्रकाश असतो, तो चंद्रप्रकाश कां उगवत्या दिवसाचा प्रकाश, हें ओळखणं कठीण पडतं. नंतर हा भ्रम एकदम नाहींसा होतो नि कळून येतं कीं, लख्ख उजाडलं असून द्वंद्वांत पराभूत झालेल्या निस्तेज चंद्रानं काढता पाय घेतला आहे.

माझ्या या संवयीप्रमाणें, आकाशांत तारे लुकलुकत असतांनाच मी जागा झालों. पहाटे पूर्वींचं हवेंतील चमत्कारिक वातावरण प्रभातच्या आगमनाची ग्वाही देत होतं. मी वाचायला सुरवात केली; पण दूरच्या आरोळ्यांनीं व दंगलीनं या प्रातःकालीन शांततेचा भंग झाला. हळूंहळूं त्या वाढत चालल्या. माझ्या लक्षांत आलं कीं, आज संक्रांत. आजच माघ मेळ्याला आरंभ झाला. हजारों यात्रेकरूंचा मेळा त्रिवेणी संगमाकडे प्रातःस्नानाला चालला होता. त्रिवेणी संगम म्हणजे गंगा-यमुना संगम व त्या ठिकाणीं सरस्वती ही नदी त्यांना मिळते असा समज आहे. हे

यात्रेकरू जातांना पदें म्हणत होते व मधून मधून 'गंगा माताकी जय' असा जयघोष करीत होते. त्यांचा जयघोष, बंदीशाळेच्या भिंतीपलीकडून माझ्या कानांवर आदळत होता. मी ऐकून विचार करूं लागलों. श्रद्धेची शक्ति किती मोठी आहे? आपलं दारिद्र्य व दुःख विसरायला लावून, दूरदूरच्या प्रांतांतील लाखों लोकांना, याच श्रद्धेनं गंगाबाईकडे ओढून आणलं होतं. वर्षामागून वर्ष अशीं शेकडों नव्हे हजारों वर्षे ते त्रिवेणी संगमाकडे येत होते. व्यक्ति येतात नि जातात. नवीं नवीं राज्यें व साम्राज्यें उदयास येतात, सत्ता गाजवितात व भूतकालांत अंतर्धान पावतात; पण प्राचीन रुढी शतकानुशतकं चालतात व पिढ्यामागून पिढया त्यापुढें माना लववितात. रुढीविषयीं म्हणशील तर, त्यांतील बरचसं घेण्याजोगं असलं तरी कित्येक वेळां त्या भयंकर अढगळीप्रमाणें होऊन रहातात; त्यामुळें आपल्याला प्रगति करतां येत नाहीं. १३०० वर्षांपूर्वी ( अर्थात् मेळ्याची परंपरा त्यावेळींही कितीतरी जुनी होती. ) या मेळ्याची जी माहिती लिहिली गेली आहे, ती वाचली तर आपण प्राचीन काळाशीं एका अखंड दुव्यानं जोडलों गेलों आहोंत हा रोमहर्षक विचार मनांत येतो; पण ज्यावेळीं आपल्याला पुढं जावयाचं असतं, त्यावेळीं आपल्याला रोखून धरण्याची चमत्कारिक संवय या रुढीशृंखलेला आहे. ती आपल्याला रुढीच्या मिठींत जवळ जवळ बंदीवान करून टाकते. आपल्याला भूतकाळाचे पुष्कळ दुवे कायम ठेवावे लागतील; पण ज्या ज्या ठिकाणीं आपल्या पुढील प्रवासांत अडथळा येतो, त्या त्या ठिकाणीं रुढींचा बंदीवास तोडला पाहिजे.

गेल्या तीन पत्रांत, आपण इसवी सनापूर्वीच्या ३००० तें ३५०० वर्षांच्या काळांतील जगाचं चित्र रेखटण्याचा प्रयत्न केला. मी नक्की कालाचा उल्लेख केलेला नाहीं. मला तें आवडत नाहीं व तूंहि त्या बाब-

तींत डोक्याला फारसा शीण देऊं नकोस. याशिवाय या काळांत घडलेल्या प्रसंगांचा नक्की काल मिळणं कठीण. पुढें मात्र प्रसंगांची सुसंगतता राखण्यासाठीं, कांहीं महत्वाच्या तारखा अगर सनावळी लक्षांत ठेवणं जरूर वाटेल. आज आपल्याला फक्त प्राचीन जगाचं सर्व साधारण चित्रं रेखाटायचं आहे.

आपण आतांपर्यंत ग्रीस, भूमध्य समुद्र किनाऱ्यावरील प्रदेश, इजिप्त, आशियामायनॉर व इराण यांचं ओझरतं अवलोकन केलं. आतां आपण आपल्या देशाकडे वळूं. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास अभ्यासितांना एक मोठी अडचण उद्‌भवते. तत्कालिन आर्यलोकांनीं किंवा हिंदीं लोकांनीं इतिहास ग्रंथ लिहिण्याची कधींच पर्वा केली नाहीं. आपण पूर्वीच्या पत्रांतून पाहिलचं आहे कीं,आर्यलोक अनेक बाबतींत पुढारलेले होते.त्यांनीं लिहिलेले ग्रंथ म्हणजे वेद, उपनिषदें, रामायण, महाभारत. हे ग्रंथ फक्त बुद्धिमान लोकच लिहूं जाणे ! या व इतर साधनसामुग्रीमुळें प्राचीन इतिहासाच्या अभ्यासास मदत होते, तत्कालिन चालीरीती व आचार विचार कळतात; पण हे ग्रंथ म्हणजे तंतोतंत इतिहास नव्हेत. संस्कृतांतील एकच एक खरा इतिहास म्हणजे काश्मिरचा इतिहास व तोहि पुढें बऱ्याच काळा-नंतर लिहिला गेला. या इतिहास ग्रंथाचं नांव राजतरंगिणी असं असून, तो कल्हण नामक इतिहासकारानं लिहिला. सध्या रणजित पप्पा ( पंडित ) या ग्रंथांचा अनुवाद करीत असून, तो जवळ जवळ पुरा होत आला आहे. हा फारच जाडा ग्रंथ आहे. जेव्हां त्याचा संपूर्ण अनुवाद प्रसिद्ध होईल, तेव्हां अर्थातच आपण तो उत्सुकतेनं वाचूं. दुर्दैवानं आपण तो मूळ संस्कृतांत वाचूं शकत नाहीं. कारण आपल्यापैकीं बहुतेकांना संस्कृत येत नाहीं. या ग्रंथामळं आपल्याला प्राचीन काळची विशेषतः काश्मिरा-

विषयींची समग्र माहिती मिळेल. तुला माहितच आहे कीं, काश्मिर हें आपलं पुरातन धाम.

आर्य लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वीच, हिंदुस्थान सुधारलेला होता. सध्यां वायव्य सरहद्द प्रांतात मोहेंजादारो येथें जे अवशेष सांपडले आहेत, त्यावरून आर्यांनीं हिंदुस्थानांत पाऊल ठेवण्यापूर्वी तेथें महान् संस्कृति अस्तित्वांत होती, असं दिसतं. पण अद्यापि त्याविषयीं आपणास फारशी माहिती नाहीं. कदाचित् पुढें कांहीं वर्षांत पुराणवस्तु संशोधकांनीं व प्राचीन अवशेषांचा अभ्यासकरणाऱ्या लोकांनीं, तेथील मिळण्यासारखी सर्व सामुग्री खोदून काढल्यानंतर, आपल्याला आणखी बरंच कळण्याचा संभव आहे.

या व्यतिरिक्त एक गोष्ट मात्र स्पष्ट आहे व ती म्हणजे द्राविडी लोकांची संपन्न अशी संस्कृति दक्षिण हिंदुस्थानांत व कदाचित् उत्तर हिंदुस्थानांतही असावी. त्यांच्या भाषा आर्यसंस्कृत भाषेच्या कन्यका नसल्या तरी फार पुरातन असून, त्या सुंदर वाङ्मयांनीं नटलेल्या आहेत. या भाषा म्हणजे तामीळ, तेलगू, कानडी व मल्याळी या असून, त्या दक्षिण हिंदुस्थानांत अद्यापहि प्रचारांत आहेत. तुला कदाचित् माहित असेल कीं, हिंदी-राष्ट्रीय सभेनं ब्रिटिश सरकारपेक्षां निराळ्या रीतीनं, म्हणजे हिंदुस्थानची भाषावार प्रांत रचना केली आहे. ही पद्धत फार चांगली आहे. त्यामुळें एकाच प्रकारचे, एकच बोली बोलणारे नि जवळ जवळ सारख्याच चालीरीती असलेले लोक एकाच प्रांतांत समाविष्ट होतात. राष्ट्रीय सभेचें दक्षिण हिंदुस्थानांतील प्रांत म्हणजे उत्तर मद्रास मधील आंध्र देश, तामील नाड, मुंबईच्या दक्षिणेकडील कर्नाटक प्रांत व केरळ ( जवळ जवळ मलबार ) हें असून, या प्रांतांत अनुक्रमें तेलगू, तामील,

कानडी व मल्याळी या भाषा प्रचारांत आहेत. हिंदुस्थानच्या भावी प्रांत-रचनेंत त्या त्या प्रदेशांतील भाषाकडे बरंचसं लक्ष दिलं जाईल. ही गोष्ट संशयातीत आहे.

या ठिकाणीं हिंदुस्थानांतील भाषांविषयीं अधिक माहिती सांगण्यास हरकत नाहीं. युरोपांतील कांहीं लोकांचा व इतरत्रहि असा समज आहे कीं, हिंदुस्थानांत शेकडों भाषा आहेत. हा समज अगदींच हास्यास्पद असून, तसं म्हणणारा गृहस्थ आपलं अज्ञानच प्रगट करतो. हिंदुस्थान सारख्या मोठ्या देशांत अनेक बोली अथवा एकाद्या भाषेचे वेगवेगळे स्थानिक वाक्प्रचार अस्तित्वांत असणं सहाजिकच आहे. याशिवाय देशांतील निरनिराळ्या भागांत पुष्कळ डोंगराळ--टोळ्या व इतर जे छोटे समाज आहेत, त्यांच्या विशिष्ट बोली आहेत. पण हिंदुस्थानचा विचार करतांना या गोष्टी गौण आहेत. फक्त शिरगणतीच्या दृष्टीनं काय तें त्यांना महत्व. कदाचित् माझ्या एका आरंभीच्या पत्रांत मी तुला सांगितलही असेल कीं, हिंदुस्थानांतील भाषांचे प्रत्यक्ष असे दोनच वर्ग पडतात. एक वर उल्लेखलेली द्राविडी व दुसरा हिंदी—आर्यन. मुख्य हिंदी आर्य-भाषा संस्कृत ही असून, हिंदुस्थानांतील बाकीच्या हिंदी—आर्य भाषांची उत्पत्ति संस्कृतपासूनच आहे. या भाषा म्हणजे हिंदी, बंगाली, गुजराथी व मराठी या होत. या शिवाय दुसरेही कांहीं भाषाप्रकार अस्तित्वांत आहेत. आसाममध्ये आसामी व ओरिसा किंवा उत्कल प्रांतांत उरिया या भाषा प्रचारांत आहेत. उर्दू हा हिंदीचाच एक प्रकार असून हिंदुस्थानी हा शब्द हिंदी व उर्दू या दोहोंबद्दल वापरतात. हिंदुस्थानांतील प्रमुख भाषांच संख्या अवघी दहा असून त्या म्हणजे हिंदुस्थानी, बंगाली, गुजराथी मराठी, तामीळ, तेलगु, कानडी, मल्याळी, उरिया व आसामी या होत

यापैकीं हिंदुस्थानी ही आपली मातृ–भाषा पंजाब, संयुक्तप्रांत, बिहार, मध्यप्रांत, राजपुताना, दिल्ली व मध्य हिंदुस्थान या प्रदेशांत बोलली जाते. हा प्रदेश विस्तीर्ण असून तेथील लोकसंख्या पंधरा कोट आहे. अशा रीतीनं १५ कोट लोक थोड्याफार फरकानं हिंदुस्थानी बोलतात व तुला माहितच आहे कीं, हिंदुस्थानच्या बहुतेक भागांतील लोकांना ती कळते. हिंदुस्थानची ती सामान्य भाषा होण्याची शक्यता आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, मी वर उल्लेखिलेल्या इतर प्रमुख भाषा नामशेष व्हाव्यात. त्या प्रांतिक भाषा म्हणून राहिल्याच पाहिजेत. सुंदर वाङ्मयांनीं त्या अलंकृत आहेत. शिवाय त्यांची उत्कृष्ट जोपासना झाली आहे. अशा भाषांना तेथील लोकांना पारखे करणं योग्य नाहीं. लोकांच्या विकासाचं व त्यांच्या मुलांबाळांच्या शिक्षणाचं एकमेव माध्यम म्हणजे त्यांची भाषा. हिंदुस्थानांत सध्यां प्रत्येक बाबतींत उलथा-पालथ झाली आहे नि आज आपण आपआपसांतही इंग्लीशचाच बराच उपयोग करतो. मी तुला इंग्लीशमधून पत्र लिहणं अत्यंत हास्या-स्पद असलं तरी, मी तसं करीतच आहे! आपली ही संवय लवकर जाईल, अशी मला आशा आहे.

———

११

# प्राचीन हिंदुस्थानांतील ग्रामपंचायती

१५ जानेवारी १९३१

आपलं प्राचीन इतिहासाचं परिक्षण आटपायचं कसं ? मुख्य रस्ता सोडून मी वळणं घेत जातो. माझ्या गेल्या पत्रांत मी विषयाला सुरवात केली नाहीं तोंच हिंदुस्थानच्या भाषांवरचं पुराण सुरु केलं.

आतां, प्राचीन हिंदुस्थानाकडे वळूं. तुला माहितच आहे कीं, आजचा अफगाणिस्थान, त्यावेळीं व नंतरही बराच काळपर्यंत हिंदुस्थानांत मोडत असे. हिंदुस्थानच्या वायव्य प्रदेशाला त्यावेळीं गांधार म्हणत. सर्व उत्तर हिंदुस्थानांत गंगा–सिंधूच्या खोऱ्यांतून त्यावेळीं आर्यांच्या मोठ्या वसाहती होत्या. या आर्य वसाहतवाल्यांना इमारती बांधण्याची कला चांगलीच अवगत असावी. कारण त्यांच्यापैकीं बरेच जण इराण व मेसो-पोटेमियांतून आले होते व तेथें तर त्यावेळीं मोठमोठीं शहरें अस्तित्वांत होतीं. आर्य वसाहती तुटक असून, त्यांच्यामध्यें बरीचशी अरण्यें होतीं. विशेषतः उत्तर हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थान यांच्यामध्यें एक मोठ अरण्य होतं. हें अरण्य ओलांडून, आर्य लोक वसाहतीसाठीं दक्षिणेंत गेले असतील, ही गोष्ट असंभवनीय वाटते; पण सामुदायिकरित्या नसलं तरी वैयक्तिकरित्या पुष्कळ आर्य संशोधन, व्यापार, आर्यसंस्कृतीचा प्रचार वगैरेसाठीं दक्षिण हिंदुस्थानांत खात्रीनं गेले असले पाहिजेत. प्राचीन दंत-कथेप्रमाणं, दक्षिणेकडे जाणारा पहिला आर्य, अगस्ति ऋषी हा होता. त्यानं आर्यधर्म व संस्कृति यांचा संदेश द्राविडी लोकांना दिला,

यावेळपावेतों हिंदुस्थानचा परदेशाशीं बराच व्यापार वाढला. मिरी-मिरची, सोनं, मोती यासाठीं. समुद्रापलीकडचे अनेक व्यापारी दक्षिण हिंदुस्थानांत येऊं लागले. त्यावेळीं तांदूळही बरेच निर्यात होत असे. मलबारांतील देवद्वार लांकूड तर बाबिलोनच्या प्राचीन राजप्रासादांच्या बांध कामाकरितां उपयोगांत आणल्याचं आढळून आलं आहे.

हळुहळूं, आर्यांनीं हिंदुस्थानांत आपली ग्रामीण पद्धत सुरूं केली. ही पद्धत म्हणजे जुनी द्राविडी पद्धत व आर्यांच्या नवीन कल्पना यांचं मिश्रणच. या पद्धतींतील खेडीं जवळ जवळ स्वतंत्र असून त्यावर लोक-नियुक्त पंचायतीचा अधिकार चाले. बरीचशीं खेडीं अगर छोटीं शहरें, एखादा राजा अगर जहागिरदार याच्या अमलाखालीं संघटित केली जात. राजा अगर जहागिरदार कधीं कधीं लोकनियुक्त असे, तर कधीं कधीं वंशपरंपरागत असे. रस्ते व धर्मशाळा बांधण व कालवे खोदणं व तत्सम सार्वजनिक कार्यासाठीं निरनिराळीं खेडीं सहकार्य करीत. राजा हा राज्यां-तील मुख्य व्यक्ती असली तरी, त्याला लहरीप्रमाणं कारभार करतां येत नसे. आर्यांचे सर्व कायदे व रीतीरिवाज त्यालाहि कडक रीतीनं पाळावं लागत असे. राजाला वाटेल तेव्हां राज्यावरून हुसकून लावण्याचा अगर त्याला दंड ठोठावण्याचा अधिकार प्रजाजनांना असे. L'etat c'est moi अथवा हमकरेसो कायदा, असला प्रकार त्यावेळीं अस्तित्वांत नव्हता. थोडक्यांत सांगावयाचं म्हणजे, आर्यांच्या वसाहतींत एक प्रकारची लोक-शाही नांदत होती व आर्य रहिवाश्यांना, थोड्या प्रमाणांत कां होईना, सरकारवर नियंत्रण ठेवतां येत असे.

हिंदी आर्यांची ग्रीक आर्यांबरोबर तुलना कर. त्यांच्यांत पुष्कळसा विरोधभाव असला तरी, साम्यही बरंच होतं. दोन्हीं ठिकाणीं

कांहींशी लोकशाही नांदत होती. पण एक गोष्ट आपण सदैव लक्षांत ठेविली पाहिजे व ती हीं कीं, ही लोकशाही कमी अधिक प्रमाणांत फक्त आर्यापुरतीच मर्यादित होती. गुलाम अगर ज्यांना त्यांनीं हलक्या जातींत ढकललं होतं, त्यांच्या बाबतींत लोकशाही आणि स्वतंत्रता हीं तत्वें लागूं नव्हती. हिंदुस्थानांत त्यावेळीं सध्यां सारख्या निरनिराळ्या जातींचा बुजबुजाट झाला नसला तरी, समाजाचें चार वर्ण अगर जाती अस्तित्वांत होत्या. हे वर्ण म्हणजे ब्राह्मण, किंवा विद्वान उपाध्याय ऋषी वगैरे; क्षत्रिय अथवा राज्यकर्ते; वैश्य किंवा व्यापारी व उद्योगधंद्यात गुंतलेले लोक; आणि शूद्र किंवा मजूर व कामकरी हे होत. हे वर्णभेद प्रथमतः धंद्यावर उभारलेले होते. वर्णभेद पद्धतीला आणखी एक कारण संभवतं व तें म्हणजे आर्यांची जित् लोकापासून अलिप्त राहण्याची इच्छा. आर्य हे बरेच चढेल असून, त्यांची दुसऱ्या वर्गाकडे पाहण्याची दृष्टी विपरीत होती. आपल्या लोकांनीं दुसऱ्या वर्गांत मिसळूं नये, असं त्यांना वाटत असे. जातीला संस्कृतमध्यें वर्ण हा प्रतिशब्द आहे व आर्यांच्या धोरणाचा तो स्पष्ट निदर्शक आहे. आर्यलोक हिंदुस्थानांतील मूळच्या राहिवाशापेक्षां अधिक गौरवर्णीय होते, असंहि दिसून येत.

आपण हें लक्षांत ठेवलं पाहिजे की, आर्यांनीं एका बाजूला श्रमजीवि वर्गाला पददलित ठेऊन, त्यांना लोकशाहींत कोणताही भाग ठेवला नव्हता तर दुसऱ्या बाजूला, आपसांत ते बरेचसं स्वातंत्र्य उपभोगीत. आपल्या राजाला अगर राज्यकर्त्यांला ते बेशिस्त वागूं देत नसत व एखादा राज्य-कर्ता तसा वागूं लागला तर, त्याला गादीवरून काढून टाकीत. राजे बहुधा क्षत्रिय वंशातील असत; पण युद्धकाळांत व इतर बिकट प्रसंगीं एखाद्या शूद्राला अगर खालच्या जातींतील इसमास—त्याच्यांत पात्रता असेल तर—

सिंहासन काबीज करतां येई. या पुढील काळांत मात्र आर्यांची अधोगति झाली व जातिभेद पध्दति अधिक कडक झाली. मूळच्या वर्णांत आणखी बरेच भेद पडले व त्यामुळें देश दुर्बल बनून पतित बनला. याशिवाय आर्यलोक आपल्या पूर्वींच्या स्वातंत्र्याच्या कल्पना विसरले. ' कोणताहि आर्य गुलाम होणार नाहीं व आर्यांच्या नांवाला काळिमा लावण्यापेक्षां, तो मृत्यूहि पत्करील, ' हे आर्यांचं ब्रीद असे.

आर्यांच्या वसाहतींतील खेडीं व शहरें यांची जी वाढ होई ती त्यांनी आंखणीप्रमाणें होई. विशेष मनोरंजक गोष्ट म्हणजे त्यांत भूमितीचा बराच उपयोग करण्यांत येई. त्याच्याही पुढची पायरी म्हणजे खुद्द बौद्ध धर्मांतही भूमितीविषयक आकृत्यांना स्थान देण्यांत येत असे. सध्यांही बऱ्याचशा हिंदू घरांतून भूमितीच्या कांहीं आकृत्यांचा ( रांगोळ्या ) निरनिराळ्या पूजोत्सवांत उपयोग करण्यांत येतो. आज भूमितीचा इमारतींचे बांधकाम व नगररचना यांजबरोबर निकटवर्ती संबंध आहे. आरंभीच्या आर्य खेड्यांची रचना, तटबंदी छावण्यासारखी असावी. कारण परचक्र येण्याची सदा भीति. परचक्राची भीति नाहींशी झाली, त्यावेळीं सुद्धां खेडयांची ही रचना कायम होती. एक चौकोन, सभोंवार भिंती व त्यांना चार मोठें व चार लहान दरवाजे, असं या ग्रामरचनेचं स्वरूप असे. या भिंतींच्या आंतल्या बाजूला रस्त्यांची व घरांची विशिष्ट आंखणी असे. खेड्याच्या मध्यभागीं पंचायत कचेरी असून, तेथें पंच जमत नि न्याय निवाडा करीत. लहान खेडयांत पंचायत घराऐवजीं, एका मोठया वृक्षाखालीं पंच जमत. पंचायतींतील सभासदांची निवड, गांवकरी एकत्र जमून करीत.

पुष्कळ विव्दान् लोक, शहरांत अगर खेडयालगतच्या जंगलांत जाऊन वास्तव्य करीत. साधी रहाणी ठेवणें, अध्ययन करणें व गाजावाजा

न करतां कार्य करणें, हें यांत उद्देश असत. जंगलांतच, त्यांच्याकडे पुष्कळ विद्यार्थी शिक्षणाकरितां येत. मग हळूंहळूं या गुरुशिष्यांची एक नवीन वसाहतच निर्माण होई. या वसाहतींना प्राचीन विश्वविद्यालयें म्हणण्यास हरकत नाहीं. हीं विश्वविद्यालयें सुंदर इमारतींत नसली तरी, ज्ञानार्जनाच्या हेतुनं दूरदूरचे विद्यार्थी तेथें येत.

आपल्या आनंदभुवनासमोर भारद्वाज आश्रम आहे. तुला तो चांगला माहित आहे. कदाचित् तुला माहित असेल कीं, रामायणकाळांत भारद्वाज नांवाचा एक महान् ऋषि होऊन गेला. रामचंद्रानं आपल्या वनवासांत त्याचं दर्शन घेतलं, असं म्हणतात. असंही सांगतात कीं, त्याच्या सान्निध हजारो शिष्य व विद्यार्थी असत. कदाचित् भारद्वाजाच्या कुलगुरुत्वा-खालीं, तेथें एखादं विश्वविद्यालयहि असावं. त्याकाळीं भारद्वाजाचा आश्रम गंगेच्या तीरावर होता. गंगेचं पात्र त्या ठिकाणाहून एक मैल दूर असलं तरी, त्या काळीं तशी स्थिति असणं शक्य आहे. आपल्या बागेंतील जमीन कांहीं ठिकाणीं वालुकामय आहे. त्याकाळीं ती गंगेच्या पात्रांत मोडत असावी.

हा प्राचीन काळ आर्यांच्या इतिहासांतील उज्वल काळ होय. दुर्दैवानं, या काळचा इतिहास उपलब्ध नसल्यामुळं, तत्कालीन माहिती-करितां, इतिहासाव्यतिरिक्त इतर ग्रंथावर आपणास अवलंबून राहाव लागतं. दक्षिण बिहारमधील मगध, उत्तर बिहारमधील विदेह, काशी किंवा बनारस, कोसल ( राजधानी अयोध्या किंवा अर्वाचीन फैजाबाद ) गंगा व यमुना यांच्यामधील पांचाल ही या कालांतील प्रमुख राज्यें. पांचाळ देशांतील दोन प्रमुख शहरें म्हणजे मथुरा व कान्यकुब्ज ही होत. ही दोन्ही शहरें अस्तित्वांत असून, त्यापैकीं कान्यकुब्ज म्हणजेच आजचं

कनोज असून तें कानपुराजवळ आहे. आरंभीच्या काळांतील आणखी एक शहर म्हणजे उज्जयनी. आज ते ग्वाल्हेर संस्थानांत एक छोटंखानी शहर म्हणून अस्तित्वांत आहे.

याशिवाय पाटलीपुत्र अथवा पाटणाजवळ वैशाली नांवाचं शहर होतं. प्राचीन हिंदी इतिहासातील प्रसिध्द असं जें लिच्छवी घराणं, त्या घराण्याची ही राजधानी. हे राज्य लोकसत्ताक असून, तेथील राज्यकारभार प्रमुख लोकांचं एक मंडळ चालवी. या मंडळाचा अध्यक्ष लोकनियुक्त असून, त्यास नायक असं म्हणत.

जसजसा काळ लोटत चालला, तसतशीं मोठीं शहरें उदयास आलीं. व्यापार वाढला, कारागिरांचे कलाकुसरीचें धंदें व कला भरभराटींत आल्या. शहरं व्यापाराचीं केंद्रं बनली. ज्या आश्रमांत विद्वान ब्राम्हण आपल्या शिष्यांसह रहात, त्या आश्रमाचं रूपांतर मोठमोठ्या विश्वविद्यालयांत झालं व या विद्यालयांत, त्या काळांतील ज्ञात असे सर्व विषय शिकविले जाऊं लागले. ब्राम्हण युध्दशास्त्र देखील शिकवीत. तुला आठवत असेलच कीं, महाभारतांतील पांडवांचा महान् गुरू द्रोणाचार्य हा ब्राम्हण असून, त्यांनं इतर विषयांबरोबरच युध्दकलाही शिकविली होती.

---

१२

# चीनमधील हजार वर्षे

१६ जानेवारी १९३१

आज बाहेरून जी बातमी आली आहे, या बातमीमुळें मनांत कालवाकालव, दुःख, समाधान व अभिमान अशा परस्परविरोधी भावनांचा गोंधळ उडाला आहे. नुकतीच सोलापूरची घटना कानावर आली व या घटनेची प्रतिक्रिया सर्व हिंदुस्थानवर कशी झाली, तेंही कळलं. देशांतील युवक हाराकिरी करीत असतांना व हजारो स्त्रीपुरुष लाठी हल्ल्याला धैर्यानं तोंड देत असतांना तुरुंगांत स्वस्थ बसून राहणं कठीण आहे. पण एका दृष्टीनं हे उत्तम शिक्षणच म्हणावयाचं. मला वाटतं, प्रत्येक व्यक्तीला आपली, अशा रितीनं आत्यंतिक कसोटी घेण्याची संधी यावी. आज, हालअपेष्टांना तोंड देण्यासाठीं आपले देशबांधव धैर्यानं पुढ जात आहेत व शत्रूनं वापरलेल्या नवीन अस्त्रामुळें व प्रत्येक जादा अपघातामुळें त्यांचे धैर्य दुणावत आहे. हें ऐकून एखाद्याचं हृदय पुलकीत होणं साहजिकच आहे.

एखाद्या विशिष्ट दिवसाच्या बातम्या मनांत घोळत असतांना, दुसऱ्या गोष्टीकडं लक्ष लागणं कठीण आहे; पण निरर्थक विचारामुळं फारसा फायदा होत नाहीं. जर आपल्याला कांहीं भरीव कार्य करावयाचं असेल तर मन ताब्यांत ठेवलं पाहिजे. म्हणूनच आपण प्राचीन काळाकडं परत जाऊन, सध्यांच्या धक्काबुक्कीपासून थोडा वेळ कां होईना दूर राहूं.

प्राचीन इतिहासाच्या बाबतींत चीन हिंदुस्थानचा भाऊ प्रथम त्याचाच विचार करूं. चीन व त्याचप्रमाणं पूर्व आशियांतील जपान,

कोरिया, इंडोचायना सियाम व ब्रम्हदेश वगैरे देशांतील लोक आर्य वंशाचे नसून मंगोलियन वंशाचे आहेत.

५००० वर्षे अगर तत्पूर्वी चीनवर पश्चिमेकडून स्वारी झाली. या आक्रमक लोकांत, मध्य आशियांतील काहीं टोळया असून, त्या चांगल्याच सुधारलेल्या होत्या. त्यांना शेतकी ज्ञात असून, तें गुरेंढोरं व मेंढरांचे कळप पाळत असत. तें उत्तम घरें बांधीत व एकंदरीत त्यांची समाजव्यवस्था बरीच विकास पावली होती. चीनमधील हो–हँग हो अगर पीत नदीच्या कांठीं त्यांची वसाहत असून त्यांचं स्वतंत्र राज्यही होतं. शेंकडो वर्षं, त्यांचा सर्व चीनभर प्रसार चालू असुन, या मुदतींत तें आपल्या कला व उद्योगधंद्याच्या दृष्टीनं सुधारणा करीत होते. चिनी लोक हे मुख्यतः शेतकरी असून, मी आरंभीच्या पत्रांतून सांगितल्याप्रमाणं, त्यांचे नायक म्हणजे वस्तुतः महाजनच ( Patriarch ) असत. ६००–७०० वर्षांनंतर—म्हणजे जवळ जवळ ४००० वर्षांपूर्वी याओ नांवाचा एक पुरुष होऊन गेला. तो आपल्याला बादशाहा म्हणवीत असे. पण वास्तवीकरित्या इजिप्त अगर मेसोपोटेमिया प्रमाणे त्याचा दर्जा बादशहाचा नसून, तो कमी अधिक प्रमाणांत महाजनच होता. चिनी लोक हे शेतकरी म्हणुनच जीवन कंठीत व मध्यवर्ति असं सरकार बऱ्हंशी अस्तित्वांत नव्हतंच.

मी तुला सांगितलंच आहे कीं, प्रथम जरी महाजन जनता निवडून देत असली तरी पुढं ते वंशपरंपरागत झालं. चीनमध्यें हेंच घडल्याचं दिसून येतं. या ओच्या पाठीमागं त्याचा मुलगा गादीवर आला नाहीं; पण त्यानं, आपली गादी चालविण्याकरितां, देशांतल्या अत्यंत कर्तबगार समजल्या जाणाऱ्या व्यक्तीची योजना केली. लवकरच हें पद वंशपरंपरागत झालं. असं म्हणतात कीं, याच हसीआ वंशानें ४०० वर्षें राज्य

केलं. या वंशांतिल शेवटचा राजा अतिशय क्रूर होता. त्याचा परिणाम म्हणजे राज्यांत क्रांति होऊन, त्याला राज्याला मुकावं लागलं. हसीआ-वंशानंतर शांग अथवा यीन वंश गादीवर आला. या वंशानं जवळ जवळ ६५० वर्षे राज्य केलं.

एका लहानशा परिच्छेदात व फक्त दोन तीन संक्षिप्त वाक्यांत मी चीनच्या एक हजार वर्षांच्या इतिहासाची वासलात लाविली आहे. आश्चर्य नाहीं कां हें? पण इतिहासाच्या व्यापापुढं कोण काय करणार? पण लक्षांत ठेव, माझ्या छोट्याशा परिच्छेदामुळे कांहीं १००० तें १२०० वर्षांची काल-मर्यादा कमी होत नाहीं. आपल्याला नेहमीं दिवस, महिने नि वर्ष या दृष्टीनं विचार करण्याची संवय लागलेली असते. कदाचित् शंभर वर्षांच्या काळाचीही कल्पना येणं तुला कठीण पडत असेल. तुझ्या वयाची १३ वर्षे हीही बरीचशी वाटतात नाहीं कां? आणि शिवाय प्रत्येक जादा वर्षामुळं तूं अधिक मोठी होत आहेस. अशा स्थितींत, तुझ्या मनांत हा इतिहासाचा १००० वर्षांच्या कालावधि कसा सामावूं शकेल? फारच दीर्घ काळ हा. पिढ्यामागून पिढ्या येतात नि जातात. खेड्यांचीं शहरें होतात. पुढें तीं ढासळतात नि त्यांची जागा नवीन नवीन शहरें घेतात. इति-हासांतील गेल्या हजार वर्षांचा विचार कर. मग कदाचित् तुला विस्तृत कालमर्यादेची थोडी फार कल्पना येईल. या हजार वर्षांत, जगांत किती आश्चर्यकारक घडामोडी झाल्या आहेत!

चीनचा इतिहास म्हणजे आश्चर्यच! प्राचीन काळापासून चालत आलेली श्रेष्ठ संस्कृति, ५०० तें ८०० वर्षांपर्यंत राज्य करणारे राजवंश, फक्त चीनच्या इतिहासांतच आढळतील.

ज्या ११०० वर्षांच्या काळाचं मी फक्त एका परिच्छेदामध्ये वर्णन केलं आहे, त्या काळांतील चीनच्या मंद प्रगतीचा व विकासाचा विचार

कर. हळूंहळूं महाजनपद्धति जाऊन मध्यवर्ती सरकार विकास पावलं. सुसंघटीत सरकार अस्तित्वांत आलं. या प्राचीन काळांतहि चीनला लेखनकला माहित होती; पण चीनची लेखनपद्धति आपल्यापेक्षां व तसंच इंग्लीश–फ्रेंच या लेखनपद्धतिपेक्षां फार वेगळी आहे. चीनच्या लेखनपद्धतींत धुळाक्षरें नसून, प्रातिकें व चित्रें यांचा तींत उपयोग केला जातो.

६४० वर्षे राज्य केल्यानंतर, शांग घराणं क्रांतिच्या धक्क्यान उलथून पडलं नि त्याजागीं एक नवीन घराणं--चाऊ घराणं गादीवर आलं. या घराण्यानं शागपेक्षाहि अधिक काळपर्यंत म्हणजे ८६७ वर्षे राज्य केलं. चाऊ घराण्याच्या अमदानींतच संघटित असं चिनी राज्य उदयास आलं आणि त्यांच्याच कारकीर्दींत कॉनफ्युसिअस व लावो–त्सी हे दोन महान चिनी तत्वज्ञानी होऊन गेले. या दोघांविषयीं अधिक माहिती पुढें कधीं तरी सांगेन.

शांग घराण्याला घालवून दिल्यावर, त्यांच्या कि-त्से नांवाच्या एक स्वामिनिष्ठ सरदारानं, चाऊ राजांच्या ताबेदारीपेक्षां देशांतर पत्करलं आपल्या ५००० अनुयायांना घेऊन, त्यानं चीन बाहेर–कोरियांत प्रयाण केलं. या देशाला त्यानंच कोरिया अथवा ‘ शांत प्रभातकाळची भूमि असं नांव दिलं. कोरिया, चीनच्यापूर्वेला असल्यामुळं कित्से पूर्वेकडे किंवा उगवत्या सूर्याच्या प्रदेशाकडे गेला, असं म्हणावयास हरकत नाहीं कदाचित् आपण अतिपूर्वेच्या देशांत गेलो, अशी समजूत झाल्यामुळे कीं-त्सेनं हें नांव दिलं असावं. अशा रीतीनं कित्सेच्या कालापासून म्हणजे इ. स. पूर्वी ११०० वर्षांच्या काळांत, कोरियाच्या इतिहासाला प्रारंभ झाला. कि-त्सेनं, आपल्या या नवीन देशांत, चीनच्या कलाकुसरी, इमारती बांधण्याची पद्धत, शेतकी व रेशीम तयार करण्याची कृति वगैरे

गोष्टी नेल्या. कि-त्सेच्या पाठीमागून आणखी पुष्कळ चिनी लोक कोरियांत गेले. कि-त्सेच्या वंशजांनी कोरियांत ९०० वर्षे राज्य केलें.

अर्थात कोरिया हा कांहीं सर्वांत पूर्वेकडील देश नव्हता. आपल्याला माहितच आहे कीं, त्याच्याहि पूर्वेला जपान आहे. पण कि-त्से ज्यावेळीं कोरियांत गेला, त्यावेळची जपानची माहिती उपलब्ध नाहीं. जपानचा इतिहास चीन इतका, फार काय कोरिया इतकाहि जुना नाहीं. जपानी लोक म्हणतात कीं, त्यांचा पहिला बादशहा जिम्मू तेन्नो हा असून, त्यानें इ. स. पूर्वी ६०० किंवा ७०० या काळांत राज्य केलं. जपानी लोक सूर्याला देव मानतात व हा पहिला बादशहा सूर्यवंशीय होता, असाहि समज रूढ आहे. त्याचप्रमाणें सध्याचा जपानी बादशहा जिम्मू तेन्नोचा थेट वंशज असून, पर्यायानं तोहि सूर्यवंशीय आहे, असं मानलं जात.

आपल्या देशांतील रजपूत लोकहि आपल्या घराण्याची वंशावळ थेट सूर्य व चंद्रापर्यन्त नेऊन भिडवितात, हें तुला माहित आहेच. रजपुतांतलि दोन प्रमुख घराणीं म्हणजे सूर्यवंशीय व चंद्रवंशीय हीं होत. उदेपूरचा महाराणा हा आपल्याला सूर्यवंशीयाचा प्रमुख समजतो व आपल्या घराण्याचा संबंध अतिप्राचीन काळाशीं जोडतो. या रजपूत लोकांचा इतिहास अद्भुत असून त्यांच्या पराक्रमाच्या व औदार्याच्या गोष्टींना अंत नाहीं.

---

१३

# भूतकाळाची हांक

१७ जानेवारी १९३१

सुमारें २५०० वर्षांपूर्वी, प्राचीन जग असावं तरी कसं, हें आपण थोडक्यांत पाहिलं. आपलं हें निरिक्षण फारच त्रोटक व मर्यादित आहे. जे देश बरेचसे पुढारलेले होते, अगर ज्यांना कांहीं तरी ठाम इतिहास आहे अशाच देशांचा आपण विचार केला. उदाहरणार्थ, इजिप्तमधील महान संस्कृतीचा आपण ओझरता उल्लेख केला. या संस्कृतीनं पिरॅमिडस्, स्फींक्स ( स्त्रीचें डोकें असलेली सिंहाकृति ) व ज्या इतर अनेक गोष्टी निर्माण केल्या, त्यांचा विचार आपल्याला सध्या करता येत नाहीं. एकेकाळीं या संस्कृतीची चलती होती;पण आपण ज्या आरंभीच्या काळाची चर्चा करीत आहोंत, त्या काळांत तिला उतरती कळा लागली होती. नासोसचा अंतकाळ समीप आला होता. चीनमध्यें फारच दीर्घ काळांतील घडामोडीचा आपण विचार केला. तेथें बलाढ्य असं मध्यवर्ति साम्राज्य कसं उदयास आलं, लेखनकला, रेशीम करण्याची व इतर सुंदर कृती यांचा विकास कसा झाला हें पाहिलं. कोरिया व जपान यांच्याकडेहि ओझरती नजर फेंकली. हिंदुस्थानांतील सिंधूच्या खोऱ्यांतील मोहेन्जोदारोच्या अवशेषांतून आतां प्रगट होत असलेली संस्कृति, द्राविडी संस्कृति, या देशाचा परदेशाशीं चालु असलेला मोठा व्यापार व शेवटीं आर्यलोक यांचाहि आपण निर्देश केला. तसंच या काळांत आर्यांनीं लिहिलले वेद, उपनिषदें, रामायण, महाभारतादि महाकाव्यें यांचाहि उल्लेख केला. यानंतर आर्यांची संस्कृति उत्तरहिंदुस्थानांत कशी पसरली, दक्षिणेंत तिचा प्रवेश कसा

झाला व द्राविडी संस्कृतीशीं तिचा मिलाफ होऊन, एक नवीनच संस्कृति कशी निर्माण झाली, हेंहि आपण पाहिलं. या नवीन संस्कृतींत द्राविडी अंश कांहींसा असला तरी, आर्यन अंश बराचसा होता. विशेषत: या काळांत ग्रामीण समाजांचा लोकशाहीच्या पायावर कसा विकास होत गेला, खेड्यांची हळुंहळूं वाढ होत लहान मोठीं शहरं कशीं बनलीं, तसंच अरण्यांतील आश्रमाचं विश्वविद्यालयांत कसं रूपांतर झालं, हेंहि पाहिलं. मेसोपोटेमिया व इराणमध्ये साम्राज्यामागून साम्राज्यं कशीं झालीं, याचा आपण फक्त मोघम उल्लेख केला. नंतरच्या काळांत येथें झालेल्या साम्राज्यापैकीं, डरियसचं साम्राज्य तर हिंदुस्थानांत सिंधू नदीपर्यंत भिडलं होतं. पॅलेस्टाईनमध्यें, आपण ज्यू लोकांकडे ओझरतां दृष्टिक्षेप केला. हे लोक संख्येनं थोडे असून, जगाच्या इवल्याशा कोपऱ्यांत असले तरी, त्यांनीं जगाचं बरचसं लक्ष वेधून घेतलं आहे. जगांतील मोठमोठें राजे काळाच्या स्मृतींत गडप झाले आहेत. पण ज्यू लोकांतलि डेव्हिड, सालोमन या राजांचीं नावं स्मृतिपटलावर कायम आहेत नि त्याचं कारण, बायबलमध्यें त्यांचा उल्लेख आहे. ग्रीसमध्यें, नोसोसच्या थडग्यावर आर्यांची नवीन संस्कृति उभारली गेल्याचं आपण पाहिलं. यावेळीं नगर संस्थानें अस्तित्वांत येऊन भूमध्य समुद्राच्या आसपासच्या प्रदेशांत वसाहती झाल्या. रोम व त्याचे हाडवैरी कार्थेज ही आतां कोठें क्षितीजावर चमकूं लागली होतीं व रोमला अद्याप मोठेंपणा मिळायचा होता.

हे वरवरचं सिंहावलोकन झालं. ज्यांचा आपण उल्लेख केला नाहीं, अशा देशाविषयींहीं थोडी फार माहिती मला सांगता आली असती. हे देश म्हणजे उत्तर युरोप व आग्नेय आशियांतील देश. या आरंभीच्या काळांतहि, दक्षिण हिंदुस्थानांतील धाडशी खलाशी बगालचा उपसागर ओलांडून

मलाया द्विपकल्प व त्याच्या दक्षिणेकडील बेटांच्या सफरी करत. अर्थात्, प्राचीन काळाचं सिंहावलोकन करतांना आपण कुठंतरी मर्यादा घातली पाहिजे; नाहींतर आपलं पाऊल कधींच पुढं पडणार नाहीं.

ज्या देशांचा विचार केला, त्यांचा प्राचीन जगांत समावेश होतो असं मानलं जातं. तरीही त्यावेळीं, दूरदूरच्या देशांचं आपापसांत फारसं दळण वळण नव्हतं. धाडशी खलाशी समुद्रपर्यटनं करीत. कांहीं लोक व्यापार व इतर कारणासाठीं लांबलांबचे खुष्कीचे प्रवास करीत; पण ते क्वचित प्रसंगींच. कारण त्यांत धोके जबरदस्त असून भौगोलिक माहितीहि तुटपुंजी होती.पृथ्वी गोलाकार नसून सपाट आहे,असा समज होता.यामुळं जे देश लगतच होते, त्यांच्याशिवाय इतर देशाविषयीं कोणालाच फारशी माहिती नव्हती. उदाहरणार्थ, ग्रीसमधील लोकाना जशी चीन व हिंदुस्थानबद्दल माहिती नव्हती, तशी चिनी अगर हिंदी लोकाना भूमध्य समुद्रालगतच्या प्रदेशांची माहिती नव्हती.

प्राचीन जगाचा नकाशा मिळाला तर तो एकदां पहा. जुन्या लेखकांनीं प्राचीन जग व नकाशे याविषयीं दिलेली कांहीं वर्णनें गंमतीचीं आहेत. या नकाशांतील कांहीं देशांना असाधारण आकार दिले गेले आहेत. या उलट, प्राचीन जगाचे जे नकाशे अलीकडे तयार करण्यांत आले आहेत, तेच अधिक उपयुक्त असून, त्या त्या काळाविषयीं वाचत असतांना या नकाशांचा तूं अवश्य उपयोग करशील अशी मला आशा आहे. नकाशे फारच उपयुक्त असतात. त्यांच्या अभावीं, आपल्याला इतिहासाची वास्तव कल्पना करता येत नाहीं. इतिहास शिकण्याकरितां मिळतील तवढे नकाशे व प्राचीन इमारती व तत्कालिन अवशेषांचीं चित्रं अभ्यासून पाहिली पाहिजेत. इतिहासाचा निरस सांगाडा, हीं चित्रं भरून काढतात.

त्याला जिवंतपणा आणतात. इतिहासापासून आपल्याला जर कांहीं शिकावयाचं असल तर, विविध कृतिरूपांचा चित्रपटच आपल्या मनांत उभा राहिला पाहिजे. इतिहास वाचतांना त्यांतील प्रसंग आपल्या नजरेसमोर घडत आहेत, असं वाटलं पाहिजे. इतिहास हें एक दिलखेचक नाटक असून, या नाटकाची रंगभूमि म्हणजे अखिल जग व त्यांत वावरणारीं पात्रं म्हणजे गतकाळांतील थोर स्त्रीपुरुष. हें नाटक कधीं कधीं आनंदपर्यवसायी असलं तरी बहुधा दुःख पर्यवसायी असतं.

चित्रं व नकाशे यामुळें इतिहासाचा भव्य देखावा आपल्या डोळ्यांत चटकन भरतो. प्रत्येक मुलामुलीला ते मिळाले पाहिजेत. याहीपेक्षां चांगला मार्ग म्हणजे प्राचीन इतिहासाचे अवशेष स्वतः डोळ्यानीं पहाणं. अर्थात, हे सर्व अवशेष डोळ्याखालीं घालणं शक्य नाहीं. कारण ते जगभर पसरले आहेत; पण आपण डोळे उघडे ठेवून पाहूं लागलो तर प्राचीन काळचे थोडे फार अवशेष सहज दिसून येतील. मोठ्यामोठ्या वस्तुसंग्रहालयांत छोटे छोटे अवशेष संग्रहीत केले जातात. हिंदुस्थानांत इतिहास काळांतील अवशेष भरपूर प्रमाणात आढळून येत असले तरी, पुरातन काळचे अवशेष क्वचित्‌च अस्तित्वांत आहेत. निदान आतांपर्यंत तरी मोहेंजोदारो व हराप्पा ही या बाबतींत अपवादात्मक उदाहरणं होतं. कदाचित्‌ असंहि असेल कीं, बऱ्याचशा पुरातन इमारती, उष्ण हवामानामुळं जमीनदोस्त झाल्या असाव्यात. या उलट अधिक संभवनीय गोष्ट म्हणजे पुष्कळ इमारती भूपृष्ठाखालीं असून त्या सूर्यप्रकाश मिळण्याची वाट पहात असाव्यांत. जसजसा त्यांना आपण सूर्यप्रकाश दाखवूं व आपल्याला प्राचीन अवशेष व शिलालेख आढळून येतील, तसतसा प्राचीन इतिहास आपला ग्रंथ खुला करील नि आपल्याला दगड—विटा व चुनारूपी ग्रंथांत, आपल्या पूर्वजांनीं फार प्राचीन काळांत काय केलं, तें वाचावयास मिळेल.

तूं दिल्लीला गेली होतीस, या शहराभोंवतीं पसरलेले कांहीं अवशेष व जुन्या इमारती तूं पाहिल्या आहेस. पुन: या गोष्टी तूं जेव्हां पाहून गतकाळाचा विचार करशील, तेव्हां आपण प्रत्यक्ष भूतकाळांतच वावरत आहोत, असं तुला वाटेल व त्यावरून कोणत्याही ग्रंथापेक्षां तुला अधिक माहिती मिळेल. अगदीं महाभारताच्या काळापासून, दिल्लींत लोकांचं वास्तव्य असून, आतांपर्यंत दिल्लीला इंद्रप्रस्थ, हस्तिनापूर, तघलखाबाद, शाहजहानाबाद वगैरे निरनिराळीं नांवें मिळालीं आहेत. मला हीं सर्व नांवं देखील माहित नाहीत. जुन्या आख्यायिकावरून असं दिसतं कीं, सात निरनिराळ्या ठिकाणीं दिल्ली नांवाची सात शहरं असून, यमुना नदीच्या बदलत्या पात्राप्रमाणं त्यांचं स्थान हालवावं लागे. आज आपण हिंदुस्थानच्या सध्याच्या राजकर्त्यांच्या अमलाखालीं राईसिना अथवा नवी दिल्ली हें आठवं शहर उदयास आलेलं पहातों. साम्राज्यापाठीमागून साम्राज्यं दिल्लींत उदयास आलीं नि लयास गेलीं.

काशी अथवा बनारस या अतिप्राचीन शहरीं जा व तेथील पडसाद ऐक. अज्ञात अशा गतकालाविषयीं— 'साम्राज्यें -हास पावत असतां मी कालक्रमणा करीत आहे. भगवान बुद्ध नवीन संदेश घेऊन माझ्याकडे आला. अनेक शतकं, लाखो लोक शांतिसमाधानासाठीं माझ्याजवळ येतात,' इत्यादि गोष्टी काशी तुला सांगत नाहीं कां ! वृध्दा व पतिता, कुळी, घाणेरडी, दुर्गंधीयुक्त व त्याबरोबरच बरीचसी जिवंत व युगायुगाच्या सामर्थ्यानं संपन्न अशी ही काशी आहे. मनोहारिणी व अतर्क्य अशी काशी— तिच्या नेत्रांत तुला हिंदुस्थानचा गतकाळ दिसेल आणि तिच्या जलतरंगांत तुला युगायुगांतील निनाद ऐकूं येतील. त्याहिपेक्षां जवळ जाऊन आपल्या प्रयागमधील अशोकस्तंभ पहा. अशोकच्या आदेशाप्रमाणं या स्तंभावर कोरलेला लेख वाच नि तुला गेल्या २००० वर्षांपूर्वीची हांक ऐकूं येईल.

## १४

# संपत्ति जाते कोठें ?

१८ जानेवारी १९३१

मी तुला मसूरीच्या पत्त्यावर पाठविलेल्या पत्रांत, मनुष्य जसजसा पुढारत चालला तसतसा निरनिराळ्या वर्गाचा कसा विकास होत गेला, हें विशद करण्याचा प्रयत्न केला. अगदीं आरंभींच्या माणसांचें जविन फार खडतर होतं. अन्नासाठीं त्यांना वणवण फिरावं लागे. ते दररोज शिकार करीत, कंदमुळें गोळा करीत व अन्नाच्या शोधार्थ ठिकठिकाणीं भटकत. हळुंहळूं टोळ्या निर्माण झाल्या. या टोळ्या म्हणजे मोठीं कुटुंबेंच. एकटं राहाणं धोकयाचं आढळून आल्यामुळें, पुष्कळ माणसं एकत्र राहात व सर्वजण मिळून शिकार करीत. यानंतर एक मोठं स्थित्यंतर घडून आलं. शेतीच्या शोधामुळें त्यांच्या राहाणींत मोठाच फरक पडला. शेतीपद्धतीनं जमिनींत धान्य निर्माण करणं, हें सदा सर्वकाळ शिकार करण्यापेक्षां, अधिक सोपं असं लोकांना आढळून आलं, आणि जमिनीची मशागत, पीक पेरणी या गोष्टी म्हणजे तरी शेतीवरच जगणं. याचा परिणाम म्हणजे त्यांना पूर्वीसारखं भटकण अशक्य झालं व आपल्या शेतीच्या आसपास राहण्याची पाळी आली. अशा रीतीनं खेडीं व शहरें उदयास आलीं.

शेतीमुळें दुसरेंही कांहीं बदल घडून आले. शेतीमुळें जें अन्न निर्माण होई, तें लागलीच उपयोगांत आणतां येणाऱ्या अन्नापेक्षां कितीतरी अधिक असे. हें जादा अन्न कोठारांत भरून ठेवण्यांत येऊं लागलं. याचा परिणाम म्हणजे शिकारीच्या काळांत जो जीवनक्रम होता, त्यापेक्षां

आतां जीवनक्रम अधिक गुंतागुंतीचा झाला. लोकांतील कांहीं वर्ग शेतांत व इतरत्र काम करूं लागलं व दुसऱ्या कांहींकडे व्यवस्था पहाण्याचं व रचना करण्याचं काम आलं. ज्यांच्याकडे व्यवस्था व रचना हीं कार्यें सोपविण्यांत आली ते लोक हळुंहळूं प्रबळ होऊन महाजन, राजकर्ते, राजे नि सरदार बनले. अर्थात सत्ता त्यांच्याच हातीं असल्यामुळें, जादा अन्नापैकीं पुष्कळसं अधिक ते आपल्याकरितां ठेवून घेऊं लागले. याप्रमाणें हे लोक श्रीमंत होत चालले व जे लोक शेतांत काम करीत, त्यांना कसंबसं उदरनिर्वाहापुरतं अन्न मिळूं लागलं. पुढें एक काळ असा आला कीं, हे व्यवस्थापक व रचना करणारे लोक फारच ऐदी व नालायख बनले व त्यांच्या हातून सदर कामें नीटपणें होईनात. ते काम तर मुळींच करीत नसत; पण श्रमजीवि लोकांनीं जें अन्न उत्पादन केलं असेल त्यांतील भला मोठा वांटा उचलण्याची मात्र योग्य काळजी घेत. हळूंहळूं स्वत: कांहीं काम न करतां दुसऱ्यांच्या श्रमावर जगण्याचा आपल्याला हक्कच आहे, अशी त्यांचा विचारसरणी बनली.

याप्रमाणें शेतीच्या आगमनामुळें जीवनांत किती फरक पडला हें तुला कळून येईल. अन्न संपादण्याच्या पद्धतींत सुधारणा व त्याचबरोबर सहज सुलभता निर्माण करून शेतीनं समाजाचा वे मुलभूत पायाच बदलून टाकला. लोकांना फुरसत मिळूं लागली. निरनिराळे वर्ग अस्तित्वांत आले. प्रत्येकाला अन्नोत्पादनाकरितां काम करण्याची आवश्यकता नसलेमुळें कांहीं लोकांना इतर कामें करण्याची सवड मिळूं लागली. निरनिराळ्या हुन्नरी अस्तित्वांत आल्या नि नवीन नवीन उद्योगधंदे निघूं लागले. अर्थात् या सर्व स्थित्यंतरांत सत्ता मात्र प्रामुख्यानें कारभार करणाऱ्या लोकांच्या हातींच राहिली.

यानंतरच्या काळांतसुद्धां अन्नोत्पादनाचे नवीन नवीन मार्ग व इतर वाढत्या गरजा, यामुळें कितीतरी परिवर्तनें घडून आल्याचें तुला दिसून येईल. माणसाला अन्नाइतकीच इतर अनेक गोष्टींची आवश्यकता भासूं लागली. याचा परिणाम म्हणजे उत्पादनाच्या साधनांत मोठी क्रांति झाली कीं त्याची प्रतिक्रिया होऊन समाज व्यवस्थेंतही स्थित्यंतर घडून यावयाचें. याचं एकच प्रमुख उदाहरण द्यावयाचं म्हणजे, जेव्हां कारखान्यांतून वाफेचा उपयोग करण्यांत येऊं लागला व आगगाड्या नि जहाजे अस्तित्वांत आली तेव्हां उत्पादनाच्या व विभागणीच्या पद्धतींतही मोठा बदल झाला. कारागिर व शिल्पी लोकांना आपल्या हातांनीं अगर ओबडधोबड साधनांनीं उत्पादन करण्यास जो वेळ लागे, त्यापेक्षां वाफेच्या कारखान्यामुळें किती तरी जलद काम होऊं लागलें. मोठें यंत्र म्हणजे खरोखरच एक अवाढव्य हत्यारच होय. आणि रेल्वे व जहाजामुळें, दूरदूरच्या ठिकाणींही, अन्न व कारखान्यांतील उत्पादन, जलदीनें नेण्याची सोय झाली. यावरून सर्व जगांत केवढें परिवर्तन घडून आलें असेल याची तुला कल्पना येईल.

इतिहासांतील प्रत्येक कालांत अन्न व उत्पादनाच्या नवीन नवीन व अधिकाधिक जलदीच्या साधनांचा शोध वेळोवेळीं लागला आहे. साहजिकच तुझी अशी कल्पना होईल कीं, जर अधिक उपयुक्त पद्धती उत्पादनाच्या बाबतींत उपयोगांत आली तर उत्पादन अधिकाधिक वाढून जग अधिकाधिक संपन्न झालं पाहिजे नि प्रत्येकाला अधिकाधिक वांटा मिळाला पाहिजे. तुझी ही विचार सरणी थोडी बरोबर व थोडी चूक ठरेल. उत्पादनाची अधिक चांगलीं साधनें लाभलीं यामुळें जग खात्रीनें जास्त संपन्न झालं आहे. पण संपन्न झालेला भाग कोणता ? आपल्या देशांत अद्यापही भीषण दारिद्र्य व दुःख आहेच; पण इंग्लंड-

सारख्या श्रीमान् देशांतही तोच प्रकार आढळून येतो याचं कारण काय ? संपत्ति जाते कोठें ? जगांत अधिकाधिक संपत्ति निर्माली जात असतांना गरीब हे गरीबच राहावेत, ही गोष्ट चमत्कारिक नव्हे कां ? अर्थात् कांहीं देशांतून गरीबांच्या स्थितींत थोडीफार सुधारणा झाली आहे; पण उत्पादित नवीन संपत्तीच्या मानानं ती फारच मर्यादित आहे. यावरूनही संपत्ति कोणाच्या खिशांत जाते, हें आपल्याला कळून येईल. आपण ज्यांना व्यवस्थापक व रचना करणारे म्हणतो, त्यांच्यांच खिशांत ही संपत्ति जाते नि हा वर्ग प्रत्येक फायद्याच्या गोष्टींपैकीं मोठा वांटा आपल्या पदरांत कसा पडेल, याकडे लक्ष देत असतो. याहीपेक्षां चमत्कारिक गोष्ट म्हणजे समाजांत असे कांहीं वर्ग निर्माण झाले आहेत कीं, जे कामाला अजिबात हात न लावता, दुसऱ्याच्या श्रमावर निर्माण झालेल्या उत्पादनाचा दांडगा वांटा उपटीत असतात. आणि तुझा कदाचित् विश्वास बसणार नाहीं; पण याच लोकांचा आज सन्मान केला जात आहे. कांहीं मूर्ख लोकांची तर अशी समजूत झाली आहे कीं, स्वतःच्या उदरनिर्वाहाकरितां काम करणं ही कमीपणाची गोष्ट आहे ! सध्यांच्या जगांत अशी उद्वेग-जनक स्थिति असल्यामुळें, शेतात काम करणारे शेतकरी व कारखान्यांत राबणारे मजुर यांना, ते अन्न संपत्ति निर्माण करीत असूनही, दारिद्र्यांत जीवन कंठणं भाग पडत असलं, तर त्यांत आश्चर्य तें काय ? आज आपण स्वातंत्र्याची भाषा बोलत आहोंत; पण जगातील हा उद्वेगजनक प्रकार नाहीसा झाला नाहीं, अगर जे प्रत्यक्ष राबतात त्याना त्यांच्या श्रमाचा मोबदला मिळाला नाहीं, तर स्वातंत्र्याची किंमत काय ! राज-कारण, राज्यें चालविण्याची कला, अर्थशास्त्र व राष्ट्राची संपत्ति कशी विभागावी यावर लठ्ठ पुस्तकें लिहलीं गेलीं आहेत; विद्वान प्राध्यापक या विषयांवर व्याख्यानेंही देतात. अशा रीतिनं, एकीकडे गप्पा, वादविवाद,

चर्चा चालू असतांनाच दुसरीकडे राबणार हालअपेष्टांत पिचत आहेत. दोनशें वर्षांपूर्वी, मुत्सद्दी व तत्सम लोकांना उद्देशून प्रख्यात फ्रेंच तत्वज्ञानी व्हॉल्टेर यानें पुढील उद्‌गार काढिले आहेत. तो म्हणतो, "जे जमिनीची मशागत करून, दुसऱ्याकरितां जगण्याचीं साधनें निर्माण करतात, अशा लोकांना भुकें मारण्याची एक सुंदर कला, मुत्सद्यांनीं आपल्या राजकारणाद्वारें शोधून काढली आहे!" किती समर्पक हे उद्‌गार!

असं असतांही, प्राचीन काळचा माणूस सुधारत गेला व हळूहळू त्यानं रानटी निसर्गावर आक्रमण केलं. त्यानं जंगलं तोडलीं, घरें बांधिली व शेती केली. असा समज आहे कीं, कांहीं मर्यादेपर्यन्त माणसानं निसर्गाला जिंकलं. लोक निसर्गाला जिंकल्याची भाषा बोलतात; पण हें कांहींतरी बोलणं असून, तितकंसं खरं नाहीं. यापेक्षां मनुष्याला निसर्गाची पारख बरोबर होऊं लागली व जसजशी त्याला अधिक पारख होऊं लागली, तसतसं निसर्गाबरोबर अधिकाधिक सहकार्य करणं व आपल्या कारणाकरितां निसर्गाचा अधिकाधिक उपयोग करून घेणं त्याला शक्य होऊं लागलं, असं म्हणणं संयुक्तिक होईल. जुन्या काळात माणसं निसर्गानि निसर्गसिद्ध चमत्काराला भीत असत. निसर्गाचे मार्ग समजावून घेण्याऐवजीं ते त्याची पूजा करीत. नैवेद्य अर्पण करीत, जणूं काय निसर्ग म्हणजे रानटी पशू असून, त्याला समजावण्यासाठीं व भुलवण्यासाठीं या गोष्टींची आवश्यकता होती! मेघगर्जना, विजेचा कडकडाट व सांथीचे रोग, यामुळें माणसं घाबरून जात व या गोष्टी फक्त नैवेद्यामुळेंच टळणें शक्य आहे, असं मानत. पुष्कळ भोळे लोक सूर्यग्रहण वा चंद्रग्रहण म्हणजे आपत्ति मानतात. या अगदीं साध्या व स्वाभाविक घडणाऱ्या प्रकारांचें मर्म समजावून घेण्याऐवजीं, लोक घाबरून जातात

नि सूर्यचंद्राची सुटका व्हावी म्हणून उपवास व स्नानें करतात ! सूर्य चंद्र आपलें रक्षण करण्यास समर्थ आहेत, त्यांच्याविषयी काळजी करण्याचे कारण नाहीं.

आपण सुधारणा नि संस्कृतीच्या विकासाबद्दल गप्पा मारतो आणि आपण पाहिलंच आहे कीं, त्याचा आरंभ, माणसं खेडीं व शहरें यांतून स्थाईक झाल्यावरच झाला. अन्नाच्या वाढत्या पुरवठ्याबरोबर, त्यांना अधिक फुरसत मिळूं लागली व त्याचा परिणाम म्हणजे त्यांच्या डोक्यांत शिकार करणं अगर खाणं याशिवाय इतर विषय घोळूं लागले. विचार शक्तीच्या विकासाबरोबर, कलाकुसरी व सर्वसाधारण संस्कृतीचा विकास झाला. हळुंहळुं लोकसंख्या वाढूं लागली व लोकांना दाट वस्तींनं रहाण्याची पाळी आली. ते वरचेवर परस्परानां भेटूं लागले व एकमेकांत देव ण घेवाण सुरू झाली. अर्थात् लोकांना जर एकत्र रहावयाचं असल तर त्यांनीं एक-मेकांच्या सोईकडे लक्ष दिलं पाहिजे. त्याबरोबरच आपल्या सहकाऱ्यांना व शेजाऱ्याना त्रास होईल अशीं कृत्यें करण्याचं टाळलं पाहिजे, नाहींतर सामाजिक जीवन अशक्य होऊन जाईल. उदाहरणार्थ, एखादं कुटुंबच घ्या. कुटुंब हा लहानसा समाजच असून, कुटुंबांतील मंडळींनीं एक-मेकांच्या सोईकडे लक्ष दिलं तर, सर्वजणच सुखानं राहूं शकतील सर्व साधारणतः कुटुंबांत ही गोष्ट अशक्य नाहीं; कारण कुटुंबांतील मंडळी प्रेमाच्या धाग्यानं बांधली गेलेली असतात. पण अशा स्थितींतही कधींकधीं असे प्रसंग उद्भवतात कीं,त्यावेळीं सौजन्याला पायाखालीं तुडवून आपण असं दाखवून देतो कीं, आपण फारसे सुसंस्कृत अगर सुधारलेले नाहीं. कुटुंबापेक्षां मोठ्या समूहामध्यें तर ही गोष्ट ततोतंत आढळुन येते. मग ते आपले शेजारी अगर आपल्या शहरांतील लोक अगर देशबांधव किंव

दुसऱ्या देशांतील लोक असोत. अशा रीतीनं लोकसंख्येच्या वाढीचं पर्यवसान म्हणजे अधिक विस्तृत सामाजिक जीवन, अधिक संयम व दुसऱ्याच्या बाबतींत अधिक सौजन्य. संस्कृती व सुधारणा यांची व्याख्या करणं कठीण आहे व मी ती करीतही नाहीं; पण संस्कृतींत ज्या अनेक गोष्टींचा अंतर्भाव होतो, त्यांत संयम व सौजन्य हीं प्रामुख्यानें आहेत. जो गृहस्थ संयमी नाहीं अगर ज्याच्या जवळ सौजन्य नाहीं, तो मनुष्य असंस्कृत आहे असं बेधडक समजावं।

१५

# इसवी सनापूर्वीचें सहावें शतक

**२० जानेवारी १९३१**

इतिहासाच्या पुढील दीर्घ प्रवासाला आरंभ करूं. २५०० वर्षांपूर्वीच्या एका मोठ्या टप्याजवळ अगर थोड्या निराळया अर्थानं बोलावयाचं झाल्यास इसवीसनापूर्वी ६०० वर्षांच्या काळाजवळ आतां आपण येऊन थडकलो आहोत. हा कालमान अगदीं तंतोतंत आहे असं समजूं नकोस. मी तुला फक्त ठोकळ कालमान सांगत आहे. या सुमारास चीन—हिंदुस्थानपासून तो इराण—ग्रीसपर्यंत निरनिराळ्या देशांत अनेक महापुरूष, महान तत्वज्ञानी व धर्मसंस्थापक होऊन गेले. ते सर्व समकालीन होते असं नव्हे; पण कालमानदृष्टया ते जवळजवळ असल्यामुळं, इसवी सनापूर्वीच्या सहाव्या शतकांतील हा काळ मोठा शिस्तवेधक झाला आहे. सर्व जगांत विचारांची--प्रचालित परिस्थितिविषयीं असंतोष व त्यांत कांहीं-तरी सुधारणा घडून यावी म्हणून आशा व आकांक्षा यांची—एकच लाट उसळली गेली. लक्षांत ठेव. लोकांची स्थिति सुधारावी, त्यांच्यात योग्य परिवर्तन व्हावं व त्यांचा दुःखभार हलका व्हावा, हेच धर्माच्या थोर संस्थापकांचे उद्देश असत. एका दृष्टीनं ते महान् क्रांतिकारक असून, विद्यमान घातुक प्रवृत्तीवर कोरडे ओढण्यास डरत नसत. ज्या ज्या ठिकाणीं जुन्या परंपरेला अनिष्ट वळण मिळालं असेल किंवा भावी विकासाला तिचा प्रतिबंध झाला असेल, त्या त्या ठिकाणीं, ते तीवर हल्ला चढवीत व न भितां तिचं उच्चाटण करीत. या सर्वांपेक्षांही महत्वाची गोष्ट म्हणजे ते उदात्त जीवनक्रमाचा आदर्श पुढं ठेवीत. प्रत्येक पिढी-

तील असंख्य लोकांना—पिढ्या पाठीमागून पिढ्यांना--हा आदर्श एक ध्येयच वाटे व त्यांना त्यापासून स्फूर्ति मिळे.

इसवीसनापूर्वी ६ व्या शतकांत हिंदुस्थानांत बुद्ध व महावीर चीनमध्यें कॉन्फ्युसिअस व लावो-त्सी, इराणमध्यें झाराथुष्ट्र किंवा झोरो आस्टर व सामोस या ग्रीक बेटांत पायथॅगोरस हे होऊन गेले. तूं हें नांव कदाचित् निराळ्या कारणासाठीं ऐकलीं असशील. शाळेंतील सर्व साधारण मुलांची अगर मुलींची पायथॅगोरस विषयींची कल्पना म्हणजे पायथॅगोरस या उपद्व्यापी गृहस्थानें भूमितीतील एक सिद्धांत प्रस्थापित केला व तो त्यांना शिकण्याची पाळी आली आहे ! पायथॅगोरसचा हा सिद्धांत युक्लिडच्या अगर इतर कोणत्याही भूमितींत आढळून येईल. या सिद्धांताशिवाय पायथॅगोरसची, एक मोठा विचारी पुरुष म्हणूनही, ख्याति आहे. आपल्याला त्याच्याविषयीं फारशी माहिती नाहीं व कांहीं लोकांना तर तो होऊन गेला कीं नाहीं· याचीच शंका वाटते.

इराणमधील झोरोआस्टर हा झोरोआस्ट्रियन धर्माचा संस्थापक असं म्हणतात; पण त्याला धर्मसंस्थापक म्हणणं कितपत योग्य होईल हा प्रश्नच आहे. यापेक्षां त्यानें इराणमधील पूर्वीचें विचार व धर्म यांना निराळं वळण व निराळं स्वरूप दिलं असं म्हणणं अधिक सयुक्तिक होईल. गेलीं कित्येक वर्षे हा धर्म इराणमध्यें क्वचितच आढळून येतो. फार पूर्वी जे पारशी लोक इराणांतून हिंदुस्थानांत आले, त्यांनीं हा धर्म आपल्याबरोबर आणला.

चीनमध्यें याच काळांत, कॉनफ्यूसिअस किंवा कॉंग-फ्यु-त्सी व लावोत्सी हे दोन महापुरुष होऊन गेले. धर्माचा जो रूढ अर्थ आहे त्या अर्थाप्रमाणें हे दोघेही पुरुष धर्मसंस्थापक नव्हते. कोणी काय करावें व काय करूं नये याबद्दल त्यांनीं बरेच नैतिक व सामाजिक नियम घालून

दिलें आहेत; पण त्यांच्या मृत्यूनंतर, त्यांच्या स्मरणार्थ चीनमध्यें कितीतरी देवालये उभारण्यांत आलीं व हिंदू लोक वेदाबद्दल किंवा खिश्चन लोक बायबलबद्दल जितका आदर दाखवतात तितकाच आदर, चिनी लोकांमध्यें त्यांच्या ग्रंथाबद्दल होता. कॉनफ्युसिअसच्या शिकवणीचा एक दृष्य परिणाम म्हणजे चिनी लोक सर्व जगांत अत्यंत सभ्य, शिष्टाचारी व सुसंस्कृत म्हणून प्रसिद्ध आहेत.

हिंदुस्थानांत महावीर व बुद्ध हे होऊन गेले. महावीरानें आजचा विद्यमान जैनधर्म प्रतिपादला. महावीराचं खरं नांव वर्धमान. त्याच्या थोरपणामुळं पुढें त्याला महावीर हे पद मिळालं. जैन लोक हे प्रामुख्यानें पश्चिम हिंदुस्थान व काठेवाड या प्रदेशांत रहात असून,' आज हिंदूमध्येंच त्यांचा अंतर्भाव केला जातो. काठेवाडांत व राजपुतान्यांतील अबू पर्वतावर त्यांचीं मुख्य देवालयें आहेत. त्यांचा अहिंसेवर विश्वास असून, ज्यामुळं कोणत्याहीं जीवाला पीडा होईल असं कृत्य करण्याच्या ते विरुध्द आहेत. पायथॅगोरस हा कडक शाकाहारी असून, आपल्या सर्व शिष्यांनीं शाकाहारी रहावं, याकडे त्याचा कटाक्ष असे, ही गोष्ट खात्रीनं तुला मनोरंजक वाटेल.

आतां आपण गौतमबुध्दाजवळ आलो. तुला माहितच असेल कीं, तो क्षत्रिय कुळांतील एक राजपुत्र असून, त्याचं नांव सिध्दार्थ असं होतं. राणी माया ही त्याची आई. ' वर्धिष्णु चंद्राप्रमाणं सर्वांना आनंद देणारी भू-मातेप्रमाणं दृढनिश्चयी व गंभीर नि कमलाप्रमाणं धवल अंतःकरणाची साध्वी ' असं राणी मायेचं वर्णन एका प्राचीन इतिहासांत केलेलं आढळून येत. सिध्दार्थाला त्याच्या आईबापांनीं सुखांत व ऐषआरामांत वाढवून दुःख व विपत्ति यांच्यापासून त्याला दूर ठेवलं होतं; पण ते शक्य नव्हतं. कालांतरानं त्याच्या अवलोकनांत दारिद्र्य, हालअपेष्टा व मृत्यू या गोष्टी

येऊन त्याच्या मनांवर मोठाच परिणाम झाला. राजवाड्यांत त्याला शांतता लाभेना आजूबाजूच्या ऐषआरामांत देखील त्याचं मन रमेना. सिध्दार्थाची पत्नी तरुण व सुंदर असून, त्याची ती लाडकी होती; पण तिला सुध्दां त्यांचं मन दुःखी लोकांविषयीच्या विचारापासून परावृत्त करतां येईना. ' या सर्व अनिष्ट प्रकारावर उपाय काय ? ' हा एकच ध्यास त्याला लागला होता. शेवटीं त्याचे विचार इतके अनावर झाले कीं, एका मध्य-रात्रिच्या सुमारास त्यानं आपला प्रासाद, आपली आवडती माणसं यांचा त्याग करून आपल्या मनांत कल्लोळ उठविणाऱ्या प्रश्नांचं उत्तर शोधून काढण्यासाठीं या अफाट जगांतील प्रवासास आरंभ केला. हवी असलेलीं उत्तरं मिळवण्यासाठीं, त्याला दीर्घ तपश्चर्या करावी लागली. असं ह्मणतात कीं, पुष्कळ वर्षांनंतर, गया येथील एका पिंपळ वृक्षाच्या छायेखालीं तो आसनस्थ असतां, त्याला ज्ञानदृष्टि प्राप्त झाली. तेव्हांपासून लोक त्याला बुध्द ( ज्ञान दृष्टि प्राप्त झालेला ) ह्मणूं लागले. ज्या वृक्षाखालीं तो आसनस्थ होता त्याला बोधी वृक्ष असं नाव पडलं. यानंतर बुध्दानं सारनाथ किंवा तात्कालीन इसीपाटणातील मृगारण्यांत--प्राचीन काशीच्या छायेखालीं-आपल्या शिकवणूकीस आरंभ केला व ' उच्च जीवनक्रमाचा मार्ग' दाखवून दिला. देवाच्या नांवाखालीं होणाऱ्या सर्व प्रकारच्या यज्ञांचा त्यानं निषेध केला व राग, द्वेष, मत्सर, आदि मनोविकार व भ्रामक विचार-सरणीचा त्याग करण्याचा उपदेश केला.

ज्यावेळीं बुद्धाचा अवतार झाला, त्यावेळीं हिंदुस्थानांत वैदिक धर्म अस्तित्वांत होता; पण बुध्दापूर्वीच या धर्माला विकृत स्वरूप येऊन, त्याचा अधःपात झाला होता. आपल्या तुंबड्या भरण्यासाठीं ब्राह्मण धर्मगुरुंनीं समाजांत अनेक धर्मविधी, पूजा व धर्मभोळेपणा [illegible] होता. [illegible]

जितके धर्मवेड होतील तितकी धर्मगुरूंची अधिकाधिक चलती राहणार ! जातीय पद्धत अधिक कडक होऊन, सामान्य लोकांना शकुन, जादूटोणा, मंत्रविद्या व ढोंगी वैद्यशास्त्र यांची दहशत बसली. अशा रीतीनं या लोकाना कांबूत आणल्यावर भिक्षुक वर्गानं क्षत्रिय राज्यकर्त्यांची सत्ता उलथून पाडण्याचं ठरविलं. ब्राह्मण व क्षत्रीय या दोन वर्गात कलह सुरू झाला. बुध्द एक महान लोकप्रिय सुधारक म्हणून पुढें आला होता. भिक्षुकशाहीच्या जुलमी सत्तेवर व वैदिक धर्मांत घुसलेल्या सर्व अनिष्ट प्रथांवर त्यानं जोराचा हल्ला चढविला. पूजाविधी व तत्सम गोष्टींपेक्षां बुध्दाचा सदाचरण व सत्कृत्यें यावर भर असे. थोडयाच काळांत, त्यानं आपलीं तत्वें मान्य असणाऱ्या शिष्य-शिष्यणींचा एक संघ स्थापन केला.

धर्म यादृष्टीनं बौध्दधर्माचा हिंदुस्थानात, कांहीं कालपर्यंत फारसा प्रसार झाला नाहीं. पुढें या धर्माचा हिंदुस्थानांत कसा प्रसार झाला व पुन्हां स्वतंत्र धर्म या नात्यानं त्याचं अस्तित्व कसं संपुष्टांत आलं हे आपण नंतर पाहूं. बौध्दधर्म, सिलोनपासून चीनपर्यंत दूरदूरच्या देशांत पसरला असला तरी हिंदुस्थानांत मात्र तो ब्राह्मणी किंवा हिंदू धर्मांत विलीन होऊन गेला. अर्थात् ब्राह्मणी धर्मावर त्याचा बरा व परिणाम होऊन, त्यांतील थोडयाफार रुढी व धर्मविधी मोडले गेले, हें आपणां० विसरून चालणार नाहीं.

आज जगांतील कोणत्याही धर्मापेक्षां बौध्द धर्मीयांची संख्या आधिक आहे. बौध्दधर्मानंतर प्रमुख धर्म म्हणजे ख्रिश्चन, मुस्लीम व हिंदू धर्म हे असून त्यांच्या अनुयायांची संख्याही मोठी आहे. या व्यतिरिक्त इतर धर्म म्हणजे हिब्रू, शीख व पार्शी हे होत. धर्म व त्यांच्या संस्थापकांनीं इतिहासांत फारच महत्वाच्या भूमिका केल्या असल्यामुळें, इतिहासाचं

निरीक्षण करतांना, आपल्याला त्यांच्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. त्यांच्या विषयीं लिहितांना मला थोडं अवघड झालं आहे. मोठ्या मोठ्या धर्मांचे संस्थापक ह जगांत, आजपर्यंत होऊन गेलेल्या अत्यंत थोर व उदात्त वृत्तीच्या लोकांपैकीं होत, हें वादातीत आहे. मात्र त्यांच्या शिष्यांत अगर अनुयायांत बरेच वेळा त्यांचा थोरपणा किंवा भलेपणा आढळून येत नाहीं. इतिहासावरून आपल्याला पुष्कळदां असं दिसून येतं कीं, जो धर्म आपल्याला उच्च पातळीवर नेण्याकरतां नि आपल्यांत सुधारणा अगर सत् प्रवृत्ती निर्माण करण्याकरतां स्थापन होतो, तो पुढें अनेकवेळां माणसांना पशूप्रमाणं वागायला लावतो. लोकांत ज्ञान दृष्टि आणण्या ऐवजीं तो त्याना अज्ञानांधःकारांत ठेवितो;त्यांची मनं विशाल बनविण्या-ऐवजीं तो त्यांना कोत्या मनोवृत्तीचा बनवून, त्यांच्यांत असहिष्णुतेचं विष निर्माण करतो. धर्मासाठीं पुष्कळ उदात्त व तेजस्वीं कृत्ये घडलीं आणि धर्मासाठीं म्हणून लाखों लोकांच्या कत्तली उडून, शक्य तेवढीं पापंही झालीं.

मग धर्माच्या बाबतींत कोणती दृष्टी स्वीकारावी ? कांहीं लोकांना वाटतं धर्म म्हणजे दुसरें जग--स्वर्ग, नंदनवन—वगैरे. स्वर्गारोहणाच्या आशेनं ते धर्मप्रवृत्त बनून कांहीं विवक्षित गोष्टी करतात.असले लोक पाहून मिठाईच्या आशेनं, दंगा न करणाऱ्या मुलांची मला आठवण होते. ज्या मुलांच्या डोक्यांत फक्त मिठाईचेच विचार घोळतात, त्यांना योग्य शिक्षण मिळालं असं म्हणता येईल कां ? तुला तर मिठाईच्या आशेनं कांहींही करायला तयार होणारीं मुलं मुळींच आवडणार नाहींत. मग प्रौढ माणसं असाच विचार करूं लागली व तसं वागू लागली तर तूं त्यांना काय म्हणशील ? तसच पाहिलं तर स्वर्ग व मिठाई यांत तात्विक दृष्ट्या फारसा फरक नाहीं. आपण सर्वजण कमी अधिक प्रमाणात स्वार्थी आहोत; पण

मुलांना मात्र आपण असं शिक्षण देण्याचा प्रयत्न करतो कीं, त्यामुळं ते शक्य तितकं निस्वार्थी बनतील. कसं कां होईना, आपण आपलं ध्येय निरपेक्ष ठेऊन, त्याप्रमाणं वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे,

आपल्या प्रयत्नांचीं फळं चाखावयास, निदान पहावयास मिळावीत अशी आपली इच्छा असते व ती स्वाभाविकच आहे. पण आपण कशाची अपेक्षा करतो ? आपण स्वतः पुरते पाहतो कीं, त्यापेक्षांही व्यापक दृष्टी ठेवून समाजाच्या, आपल्या देशाच्या अगर मानव जातीच्या हिताकडे लक्ष देतो ? अर्थात् व्यापक हितांत आपलाही समावेश होतोच. थोड्याच दिवसापूर्वी माझ्या एका पत्रांत मी एक संस्कृत श्लोक उध्दृत केल्याचं मला आठवतं. कुटुंबाच्या हितासाठीं व्यक्तीचा, समाजाच्या हितासाठीं कुटुंबाचा त्याग करावा, असा त्या श्लोकाचा आशय होता. आज मी संस्कृत मधील आणखी एका श्लोकाचा भावार्थ सांगतो. हा श्लोक भागवतांतलि असून त्याचा आशय पुढील प्रमाणं आहे, ' मी अष्टांग परिपूर्ण अशा ब्रह्मानंदाची आशा करीत नाहीं, किंवा जन्ममरणाच्या फेऱ्यांतून माझी मुक्तता व्हावी, अशीही माझी याचना नाहीं. हे भगवान् माझ्या वाट्याला सर्व प्राणिमात्रांचीं दुःखें येऊन त्यांची हाल अपेष्टांतून मुक्तता होत असेल तर ती होऊं दे.'

धार्मिक वृत्तीच्या एका माणसाचं एक मत, तर दुसऱ्याचं दुसरं मत असतं आणि पुष्कळ वेळां ते एकमेकांना मूर्ख किंवा सोदे समजतात. त्यापैकीं बरोबर कोणाचं ? ज्यागोष्ठी दिसत नाहींत अगर सिद्ध करता येत नाहींत त्यावर ते वाद माजवतात व त्यामुळें त्यांच्या वादाचा निकाल लावणं कठीण पडतं. पण असल्याच गोष्टीवर आग्रही मतं प्रतिपादन केलीं जावींत व एकमेकांचीं डोकीं फोडण्यापर्यंत त्यांची मजल जावी. ही गोष्ट

निदान मला तरी मूर्खपणाची वाटते. आपल्यापैकीं बहुतेक लोक कोत्या बुद्धीचे असून, त्यांच्यांत सारासार बुध्दिही फारशी नसते. अशा स्थितींत, ज्ञानाचा सर्व मक्ता जणू काय आपणासच दिला आहे व आपलं ज्ञान शेजाऱ्यांच्या गळीं उतरविण्याचा आपल्याला हक्कच आहे, असं मानणं कितपत योग्य आहे? आपणही बरोबर असूं आणि आपल्या शेजाऱ्याचही बरोबर असेल. तूं झाडावरचं फूल पाहूनच कांहीं त्याला झाड ह्मणणार नाहींस. दुसरा एखादा मनुष्य झाडाचं नुसत पान पाहील,तर तिसऱ्याला झाडाचा बुडखा दिसेल. थोडक्यांत सांगायचं म्हणजे प्रत्येकानं झाडाचा एकादा भाग पाहिलं असेल; पण जर कां कोण पान, फूल अगर बुडखा यांनांच झाड म्हणूं लागलं व आपलंच म्हणणं खरं म्हणून मारामारी करूं लागलं तर तें किती शहाणपणाचं होईल ?

मला परलोकाचं आकर्षण वाटत नाहीं. या जगांत मला काय करतां येईल या विचारानं माझं मन भरून गेलं असून मला माझा या जगांतील मार्ग जर स्वच्छ रीतीनं दिसला तर तेवढ्यावरचं मी समाधान मानीन. या जगांतील माझं कर्तव्य काय हें मला स्वच्छ उमगलं तर परलोकाविषयीं विचार करण्याची मला जरूरीच उरणार नाहीं.

तूं जसजशी प्रौढ होत जाशील तसतसं तुला सगळ्या प्रकारचे धार्मिक, धर्मविरोधी व या दोहोंचीं पर्वा न करणारे लोक भेटतील. जिकडे तिकडे मोठमोठीं देवालयें, प्रार्थनामंदिरें आहेत. त्यांच्या मालकीची खूप संपत्ती असून त्यांना सत्ताही असते. या सत्ता–संपत्तीचा उपयोग कधींकधीं सत्कारणीं तर कधींकधीं वाईट रीतीनं होतो. तुला ज्याप्रमाणं धर्मनिष्ठ असे चांगले व थोर लोक भेटतील, त्याचप्रमाणं धर्माच्या नांवाखालीं लोकांना लुबाडणारे व त्यांना फसवणारे चोर व लफंगेही आढळून येतील आणि

मग तुला ह्या गोष्टीविषयीं विचार करून स्वतः च मत बनवावं लागेल. दुसऱ्याकडून आपल्याला पुष्कळ शिकतां येतं; पण प्रत्येक महत्त्वाची गोष्ट आपण स्वतः शोधून काढावयाची किंवा अनुभवावयाची असते. जगांत कांहीं प्रश्न असे असतात कीं, त्यांचीं उत्तर प्रत्येक व्यक्तीनं स्वतः च द्यावयाची असतात.

कोणत्याही प्रश्नावर निर्णय घेण्याची घाई करूं नकोस. कोणताही मोठा व जीवनस्पर्शी निर्णय घेण्यापूर्वी, तुझी तयारी व शिक्षण झालं पाहिजे. लोकांनीं स्वतः विचार करावा व त्यांनीं निर्णय द्यावेत हे योग्य असलं तरी, निर्णय घेण्याची त्यांच्यात पात्रता असली पाहिजे. आज जगांत खूप लोक असे आहेत कीं, त्यांचं वय झालेलं असतं; पण मानासिक विचाराच्या दृष्टीनं त्यांची स्थिती नुकत्याच जन्मलेल्या अर्भकाप्रमाणं असते.

आज मी तुला नेहमींपेक्षां दीर्घ पत्र लिहलं. तें तुला निरसही वाटेल. पण या विषयावरील माझे थोडेबहुत विचार सांगावयाचे होते. आज तुला त्यांतलि कांहीं समजलं नाहीं तरी चिंता नाहीं. लवकरच तुला बरंचसं समजूं लागेल.

१६

# इराण व ग्रीस

२१ जानेवारी १९३१

आजचं तुझं पत्र मिळालं. तुझं व तुझ्या आईचं कुशल वृत्त समजल्यामुळं बरं वाटलं; पण दादूचा ताप केव्हां एकदां जातो व ते त्रासांतून कधीं एकदाचें मुक्त होतात, असं मला झालं आहे. त्यांनीं आयुष्यभर फार कष्ट केलं व आतांही त्यांना शांतता व विश्रांति मिळत नाहीं.

तूं आपल्या ग्रंथसंग्रहालयांतील सर्व पुस्तकं वाचून काढलीस व तुला आणखीन् कांहीं पुस्तकांची नांवें पाहिजेत; पण तूं काय वाचलंस तें मला कळवलं नाहींस. पुस्तकं वाचण्याची सवय चांगली; पण जे लोक पुष्कळशी पुस्तकं भराभर वाचतात, त्यांच्याविषयी मला शंका येते. मला वाटतं, त्यांचं वाचन परिशीलनपूर्वक नसून, तो दिवस गेला की वाचलेलं सर्व ते विसरून जात असावेत. जर एकादं पुस्तक वाचनीय असेल तर तें काळजीपूर्वक व मननपूर्वक वाचणं चांगलं. पण जगांत अगणित पुस्तकं अशी आहेत कीं, ती वाचण्याच्या लायकीची नाहींत. या भाराभर पुस्तकांतून वाचनीय पुस्तकें निवडणं कांहीं सोपं काम नाहीं. तूं म्हणशील आपल्या ग्रंथसंग्रहांतील पुस्तकं मग तीं चांगली असलीच पाहिजेत. हो, नाहींतर आपण ती कशाला आणलीं असतीं ? बरं ! बरं ! वाचत जा. मी तुला नैनी तुरुंगांतून जी मदत करतां येईल ती करीन. पुष्कळदां तुझा शारीरिक व मानसिक दृष्ट्या जो विकास झपाट्यानं होत आहे त्याचाच विचार माझ्या मनांत येतो. यावेळीं 'मी तुझ्या जवळ असतो तर किती बरं झालं असतं ! कदाचित् मी तुझ्या करितां हीं जीं पत्रं

लिहीत आहे ती तुला पोहोचण्यापूर्वीच, तुझी ग्रहणशक्ती कितीतरी वाढत असेल! मला वाटतं,त्यावेळीं तीं वाचण्याइतकीं निदान चांद ( चंद्रलेखा पंडित ) मोठी होईल व कसं कां होईना, माझ्या पत्रांचं कौतुक करणार कुणीतरी मिळेल.

आतां आपण प्राचीन ग्रीस व इराणकडे वळून, त्यांच्यामधील युद्धांचा विचार करूं. मी माझ्या मागील एका पत्रांत ग्रीक नगरसंस्थानें व डारियसच्या आधिपत्याखालील इराणचं विस्तृत साम्राज्य, याबद्दल चर्चा केली आहे. डारियसचं हें साम्राज्य नुसतं आकारानंच विस्तृत नसून त्याची संघटनाही दांडगी होती. आशिया मायनॉरपासून सिंधूनदापर्यंत तें पसरलेलं असून, त्यांत इजिप्त व आशिया मायनॉरमधील कांहीं नगरसंस्थानें मोडत होतीं. साम्राज्यांत उत्तम रस्ते असून त्यावरून सरकारी टपालाची नेआण नियमित होत असे. डारियसनें कांहीं कारणांसाठीं हीं नगरसंस्थानें काबीज करण्याचं ठरविलं. या वेळीं ज्या लढाया झाल्या, त्यापैकीं कांहीं इतिहासप्रसिद्ध ठरल्या आहेत.

या लढायांची हकीगत हेरोडोटस नांवाच्या एका ग्रीस इतिहासकारानं लिहून ठेवली आहे. हेरोडोटस वरील प्रसंगानंतर थोड्याच काळांत होऊन गेला. अर्थात् तो ग्रीकांचा पक्षपाती असला तरी एकंदरींत त्यानं लिहून ठेविलेली माहिती मनोरंजक आहे. मी या पत्रमालेंत प्रसंगानुसार त्याच्या इतिहासांतील कांहीं उतारे उध्दृत करीन.

ग्रीसवरील पहिली इराणी मोहीम फसली याचं कारण, त्यावेळीं रोगराई व अन्नान्न दशा यामुळें इराणी सैन्याची मोठीच वाताहात झाली. हें सैन्य ग्रीस पर्यंत पोहोचूंही शकलं नाहीं; मध्येंच त्याला परतावं लागलं. यानंतर इसवी सनापूर्वी ४९०मध्यें इराणनं दुसरी स्वारी केली. इराणी सैन्यानं

खुष्कीचा मार्ग टाकला व समुद्रमार्गें हें सैन्य आथेन्सजवळ मॅरॅथॉन येथें येऊन दाखल झालं. आथेनियन लोक प्रथम घाबरून गेले व त्याचं कारण इराणी साम्राज्याचा मोठा दरारा! इराणी सैन्याच्या भीतीमुळें, आथेनियन लोकांनीं, आपले जुने शत्रू जे स्पार्टन्स त्यांच्याशीं मिळतं घेऊन, मदतीची याचना केली; पण स्पार्टन्स येण्यापूर्वीच इराणी सैन्याचा पराभव करण्यांत आथेनियनांना यश आलं. हा प्रकार मॅरॅथॉनच्या लढाईत, इसवी सनापूर्वी ४९० च्या सुमारास घडला.

एका लहानशा ग्रीक नगरसंस्थानानं, एका बलाढ्य साम्राज्याच्या फौजेला धूळ चारली, ही गोष्ट चमत्कारिक भासते; पण जितकी दिसते तितकी ही गोष्ट चमत्कारिक नाहीं. ग्रीक लोक आपल्या शहरांत, शहरासाठीं लढत होते, तर इराणी सैन्य आपल्या देशापासून, दूरच्या पल्ल्यावर आलं होतं. याशिवाय इराणी सैन्यांत, साम्राज्यांतील निरनिराळ्या भागांतील सैनिकांची खोगिरभरती होती. हें भाडोत्री सैन्य पगार मिळत होता म्हणून लढलं. ग्रीसच्या मोहिमेबद्दल त्यांना फारशी आस्था असण्याचं कारण नव्हतं. या उलट आथेनियन आपल्या स्वातंत्र्यासाठीं जीवांवर उदार होऊन लढले. स्वातंत्र्य गमाविण्यापेक्षां मृत्यूलाही कवटाळण्याची त्यांची तयारी होती. जे लोक आपल्या ध्येयाकरता हाराकिरी करण्यास तयार होतात त्यांचा क्वचितच पराभव होतो.

अशारीतीनं डारियसचा मॅरॅथॉन येथें पराभव झाला. पुढें तो इराणमध्यें मरण पावला व क्षेरक्सस गादीवर आला. क्षेरक्ससचीही, ग्रीस जिंकण्याची महत्वाकांक्षा होती व त्याकरतां त्यानं एक मोहिमही काढली. या ठिकाणीं मी हेरोडोटसनें सांगितलेली एक मजेदार कथा तुझ्यासाठीं उद्धृत करतो.

आर्टाबानस हा क्षेरक्ससचा चुलता. ग्रीसवर चालून जाण्यांत इराणी सैन्याला धोका आहे असं वाटल्यानं क्षेरक्ससला या स्वारीपासून परावृत्त करण्याचा त्यानं प्रयत्न केला. त्यावेळीं क्षेरक्ससनें आपल्या चुलत्याची पुढील प्रमाणें संभावना केल्याचं हेरोडोटसनें नमूद केलं आहे.

" काका, तुमच्या म्हणण्यांत बरंच तथ्य आहे; पण तुम्ही जिकडे तिकडे संकटं न्याहाळूं नयेत, किंवा प्रत्येक संकटाचा विचार करूं नयें. मार्गातील प्रत्येक संकट तुम्ही तोलूं लागला तर तुमच्या हातून कधींच कांहीं होणार नाहीं. आपला दृष्टीकोन सदां सर्वकाळ उदास असण्या-ऐवजीं व कधींही हाल अपेष्टा न भोगण्यापेक्षां आशावादी बनून जीव धोक्यांत घालणं चांगलं.) योग्य मार्ग दाखविण्याऐवजीं, पुढे ठेविलेल्या प्रत्येक योजनेला विरोध कराल, तर ज्यांना तुमचा विरोध त्यांच्या इतकंच तुम्हाला दुःख भोगण्याची पाळी येईल. तराजूची पारडीं सारखीं तोलली गेलीं आहेत. कांटा कोणत्या बाजूला झुकेल हें माणसाला खात्रीपूर्वक सांगतां येईल कां ? अर्थात नाहीं. पण ज्यांना कार्य करण्याची इच्छा असते, त्यानांच बहुधां विजय मिळतो. जे लोक भित्रे आहेत व प्रत्येक गोष्ट तोलून पाहतात, त्यांना विजयाची आशा नसते. आज इराणनं केवढी मोठी शक्ति संपादन केली आहे हें तुम्ही पाहतांच. जर माझ्या सिंहासनारूढ पूर्वजांनीं तुमच्यासारखा विचार केला असतां अगर तुमच्या-सारखे सल्लागार त्यांच्या जवळ असते तर आपलं साम्राज्य आज इतकं वाढलेलं तुम्हाला दिसलंच नसतं. त्यांनीं जीव धोक्यांत घातले म्हणून आम्हांला हे दिवस दिसत आहेत. मोठ्या गोष्टी, मोठ्या संकटांत उडी घातल्या मुळंच, साध्य होतात. "

मी हा लांबलचक उतारा जो उध्दृत केला तो एवढ्याच करतां कीं, दुसऱ्या कोणत्याही हकिगतीपेक्षां हे शब्दच, सदर इराणी राजाचं

स्वभावाचित्र अधिक यथार्थतेनं डोळ्यांपुढं उभं करतात. आर्टाबानसचा सल्ला खरा ठरून, इराणी सैन्याचा ग्रीसमध्यें पराभव झाला, क्षेरक्ससला अपेश आलं; पण त्याचे शब्द् आजही खरे वाटतात. त्यापासून आपणां सर्वांनांच बोध घेण्याजोगा आहे. आज आपण मोठमोठ्या गोष्टी साध्य करून घेण्यासाठीं धडपडत आहोंत. आपण हें लक्षांत ठेवलं पाहिजे कीं, ध्येय साध्य करून घेण्यासाठीं आपल्याला मोठ्या अरिष्टांतून मार्ग काढला पाहिजे.

सम्राट क्षेरक्सस पुढें आपलं प्रचंड सैन्य घेऊन, आशियामायनॉर मार्गे दार्दानेल्समधून ( तत्कालिन हेलेसपॉंट ) युरोपांत गेला. आपल्या मार्गावर त्यानं ट्रॉयच्या उध्वस्त शहराला भेट दिली असं म्हणतात. येथेंच प्राचीन ग्रीक वीरांनीं हेलेनकरतां लढाई दिली होती. इराणी सैन्याला पलीकडे जाण्यासाठीं हेलेसपॉंटवर एक मोठा पूल घालण्यांत आला; नि हा पूल ओलांडून पलीकडे जात असलेल्या इराणी सैन्याची, जवळच्या एका टेकडीवर सिंहासनस्थ होऊन, क्षेरक्ससनें पाहणी केली. याविषयी हेरोडोटस लिहितो,

"··· आणि सर्व हेलेसपॉंट जहाजांनीं भरून गेलेलं पाहून, तसंच किनाऱ्यावर व ॲबिडीसच्या सपाट मैदानावर जिकडं तिकडं माणसंच माणसं पाहून क्षेरक्ससनें माझ्यासारखा सुखी मीच असें उद्गार काढले; पण थोड्याच वेळांत तो आक्रंदन करूं लागला. त्याचं हें विचित्र वर्तन पाहून आर्टाबानस, ज्यानं क्षेरक्सला ग्रीसवर स्वारी न करण्याचा निस्पृह सल्ला दिला होता तो त्याचा चुलता, थक्क झाला. त्यानं विचारलं, ' हे राजा, आतांचं हें तुझं वर्तन व क्षणापूर्वी तूं काढलेलें उद्गार, हीं किती परस्पर विरोधी आहेत ! क्षणापूर्वी माझ्यासारखा सुखी मीच, असं तूं

द्‌गार काढलंस नि आतां तूं अश्रू सिंचन करीत आहेस ? ' क्षेरक्सस त्तरला. " हो ! असं झालं खरं. थोडा वेळ निरीक्षण केल्यावर माणसाचं ीवित किती क्षणभंगुर आहे, हा विचार मनांत येऊन मला त्यांची कींव ाली. खरंच, आज माझ्या बरोबर जीं असंख्य माणसं दिसत आहेत, ांतील एक मनुष्य सुध्दां शंभर वर्षांनंतर दृष्टीस पडणार नाहीं. "

हें प्रचंड इराणी सैन्य भूमार्गे कूच करीत निघालं नि त्याला मदत ्हणून, समुद्र मार्गे कित्येक जहाजांचा काफिला निघाला; पण समुद्रानं ोकांची बाजू घेऊन, या प्रचंड काफिल्यांतील बहुतेक जहाजांचा भीषण जावातांत फडशा उडविला. हें प्रचंड सैन्य पाहून प्रथम ग्रीक लोकांची ाळण उडाली. आपले सर्व कलह विसरून, ते आक्रमकांविरुध्द एकवटले. थम त्यांनीं इराणी सैन्यापुढें माघार घेऊन, थर्मापिलीस जवळ त्यांना टकावण्याचा प्रयत्न केला. एका बाजूला पर्वत व दुसऱ्या बाजूला समुद्र ामधील ही अरुंद वाट, थोड्या सैनिकांनाही प्रचंड शत्रु सैन्याला तोंड ण्याच्या दृष्टीनं सोईस्कर होती. प्रसंगीं मृत्यूला कवटाळूनही या अरुंद ार्गाचं रक्षण करण्यासाठीं लिओनिडास याच्या आधिपत्याखालीं तीनशें ार्टन सैनिक तेथें ठेवण्यांत आले होते. मॅरॅथॉननंतर दहा वर्षांतच हा ाणिबाणीचा दिवस उगवला होता. या दिवशीं या शूर वीरांनीं आपल्या ाक्रमाची शर्थ करून, देशाची सेवा निष्ठेनं पार पाडली. एका मागून क असे सर्व सैनिक धारातीर्थी पडले; पण शेवटचा सैनिक पडेपर्यंत ाणी सैन्याला एक तसूभरही पुढं सरकतां आलं नाहीं. इराणी सैन्याला ढ वाट मिळाली; पण ती थर्मापिलीस येथे लिओनिडास व त्याच्या नशें शूर सैनिकांनीं देह ठेवल्यावरच ! हा प्रसंग इसवीसनापूर्वी ४८० ध्यें अगर २४१० वर्षांपूर्वी घडला; पण आजही स्पार्टन वीरांच्या या

अजिंक्य धैर्याची हकिगत ऐकून, आपलं हृदय भरून येतं. आजही थर्मा-पिलीच्या वाटेवरील प्रवाशाचे डोळे लिओनिडास व त्याचे सहकारी यांच्या स्मारकावरील खालील कोरलेला संदेश वाचून अश्रूंनीं ओले होत असतील.

" Go tell to Sparta, thou that passest by,
That here obedient to her words we lie"

[ येथून जाणाऱ्या प्रवाशा, स्पार्टाला जाऊन सांग की, मातृभूमिच्या शब्दाकरितां, आम्ही येथें आपले देह ठेविले आहेत. ]

मृत्यूवरही जय मिळविणारं धैर्य अजब खरं. लिओनिडास व थर्मा-पिलीस चिरंजीव झाले आहेत. त्यांचा विचार मनांत येतांच हिंदुस्थान सारख्या दूरच्या देशांतही आपलं अंतःकरण उचंबळून येतं. मग खुद्द आपलंच लोक, आपले पूर्वज हिंदुस्थानांतील स्त्रीपुरुष, अनादिकालापासून मृत्यूकडे पाहून हंसत आहेत, नव्हे त्याचा उपहास करीत आहेत; नि ज्यांनीं अपमान व गुलामगिरीपेक्षां, भंगून जाणं पत्करलं, त्यांच्या विषयीं आपल्याला काय वाटत असेल ! चितोड व तेथील अनुपम कथा, रजपूत वीरांचे व वीररमणींचे अद्वितीय पराक्रम आठव ! तसंच आजचा आपला काळ व आपल्या सारख्याच सळसळणाऱ्या रक्ताच्या सहकाऱ्यांचा विचार कर. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितां ते मृत्यूलाही डरत नाहींत.

थर्मापिलीसमुळें इराणी आक्रमणाला पायबंद बसला; पण तो क्षण-भरच, फार काळ नव्हे. ग्रीकांना पुढें इराणी सैन्यापुढें माघार घ्यावी लागून कांहीं शहरंही सोडून द्यावी लागली. अथेन्समधील सर्व लोकांनीं मात्र 'शरण जाण्यापेक्षां प्रिय शहराचा नाशही पुरवला' यावृत्तीचा अवलंब केला व बहुतेक शहरवासीय जहाजांतून चालते झाले. इराणी सैन्यानं

या ओसाड शहरांत प्रवेश करून त्याला आग लावून दिली. आथेनियन आरमार मात्र अद्यापही अजिंक्य होतं. या आरमाराची व इराणी आरमाराची सलामीस येथें घनघोर लढाई होऊन त्यांत इराणी आरमाराचा धुव्वा उडाला. या अनर्थानं खचून क्षरक्जस निराश झाला आणि इराणकडे परतला.

पुढेंही कांहीं काळ इराणी साम्राज्याचा दरारा राहिला; पण मॅरॅथॉन व सलामीस यांनीं या साम्राज्याच्या र्‍हासाची सुरवात करून दिली. हें साम्राज्य जमीनदोस्त कसं झालं, हें आपण पुढं पाहूं. जे लोक या काळांत होऊन गेले, ते डोळ्यादेखत एवढं मोठं साम्राज्य डळमळूं लागल्याचं पाहून, स्तिमीतच झाले असतील ! हेरोडोटसनें विचार करून यासंबंधी एक निष्कर्ष काढला आहे. तो म्हणतो, प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत तीन अवस्था असतात. विजय, त्याची परिणती म्हणजे मदांधता नि अन्याय व त्याचं पर्यवसान म्हणजे नाश.

---

# १७

# ग्रीकांचें वैभव

**२३ जानेवारी १९३१**

इराणी सैन्यावरील ग्रीकांच्या विजयाचे परिणाम दोन प्रकारें झाले. इराणी साम्राज्याचा हळुंहळूं ऱ्हास होत जाऊन तें कमकुवत झालें आणि ग्रीकांनीं आपल्या इतिहासांतील दैदिप्यमान काळांत प्रवेश केला. राष्ट्राच्य दृष्टीनें विचार केला तर ग्रीकांचें हें वैभव अल्पजीवि म्हणजे २०० वर्षां पेक्षांही कमी काळ टिकलें. तसेंच त्यांत इराण किंवा पूर्वी होऊन गेलेल्य विस्तृत साम्राज्याचें वैभव नव्हतें. पुढें बलाढय ॲलेक्झांडर उदयास आला व त्यानें क्षणभरच कां होईना जगाला स्तिमित करून सोडलें; पण सध्यां आपण ॲलेक्झांडरचा विचार करीत नसून फक्त इराणी युध्दें व ॲलेक्झांडरचें आगमन यामधील--थर्मापिली व सलामीस नंतरच्या साधारणपणें १५० वर्षांतील काळाचा विचार करित आहोंत. इराणी स्वारीमुळें ग्रीक लोक एकवटले; पण जेव्हां हें संकट नाहींसें झालें, तेव्हां हें ऐक्य नाहींसें होऊन त्यांच्यात फिरून लाथाळी सुरूं झाली. विशेषत: अथेन्स व स्पार्टा या नगरसंस्थानांत तर हाडवैर होतें. आपण त्यांच्या झगडयांत शिरून डोक्याला शीण देण्याचें कारण नाहीं. त्यांना ऐतिहासिक दृष्टया महत्व नसून, आपणाला त्यांची आठवण होत याचें कारण, या काळांत ग्रीसला इतर अनेक प्रकारें मिळालेला मोठेपणा हा होय.

तत्कालीन ग्रीसमधील फारच थोडे ग्रंथ, पुतळे व अवशेष आज अस्तित्वांत आहेत; पण हीं थोडीं स्मृति चिन्हेंही अशी आहेत कीं, त्यामुळें आपल्याला ग्रीस विषयीं फार कौतुक वाटतें, ग्रीकांच्या सर्वांगिण श्रेष्ठते-

मुळें आपण चकित होतो. असले रमणीय पुतळे व इमारती निर्माण करणाऱ्यांचीं मनं किती संपन्न व हात किती चलाख असले पाहिजेत ! फिडियास हा त्या वेळचा विख्यात शिल्पकार; पण त्याच्या सारखे आणखी किती तरी नामांकित शिल्पकार त्यावेळीं ग्रीसमध्ये होते. तसंच त्यांचीं नाटकें आजही जगांतील उत्कृष्ट कलाकृतींत मोडतात. त्यांच्यापैकीं सोफोकल्स, युरोपिडस, ॲरिस्टोफेनस, पिंडार, मेनन्दर, सॅफो आदींचा यावेळीं नामनिर्देश करतां येईल. तूं मोठी झालीस कीं त्यांच्या कृती वाचशील नि मग तुला ग्रीसच्या गतवैभवाची थोडी फार कल्पना येईल.

ग्रीक इतिहासांतील हा काळ म्हणजे एखाद्या देशाचा इतिहास आपण कोणत्या दृष्टीनं वाचावा याचा इषाराच होय. ग्रीसमधील क्षुल्लक लढाया नि सटरफटर गोष्टींकडेच आपण लक्ष दिलं असतं तर त्यांच्यासंबधी आपल्याला विशेष असं काय कळलं असतं ? त्यांची ओळख पटवून घ्यावयाची असेल तर आपण त्यांच्या विचारांत प्रवेश केला पाहिजे. त्यांना काय वाटे व ते काय करीत याकडे गुणग्राहक दृष्टीनं पाहिलं पाहिजे. हा आंतला इतिहासच वस्तुतः महत्वाचा आहे आणि याच इतिहासामुळं अर्वाचीन युरोप हें संस्कृतीचं अनेक दृष्टीनं अपत्य ठरलं आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

राष्ट्राच्या जीवनक्रमांत अशा देदिप्यमान कारकीर्दी वरचेवर येतात नि जातात. ही जितकी समाधानाची तितकीच आश्चर्यकारक गोष्ट आहे. क्षणभर कां होईना, त्यामुळें प्रत्येक गोष्टीला उजाळा चढतो नि त्या काळांतील स्त्री-पुरुषांना व देशांना सौंदर्यकृति निर्माण करणं शक्य होतं; लोकांत स्फूर्तीचा संचार झाल्यासारखं दिसतं. आपल्या देशांनही अशा कारकीर्दी येऊन गेल्या आहेत. अगदीं आरंभींची अशा तऱ्हेची कारकीर्द

म्हणजे ज्या काळांत वेद नि उपनिषदें लिहिलीं गेलीं तो काळ. दुदैवानं या प्राचीन काळाची कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. या काळांतील पुष्कळ रमणीय व श्रेष्ठ कृती कालाच्या भक्षस्थानीं पडल्या असाव्यात किंवा संशोधनाची वाट पहात असाव्यात. अर्थात् सध्यां जी माहिती उपलब्ध आहे, तेवढ्यावरूनही प्राचीन हिंदी लोकाची बुध्दिमत्ता व विचारशक्ति किती अचाट होती हे कळून येतं. यानंतरच्या हिंदी इतिहासांतही असल्या उज्वल कारकीर्दी झाल्या.

विशेषेकरून अथेन्स याच काळांत प्रसिद्धीस आलं. या वेळीं एक महान् मुत्सद्दी अथेन्सला नेता म्हणून लाभला होता. पेरीकल्स हे त्याचं नांव. सतत तीस वर्षे अथेन्सचीं सूत्रें त्याच्या हातीं होतीं. त्याच्याच कारकिर्दीत सुंदर सुंदर इमारती, थोर कलावंत व तत्वज्ञानी यामुळें अथेन्सला भव्यता प्राप्त झाली. सध्यांही 'पेरीकल्सचे अथेन्स' असा लोक उल्लेख करतात व आपण त्या काळाला पेरीकल्स युग असं म्हणतो.

आपला इतिहासकारमित्र हेरोडोटस हा याच सुमारास होऊन गेला. अथेन्सच्या भरभराटीचे विचार त्याच्या मनांत आले व त्यानं त्यातून आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणं तात्पर्यही काढलं. आपल्या इतिहासांत हेरोडोटल ह्मणतो,

'अथेन्सचं सामर्थ्य वाढलं. या ठिकाणीं एक प्रचिती येते. स्वातंत्र्य किती हितप्रद गोष्ट आहे याचा पुरावा मिळतो. जोपर्यंत आथेनियन लोकांवर सोटशाही राज्य चालू होतं, तोपर्यंत आपल्या कोणत्याही शेजाऱ्याबरोबर झालेल्या युध्दांत त्याचं तेज पडलं नाहीं; पण जेव्हां त्यांची त्या सोटेशाहींतून सुटका झाली तेव्हां ते आपल्या शत्रूपेक्षा फारच भारी ठरले. यावरून हे दिसून येतं कीं, गुलामगिरींत ते आपली सर्व शक्ति कारणीं

न लावतां केवळ धन्याकरिता काम करत; पण जेव्हां ते स्वतंत्र झाले तेव्हां प्रत्येक व्यक्ति स्वतःची पात्रता निदर्शनास आणून देण्यासाठीं आटोकाट प्रयत्न करूं लागली.

या काळांतील कांहीं थोर व्यक्तींचा मी उल्लेख केला आहे; पण याच काळांतील किंवा कोणत्याही काळांतील श्रेष्ठ व्यक्तींपैकीं एकाचा मी अद्याप उल्लेख केला नाहीं. त्याचं नांव सॉक्रेटीस. तो तत्वज्ञानी असून, नेहमीं सत्याचा शोध करण्यांत गढलेला असे. त्याच्या दृष्टीनं सत्यज्ञान ही एकच आवश्यक गोष्ट असून, सत्यप्रकट व्हावं म्हणून तो आपल्या सोबत्याशीं व परिचित माणसांशी सदां चर्चा करी. त्याचे बरे-चसे शिष्य असून, त्या सर्वांत श्रेष्ठ म्हणजे प्लेटो हा होय. प्लेटोनें लिहि-लेले अनेक ग्रंथ आजही आपणाला वाचावयास मिळतात व या ग्रंथावरून त्याच्या गुरूविषयीं, सॉक्रेटीसविषयीं बरीच माहिती मिळते. अर्थात् कोणत्याही सरकारला सत्याचा शोध करणारे लोक आवडत नाहींत आणि म्हणूनच आथेनियन सरकारला ( पेरीकल्सनंतर थोड्याच काळांतील ही गोष्ट ) सॉक्रेटीसचा मार्ग पसंत नव्हता. सॉक्रेटीसची चौकशी कर-ण्यांत येऊन त्याला देहांत शासन फर्माविण्यांत आलं. 'लोकाबरोबर चर्चा करण्याचं थांबवून आपले मार्ग बदलले तर सोडून देण्यांत येईल,' असं सॉक्रेटीसला सांगण्यांत आलं. साक्रेटीसनें तसं करण्याचं नाकारलं. ज्याला आपण कर्तव्य समजतो त्यापासून च्युत होण्यापेक्षां, पुढें आलेला विषाचा प्यालाआणि त्यामुळं ओढवणारा मृत्यू, त्यानं अधीक पसंत केला. मरणापूर्वी त्यानं आपले वादी, न्यायाधीश व आथेनियन जनता यांना उद्देशून एक भाषण केलं. तो म्हणाला,

'मी सत्याचा शोध सोडून द्यावा या अटीवर तुम्ही मला निर्दोषी म्हणून सोडून देऊं इच्छित असाल तर मी त्याबद्दल म्हणेन, हे आथे-

निअन लोकहो, मी तुमचा आभारी आहे; पण तुमच्या आज्ञेपेक्षां ज्या परमेश्वरानं मला या कार्याला प्रवृत्त केलं, त्याची आज्ञा मला पाळलीच पाहिजे. आणि जोपर्यंत माझ्या जीवांत जीव व अंगांत शक्ती आहे तोपर्यंत मी माझा सत्याचा मार्ग सोडणार नाहीं. या उलट वागणारा जो जो मला भेटेल त्या प्रत्येकाला मी हेच म्हणेन कीं, ज्ञान व सत्य यांची पर्वा न करतां व आपल्या आत्म्याला श्रेष्ठत्व न देतां, केवळ संपत्ती व मान सन्मान यांतच गुरफटून जातांना तुला लाज कशी वाटत नाहीं? मला मृत्यू ही काय चीज आहे हें माहित नाहीं. कदाचित् मृत्यू हितकारकही असेल; मला त्याचं भय वाटत नाहीं. मला एक गोष्ट माहित आहे कीं, स्वतःच्या ध्येयापासून ढळणं ही वाईट गोष्ट आहे. सहाजिकच जी गोष्ट मला चांगली असावीशी वाटते, ती मी ग्राह्य मानतों.'

जिवंतपणीं सॉक्रेटीसनें सत्य व ज्ञान यांची सेवा उत्तम रीतिनं केलीच; पण आपल्या बलीदानानं तो ही सेवा अधिक चांगल्या रीतिनं करीत आहे.

समाजसत्तावाद, भांडवलशाही व इतर अनेक प्रश्नासंबंधी आज तुला पुष्कळ वाचायला मिळेल. चर्चा नि वादविवादही ऐकायला मिळतील. जगांत बऱ्याचशा विपत्ती व अन्याय आढळून येतात. पुष्कळ लोकांना त्याबद्दल तीव्र असंतोष वाटतो व ही स्थिती बदलण्याची ते इच्छा करतात. प्लेटोनें सुद्धां सरकारपुढील प्रश्नांचा विचार करून त्या संबंधी लिहून ठेवलं आहे. यावरून त्या काळांत सुद्धां एकाद्या देशाचं सरकार किंवा समाज कसा असावा म्हणजे सुस्थिति निर्माण होईल, याचा लोक विचार करीत हें स्पष्ट होतं.

प्लेटोच्या वृध्दापकाळांत आणखी एक ख्यातनाम झालेला ग्रीक पुरुष पुढें येत होता. त्याचं नांव ॲरिस्टॉटल. ॲलेक्झांडरचा तो खासगी

शिक्षक असून, ॲलेक्झांडरनें त्याला त्याच्या कार्यांत पुष्कळशी मदत केली. सॉक्रेटीस व प्लेटोप्रमाणें, ॲरिस्टॉटलनें,तत्वज्ञानविषयक प्रश्नासंबंधीं आपल्या डोक्याला शीण दिला नाहीं. त्याला निसर्गांतील विविध गोष्टींचें निरिक्षण करण्याची व निसर्गाचे मार्ग समजावून घेण्याची विशेष आवड होती. आतां या प्रकाराला नैसर्गिक तत्वज्ञान किंवा शास्त्रीय विज्ञान असं म्हणतात. अशा रीतीनं, ॲरिस्टॉटल हा आरंभीच्या काळांतील शास्त्रज्ञापैकीं एक होता.

आतां आपल्याला ॲरिस्टॉटलचा शिष्य जो बलाढ्य ॲलेक्झांडर, त्याच्या तुफानी कारकीर्दीचं अवलोकन केलं पाहिजे; पण ते उद्यां, आज इतकंच पुरे.

आज वसंत पंचमी; वसंतागमन. फारच अल्पकालीन हिंवाळा संपून हवेंतील झोंबरेपणा नाहींसा झाला आहे. आमच्याकडे पक्षिगण येऊं लागले असून, त्यांच्या आलापांनीं वातावरण भरून गेलं आहे. आणि आजच बरोबर पंधरावर्षांपूर्वीं दिल्लींत तुझ्या आईचा नि माझा विवाह झाला.

१८

# विख्यात पण आढ्यताखोर जेता

२४ जानेवारी १९३१

माझ्यां गेल्या पत्रांत व त्या पूर्वीही मी ॲलेक्झांडर दी ग्रेटचा उल्लेख केला आहे. मला वाटतं, मी त्याचा ग्रीक म्हणून उल्लेख केला आहे; पण तें तितकंस बरोबर नाहीं. वस्तुत: तो मॅसिडोनियन म्हणजे ग्रिसच्या उत्तरेकडील देशांतील. मॅसिडोनियन लोकांचं ग्रीकांशी पुष्कळ प्रकारें साम्य होतं; ग्रीक लोकांचे ते भाऊबंदंच म्हणेनास कां ! ॲले-क्झांडरचा बाप फिलीप हा मॅसिडोनियाचा राजा होता. तो कर्तबगार असून, त्यानं आपलं छोटं राज्य प्रबळ करून, कार्यक्षम सैन्याची उभारणी केली होती. ॲलेक्झांडरला 'बलाढ्य' [ The great ] असं म्हणतात व इतिहासांत तो फार प्रसिध्द आहे; पण त्याच्या भावी कर्तबगारीची बरीचशी पूर्व तयारी फिलीपनं मोठ्या काळजीपूर्वक केली होती. ॲले-क्झांडर खरोखरच मोठा होता कीं नाहीं हा वादग्रस्त प्रश्न आहे. माझा तर तो खात्रीनं आवडता नाहीं. मात्र त्यानं, आपल्या अल्प जीवनक्रमांत, दोन्ही खंडांत नांव गाजविलं व इतिहासांत तो पहिला जगज्जेता समजला जातो. अगदीं लांब, मध्य आशियांतील प्रदेशांत, अद्यापही तो शिकंदर म्हणून प्रसिद्ध आहे. तो कसा कां असेना, इतिहासानं त्याच्या नांवाभोंवती एक प्रकारची मोहिनी निर्माण केली आहे. त्याच्यानंतर अनेक शहरांना, त्याचं नांव देण्यांत आलं व त्यापैकीं कांहीं शहरें तर अद्याप अस्तित्वांत आहेत यापैकीं सर्वांत मोठं शहर म्हणजे इजिप्त मधील ॲलेक्झांड्रीया.

वयाच्या अवघ्या विसाव्या वर्षी, ॲलेक्झांडर राजा झाला. मोठेपण मिळविण्याच्या महत्त्वाकांक्षेनं पछाडल्यामुळें, बापानं तयार केलेलं उत्कृष्ट

सैन्य घेऊन आपल्या जुन्या शत्रूंवर इराणवर चालून जाण्यास तो उत्सुक होता. ग्रीकांना फिलीप किंवा अॅलेक्झांडर हे दोघेही नको होते; पण त्यांच्या सामर्थ्यापुढें त्यांना थोडसं नसतं घ्यावं लागलं व सर्व ग्रीक फौजांचे सेनापती म्हणून दोघांनाही लागोपाठ मान्यता द्यावी लागली. याच ग्रीक फौजापुढे इराणवर घसरणार होत्या. एका नवोदित सत्तेपुढें अशा रीतिनं ग्रीकांना मान वाकविणं भाग पडलं. फक्त थेबेस नांवाच्या एका ग्रीक शहरानं अॅलेक्झांडरविरुध्द बंड पुकारलं; पण या बंडाचा मोठ्या क्रूरपणानं व जबरदस्तीनं बीमोड करण्यांत आला. या प्रसिध्द शहराची त्यानं धूळधाण उडवून, तेथील इमारती जमीनदोस्त केल्या; कित्येक लोकांची कत्तल उडवून, हजारो लोकांना गुलाम म्हणून विकण्यांत आलं. आपल्या या रानटी कृत्यानं त्यानं संबंध ग्रीस थरारून सोडलं. त्याच्या या व अशांच प्रकारच्या इतर कृत्यामुळं तो आदरणीय न वाटतां उलट आपणास त्याच्याविषयी तिरस्कारच वाटतो.

अॅलक्झांडरनें इराणी राज्याच्या अंमलाखालील इजिप्त चुटकीसरशी जिकला. या पूर्वी त्यानें खुद्द इराणी राजाचा क्षेरक्ससनंतर गादीवर आलेल्या तिसऱ्या डारियसचाही पराभव केला होता. लवकरच त्यानं इराणवर आणखी एक स्वारी करून त्याचा दुसऱ्यांदा पराभव केला. क्षेरक्ससनें आथेन्सशहर बेचिराख केलं होतं. त्याचा सूड म्हणून अॅलेक्झांडरनें डारियसचा भव्य प्रासाद उध्वस्त केला.

एक हजार वर्षापूर्वी फिर्दोशी नामक कवीनं रचलेलं एक जुनं खंडकाव्य आहे. या काव्याचं नांव शहानामा असं असून त्यांत इराणी राजवंशाचा इतिहास आलेला आहे. तसंच यांत अॅलेक्झांडर व डारियस यांच्यामधील लढायांचें फारच रसभरीत वर्णन करण्यांत आलं आहे. हा डारियसचा पराभव झाल्यानंतर त्यानं हिंदुस्थानची मदत मागितली असं दिसून येतं.

हिंदुस्थानची मदत मागितली असं दिसून येतं. हिंदुस्थानांत, वायव्य सरहद्दप्रांतावर राज्य करीत असलेल्या फूर किंवा पोरस राजाकडे, वायुवेगानें सांडणीस्वार पाठविण्यांत आला; पण त्याला मदत करणं पोरसला मुळींच शक्य झालं नाहीं. लवकरच, खुद्द पोरसवरच ॲलेक्झांडरची धाड आली. हिंदुस्थानात तयार झालेल्या तरवारी व खंजीर इराणी राजे व सरदार वापरीत असल्याचे अनेक मनोरंजक उल्लेख फिर्दोशीच्या शहानाम्यांत आहेत. यावरून ॲलेक्झांडरच्या काळांत हिंदुस्थानांत उत्कृष्ट पोलादी तरवारी होत असून, त्यांना बाहेरच्या देशांत मागणी होती, असं दिसतं.

इराणनंतर ॲलेक्झांडरनें पुढं कूच केलं. हिरात, काबूल, समरकंद या प्रदेशांतून, तो सिंधू नदीच्या उत्तरकडील प्रदेशांत उतरला. या ठिकाणीं त्याला अटकाव करणारा पहिला हिंदी राजा भेटला. ग्रीक इतिहासकारांनीं आपल्या पद्धतीप्रमाणं त्याचा पोरस असा उल्लेख केला आहे. अर्थात् त्याचं खरं नांव जवळ जवळ तसंच असलं पाहिजे; पण त्याबद्दल कांहींच माहिती मिळत नाहीं. पोरस फारच शौर्यानं लढला व त्याच्यावर मात करणं ॲलेक्झांडरला जड गेलं. खुद्द ॲलेक्झांडरवर पोरसची धिप्पाड शरीरयष्टी नि दिलदारपणा यांचा इतका परिणाम झाला कीं, त्याचा पराभव झाल्यानंतर सुद्धां त्यानं त्याचं राज्य त्याच्याकडंच ठेवलं. मात्र पोरस यापुढें स्वतंत्र राजा राहण्याऐवजीं ग्रीकांचा सुभेदार बनला.

ॲलेक्झांडर हिंदुस्थानांत खैबर खिंडीतून तक्षिलामार्गे आला. हें तक्षिला शहर रावळपिंडीच्या उत्तरेस असून, अद्यापहि त्या प्राचीन शहराचे अवशेष दृष्टीस पडतात. पोरसला पराभूत केल्यावर दक्षिणेकडे गंगा नदीपर्यंत कूच करण्याचा ॲलेक्झांडरचा बेत होता; पण तो सोडून देऊन तो सीमाप्रांतातूनच परत फिरला. खरंच ! ॲलेक्झांडर तसाच मध्य हिंदुस्थानांत

चालून आला असतां तर काय झालं असतं ? मोठा मनोरंजक व विचार-करण्याजोगा प्रश्न आहे हा ! त्याला जय मिळत गेला असतां कीं हिंदी फौजानीं त्याचा फडशा उडविला असतां? सीमा प्रांतांतील पोरस सारख्या राजानं त्याला बरंच जेरीला आणलं होतं. अशा स्थितींत मध्य हिंदुस्थानां-तील मोठ्या राजांनीं त्याला परिणामकारकरीत्या पायबंद घालणं अशक्य नव्हतं. पण ॲलेक्झांडरच्या इच्छेचा प्रश्नच उद्भवला नाहीं. त्याच्या सैनिकांनीं काय करायचं तें ठरवून टाकलं होतं. पुष्कळ दिवसांच्या मोहि-मेमुळं ते कंटाळून व त्रासून गेले होते. तसंच हिंदी सैनिकांच्या लढाऊ-पणाचा त्यांच्यावर परिणाम झाला असल्यामुळं, पराभवाचा धोका पत्कर-ण्याची त्यांची तयारी नसावी. कांहीं कां असेना, परत फिरण्याचा त्यांनीं आग्रह चालविला व ॲलेक्झांडरला तें मानणं भाग पडलं. मात्र हा परतीचा प्रवास ग्रीकांना चांगलाच भोवला. अन्नपाण्याच्या तुटवड्यामुळं त्यांचे अतिशय हाल झाले. त्यानंतर थोड्यांच दिवसांत इसवी सनापूर्वी ३२३ मध्यें, ॲलेक्झांडर बाबिलोन येथें मरण पावला. इराणी मोहिमेवर म्हणून तो जो बाहेर पडला, तो पुन्हां त्याला आपल्या मातृभूमीचं—मॅसिडोनियाचं-दर्शन झालं नाहीं.

मृत्यूसमयीं ॲलेक्झांडरचं वय ३३ वर्षांचं होतं. आपल्या अल्प कारकिर्दींत या 'थोर' माणसानं काय करून ठेविलं आहे ? कांहीं नामांकित लढाया जिंकल्या. तो महान सेनापती होता हे निःसंशय; पण त्याबरोबरच तो पोकळ डौली, अहंमन्य असून प्रसंगीं अत्यंत निर्दय व बेभान बने. आपण प्रतीपरमेश्वर अशी त्याची समजूत होती. राग-लहरीच्या झटक्यांत त्यानं आपल्या अनेक जिवलग मित्रांनाही यमसदनास पाठविलं व अनेक मोठीं शहरं, तेथील रहिवाशांसुद्धां, जमीनदोस्त केलीं त्यानं मोठं

साम्राज्य उभारलं; पण आपल्या मागं त्यानं भरीव असं कार्य, इतकंच काय पण साईचे रस्तेसुद्धां, ठेवलेले नाहींत. धूमकेतूप्रमाणं तो उगवला व धूमकेतूप्रमाणं नाहींसा झाला. स्वतःच्या आठवणीपलीकडे त्यानं पाठीमागं कांहीं ठेवलं नाहीं. त्याच्यापश्चात् त्याच्या कुटुंबांतील मंडळींनीं एकमेकांचे मुडदे पाडले व त्याच्या विस्तृत साम्राज्याचे तुकडे पडले. ॲलेक्झांडरला जगज्जेता म्हणतात व एकदां तर आपल्याला जिंकायला कांहीं उरलं नाहीं म्हणून तो रडलाही म्हणे! पण सीमाप्रांत सोडला तर सारा हिंदुस्थान त्याच्या कब्जांत आलेला नव्हता आणि चीन हेंही यावेळीं मोठं राष्ट्र असून, ॲलेक्झांडर तिकडे फिरकलाही नव्हता.

ॲलेक्झांडरचें सर्व साम्राज्य त्याच्या सेनापतींनीं वाटून घेतलं. इजिप्त टॉलेमीकडे गेला. तेथें त्यानं प्रबळ सरकार अमलांत आणून आपल्या वंशाची स्थापना केली. या अमदानींत इजिप्त बलाढ्य बनलं. इजिप्तची राजधानी ॲलेक्झांड्रिया हें महत्वाचं शहर असून ते शास्त्रीय विज्ञान, तत्वज्ञान व विद्वत्तेबद्दल प्रसिद्ध होतं.

इराण, मेसोपोटेमिया व आशिया मायनॉरचा कांहीं भाग दुसऱ्या सेनापतीच्या, सेल्यूकसच्या, वांट्याला आला. याशिवाय ॲलेक्झांडरनें जिंकलेला हिंदुस्थानांतील सीमाप्रांताचा भागही त्याच्याकडेच राहीला; पण त्याला हा भाग ताब्यांत ठेवतां आला नाहीं. ॲलेक्झांडरच्या मृत्यूनंतर तेथील फौजेला पिटाळून लावण्यात आलं.

ॲलेक्झांडर इसवी सनापूर्वी ३२६ मध्यें हिंदुस्थानांत आला होता. त्याची भेट म्हणजे एक नुसती टोळधाड असून, त्यामुळें हिंदुस्थानांवर क्वचितच परिणाम झाला. कांहीं लोकांना वाटतं कीं, या स्वारीमुळें हिंदी व ग्रीकांमध्यें दळण वळण सुरुं होण्यास मदत झाली; पण खरी गोष्ट

ही कीं, अॅलेक्झांडरच्या काळापूर्वीही पूर्व व पश्चिम यांच्यामध्यें हमरस्ता असून हिंदुस्थानचें इराण व ग्रीस बरोबरही सतत दळण वळण चालूं होतं अर्थात् अॅलेक्झांडरच्या भेटीमुळें हा संघर्ष वाढून हिंदी व ग्रीक या दोन संस्कृतींचा बराचसा मिलाफ झाला असावा.

अॅलेक्झांडरची स्वारी व मृत्यू याचा तादृश्य परिणाम म्हणजे हिंदुस्थानांत एक मोठ साम्राज्य—मौर्य साम्राज्य—स्थापन झालं. हिंदी इतिहासांतील उज्वळ अशा काळांपैकीं हा काळ होता आणि त्याकरितां आपल्याला थोडीफार सवड काढली पाहिजे.

---

१९

# चंद्रगुप्त मौर्य व अर्थशास्त्र

२५ जानेवारी १९३१

माझ्या एका पत्रांत मी मगधाचा उल्लेख केला आहे. मगधाचं राज्य जुनं असून, सध्यांच्या बिहार प्रांताच्या ठिकाणीं मगध देश वसलेला होता. राजधानीचं ठिकाण पाटलीपुत्र अथवा सध्याचं पाटणा शहर हें होतं. ज्या काळचा आपण सध्यां विचार करीत आहोंत त्या काळांत, मगध नंदवंशीय राजाच्या अमलाखालीं असून, ॲलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळींही पाटलीपुत्र येथें एक नंद राजाच राज्य करीत होता. तेथें चंद्रगुप्त या नांवाचा एक तरूण होता.कदाचित् तो नंद राजाचा नातलग असावा. चंद्रगुप्त हा फार चाणाक्ष, तडफदार, महत्वाकांक्षी होता असं दिसतं. नंद राजाला तो अतिचतुर वाटल्यामुळं म्हणा किंवा त्याचं एकादं कृत्य त्याला न आवडल्यामुळं म्हणा, त्याला राज्यांतून हद्दपार करण्यांत आलं. चंद्रगुप्त बहुधा ॲलेक्झांडर व ग्रीकांच्या कथांनीं आकृष्ट झाल्यामुळें उत्तरेकडे तक्षिला येथें गेला. त्याच्याबरोबर विष्णुगुप्त--चाणक्य--नांवाचा एक अतिशय हुषार ब्राम्हण होता. चंद्रगुप्त व चाणक्य हें दोघेहि नशिबापुढें मान वाकविणारें लेचेंपेचें पुरुष नव्हते. त्यांच्या डोक्यांत दांडग्या व महत्वाकांक्षी योजना घोळत असून, त्यांना पुढं धडक मारावयाची होती आणि यश मिळवायचं होतं. कदाचित् ॲलेक्झांडरच्या कीर्तीमुळें दिपून जाऊन, चंद्रगुप्तानं त्याचं अनुकरण करण्याचं ठरविलं असावं. या बाबतींत चाणक्य हा त्याला शोभेसा मित्र व सल्लागार होता. दोघांनींही जागरूक राहून, तक्षिलेंतील घडामोडीकडे बारकाईनं लक्ष ठेवलं होतं. त्यांना योग्य संधि हवी होती.

लवकरच ही संधि आली. ॲलेक्झांडरच्या मृत्यूची वार्ता ताक्षिलांत येऊन पोंहचली. चंद्रगुप्तानं जाणलं कीं, कृतीची हीच वेळ आहे. त्यानं आसपासच्या लोकांना चिथावणी दिली व त्यांच्या मदतीनं, ॲलेक्झांडरनं तेथें ठेविलेल्या ग्रीक सैन्याला पिटाळून लावलं. तक्षिला काबीज केल्यावर चंद्रगुप्त व त्याच्या सहकाऱ्यांनीं दक्षिणकडे पाटलीपुत्राच्या रोखानं कूच करून नंदराजाचा मोड केला. ही गोष्ट इसवी सनापूर्वी ३२१ मध्यें किंवा ॲलेक्झांडरच्या मृत्यूनंतर पांच वर्षांनीं घडली. या वेळेपासून मौर्यवंशाच्या कारकिर्दीला प्रारंभ झाला. चंद्रगुप्ताला मौर्य कां म्हणतात तें स्पष्ट नाही. कांहींच्या मतें, त्याच्या आईचं नांव मुरा असल्यामुळं, त्याला मौर्य हें नांव मिळालं असावं; तर कांहींच्या मतें त्याचा मातामह राजाचे मोर संभाळण्याच्या कामावर होता आणि संस्कृतमध्यें मोराला मयूर म्हणतात. पण त्याच्या नांवाची उत्पत्ती कशी कां असेना, पुढें कित्येक शतकांनं चंद्रगुप्त नांवाचा जो आणखी एक प्रख्यात राजा होऊन गेला, त्याच्या नांवाशीं या चंद्रगुप्ताच्या नांवाचा घोटाळा होऊं नये म्हणून त्याला चंद्रगुप्त मौर्य म्हणत असावेत.

महाभारत व त्याचप्रमाणें इतर कथा पुराणातून सर्व भरतावर राज्य करणाऱ्या चक्रवर्ति राजांची माहिती आहे; पण या कालाविषयीं आपल्याला स्पष्ट माहिती नाहीं. या कथांतून प्राचीन राज्यकर्त्यांच्या सामर्थ्याची अतिशयोक्ती वर्णनं असणेंहि शक्य आहे. तें कांहीं कां असेना, हिंदुस्थानच्या इतिहासांतील पहिलं बलाढ्य व विस्तीर्ण साम्राज्य म्हणजे चंद्रगुप्त मौर्याचं. आपल्याला असं दिसून येईल कीं, तेथील अनुशासन संस्था पुढारलेली व खंबीर होती.त्यावरून हेंहि स्पष्ट होतं कीं, असली अनुशासन संस्था व राज्य एकाएकी अस्तित्वांत येण्याचा संभव नव्हता. यापूर्वी दीर्घ

काल छोट्या छोट्या राज्यांच्या एकीकरणाचें प्रयोग व राज्य कलेंत सुधारणा अशा निरनिराळ्या प्रवृत्त्या चालू असल्या पाहिजेत.

चंद्रगुप्ताच्या अमदानींतच अॅलेक्झांडरचा सेनापति व आशिया मायनॉर तें हिंदुस्थानपर्यंतचा अधिपति, सेल्यूकस, यानें सैन्यानिशीं सिंधू नद उतरून हिंदुस्थानवर स्वारी केली. त्याला या उतावळेपणाबद्दल पश्चात्ताप करावा लागला. चंद्रगुप्तानें त्याचा पुरा मोड केला व सेल्यूकसला आल्या वाटेनें परत जावें लागलें. कांहीं फायदा होण्याऐवजीं, त्याला गांधार किंवा अफगाणिस्थानचा काबूल—हिरात पर्यंतचा बराच मोठा भाग, चंद्रगुप्ताला द्यावा लागला. याशिवाय चंद्रगुप्तानें सेल्यूकसच्या मुलीशीं विवाहही केला. चंद्रगुप्ताच्या साम्राज्यानें आतां काबूल पासून बंगालपर्यंत सर्व उत्तर हिंदुस्थान व अफगाणिस्थानचा कांहीं भाग तसेंच अरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंतचा प्रदेश व्यापला होता. फक्त दक्षिण हिंदुस्थान त्याच्या साम्राज्यांत मोडत नव्हतें. पाटलीपुत्र ही या मोठ्या साम्राज्याची राजधानी होती.

सेल्यूकसनें चंद्रगुप्ताच्या दरबारीं मेगॅस्थीनिस याला वकील म्हणून पाठविलें होतें. मेगॅस्थीनिसनें या काळांतील मनोरंजक हकिगत लिहून ठेवली आहे. शिवाय ज्यामुळें चंद्रगुप्ताच्या राज्याविषयीं अधिक मनोरंजक व तपशीलवार माहिती पुरविणारा आणखी एक वृत्तांत आहे. हा म्हणजे कौटिल्याचें अर्थशास्त्र. हा कौटिल्य म्हणजे इतर कोणी नसून, आपला जुना दोस्त चाणक्य किंवा विष्णुगुप्त हाच होय.

या अर्थशास्त्रांत इतक्या विविध विषयांचा उहापोह व चर्चा केली आहे कीं, त्या विषयीं फारसें सांगणें मला शक्य नाहीं. राजांची कर्तव्यें, मंत्री, सल्लागार, मंत्रिमंडळाच्या बैठकी, सरकारी खातीं, व्यापार धंदे, शहरें व

खेडीं यांचा कारभार, कायदेकानू व न्यायकोर्टे, सामाजिक चालीरीती स्त्रियांचे हक्क, वृध्द व अनाथांचे पालनपोषण, विवाह व घटस्फोट, कर सैन्य व आरमार, युध्द व शांतता, मुत्सद्दीपणा, शेतकी, कातकाम व विण काम, कारागीर, परवाने इतकंच काय पण तुरुंग आदिकरून सर्व गोष्टींच त्यांत उहापोह करण्यांत आला आहे. मला ही यादी खूप लांबविता येईल पण हे पत्र मला कौटील्याच्या प्रकरण शीर्षकांनीं भरून काढावयाचं नाहीं

राज्याभिषेक प्रसंगीं, जनतेच्या हस्तें राजसत्ता मिळाल्यावर, राजाला जनसेवेची पुढील शपथ घ्यावी लागे. ‘ मी तुमच्यावर जुलूम केला तर, स्वर्ग, आयुष्य व संततीसुख माझ्या वाट्यांला न येवो ! ’ राजाचं काम व नित्य नैमित्यिकं पुढीलप्रमाणें सांगितली आहेत ‘ राजाला कोणत्याही जरूरीच्या कामाकरितां सदैव तयार राहिलं पाहिजे. सार्वजनिक कार्यांच्या आड त्याची लहर येतां कामा नये. राजा तडफदार असला तर प्रजाही तडफदार राहाते. प्रजेच्या सुखांत, प्रजेच्या कल्याणांत राजाचं सुख आहे. ज्यामुळं आपलं रंजन होईल, तें योग्य असं त्यानं न समजतां ज्या मुळं प्रजानुरंजन होईल, तें योग्य असं त्यानं मानलं पाहिजे. ’ आपल्या या जगांतून राजाचें उच्चाटन होत आहे. सध्यां थोडेंच राजे राहिले असून, त्यांनाही लवकरच जावं लागेल. अर्थात् प्राचीन काळीं राजपद म्हणजें जनतेची सेवा ही कल्पना रूढ होती हे लक्षांत घेण्याजोगं आहे. त्यावेळीं ईश्वरदत्त हक्क नव्हता कीं अनियमित सत्ता नव्हती. एखाद राजा गैर वागूं लागला तर त्याचें उच्चाटन करून त्याच्या जागीं दुस- ऱ्याची स्थापना करण्याचा प्रजाजनांना हक्क होता. राजेलोक ही गोष्ट जाणून असत. अर्थात् पुष्कळ राजे या आदर्शाप्रमाणं वागले नाहींत आणि आपल्या चुकांमुळं, त्यांनीं देशाला व जनतेला दुर्दशेत लोटलं.

'आर्य हा कधींच गुलाम होणार नाहीं,' या प्राचीन तत्त्वावरही अर्थशास्त्रांत भर देण्यांत आला आहे. या देशांत बाहेरून आणलेले व खुद्द येथील असे बरेच गुलाम होते; पण आर्यांपुरता विचार केला तर ते कधींही गुलाम न होतील अशी काळजी घेतली जाई.

मौर्य साम्राज्याच्या राजधानीचं ठिकाण पाटलीपुत्र हें होतं. हें भव्य शहर असून, गंगेच्या तीरावरील त्याचा दर्शनी भाग नऊ मैल पसरलेला होता. शहराला मुख्य असे चौसष्ट दरवाजे असून, त्याशिवाय शेंकडों लहान दरवाजे होते. घरें लांकडाचीं होतीं. साहाजिकच आगीची भीति असल्यामुळें त्यापासून बचाव करण्यासाठीं, परिश्रमपूर्वक तरतूद करण्यांत आली होती. मुख्य मुख्य रस्त्यावर पाण्यानं भरलेले हजारो हंडे सदैव ठेवलेले असत. याशिवाय आगीच्या बंदोबस्तासाठीं म्हणून प्रत्येक घरमालकानं पाणी भरलेले हंडे सतत तयार ठेवले पाहिजेत व त्याच्याजवळ शिडी, दोर व इतर आवश्यक वस्तू असल्या पाहिजेत, असा निर्बंध असे.

कौटील्यानें नमूद करून ठेवलेला व तत्कालीन शहरांत जारी असलेला असा एक नियम तुला मनोरंजक वाटेल. जो कोणी रस्त्यांत घाण टाकील, त्याला दंडाची शिक्षा ठोठावली जाई. याशिवाय रस्त्यांत कोणी चिखल केला व पाणी सांचू दिलं तर, त्यालाही दंड होई. हे नियम जर अमलांत असतील तर पाटलीपुत्र व इतर शहरें हीं रमणीय, स्वच्छ व आरोग्यशीर असलीं पाहिजेत. आपल्या सध्यांच्या नगरपालिकांनीं असले कांहीं नियम केले तर किती छान होईल!

पाटलीपुत्रांत शहराचा कारभार पहाण्यासाठीं नगरपालिका असे. ती लोकनियुक्त असे. नगरपालिकेंत तीस सभासद असून, पांच पांच सभासदांची एक अशा सहा समित्या असत. शहरांतील उद्योगधंदे व हस्त-

व्यवसाय, प्रवाशी व यात्रेकरू यांची व्यवस्था, जन्म मृत्यूंची नोंद, कार-खान्यांतील माल व इतर कांहीं कामें या समित्याकडे असत. नगरपालिका आरोग्य, जमाखर्च, पाणी पुरवठा, सार्वजानिक बागा व इमारती यांजकडे लक्ष देई.

याशिवाय न्यायनिवाडा करण्याकरितां पंचायती असून, अपिल कोर्टेंही होतीं. दुष्काळ निवारणार्थ खास उपाय योजण्यांत येत व दुष्काळा-करितां म्हणून निम्मी सरकारी धान्यकोठारें राखून ठेवण्यांत येत.

चंद्रगुप्त व चाणक्य यांचं २२०० वर्षांपूर्वीचं मौर्य साम्राज्य असं होतं. कौटिल्य व मेगॅस्थीनिस यांनीं लिहून ठेविलेल्या कांहीं गोष्टींचा मी नुसतां उल्लेख केला आहे; पण तेवढयावरूनही तुला तत्कालीन उत्तर हिंदुस्थानची सर्व साधारण कल्पना येईल. पाटलीपुत्रआदि मोठ्या शहरांपासून तों हजारों खेडगांवापर्यंत जिकडे तिकडे जिवंतपणा रसरसत असला पाहिजे. साम्राज्यांतील एका टोंकापासून तों दुसऱ्या टोंकापर्यंत जाण्याकरितां मोठमोठे रस्ते होते. मुख्य राजरस्ता पाटलीपुत्रापासून निघून वायव्य सरहद्दीपर्यंत गेला होता. राज्यांत अनेक कालवे असून, त्यांची व्यवस्था एका स्वतंत्र खात्याकडे होती. याशिवाय बंदरें, धक्के, पूल, बोटी, जहाजें, याकरितांही एक स्वतंत्र खातं होतं. याकाळांत हिंदुस्था-नचीं जहाजें ब्रम्हदेश--चीनपर्यंत जात.

चंद्रगुप्तानें एकंदर २४ वर्षे राज्य केलें. इसवीसनापूर्वी २९६ मध्यें तो मरण पावला. मौर्य साम्राज्याची हकिगत पुढील पत्रींही चालू ठेवूं.

२०

# तीन महिने

एस्. एस्. कॉंकोर्डिया

२१ एप्रिल १९३१

तुला लिहून कितीतरी दिवस झाले. जवळजवळ तीन महिनेच. हा काळ दुःखांत गेला, अडचणी आल्या, त्रास सोसावा लागला. हिंदुस्थानांत स्थित्यंतर झालं व आपल्या घरगुती वातावरणांतही फरक पडला. हिंदुस्थाननें आपली सत्याग्रहाची—कायदेभंगाची चळवळ तात्पुरती थांबविली असली तरी आपला पुढील प्रश्न सोडाविणं कांहीं सोपं नाहीं; आणि आपल्या घरांतील तर आवडतं मुख्य माणूस नाहींसं झालं आहे. हें माणूस आपला आधार व स्फूर्तिस्थान असून, त्याच्या छायेखालीं आपण वाढलों; हिंदुस्थानकरिता—आपल्या मातृभूमीकरिता कांहीं तरी करायची शिकवणूक त्या तिच्याकडूनच आपणास मिळाली.

नैनी तुरुंगांतील तो दिवस मला चांगला आठवतो! जानेवारीची २६ वी तारीख. मी नेहमींच्या संवयीप्रमाणं, गतकालाविषयीं तुला लिहायला बसलों. फक्त आदले दिवशींच मी चंद्रगुप्त व मौर्य साम्राज्याविषयी लिहिलं होतं आणि हीच हकीगत पुढें चालुं ठेऊन, ‘ थोर ’ अशोकाविषयीं सांगावयाचं ठरविलं होतं. अशोकरूपीं दैदिप्यमान तारा— हिंदी राष्ट्राच्या क्षितिजावर चमकला व आपली अमर स्मृती मागें ठेऊन अस्तंगत झाला; पण अशोकचा विचार येतांच माझं मन भ्रमण करूं लागलं. वर्तमानकाळ पुढं दिसू लागला व ज्या दिवशीं मी तुला हें पत्र लिहायला बसलो त्या २६ जानेवारीचा विचार मनांत घोळू लागला. हा दिवस

आपल्याला अत्यंत महत्त्वाचा. एक वर्षापूर्वी तो आपण सर्व हिंदुस्थानांत खेड्यापाड्यांतूनही स्वातंत्र्य—दिन म्हणून साजरा केला व लाखो लोकांनीं त्या दिवशीं स्वातंत्र्याची शपथ घतली. लढा, हालअपेष्टा व यश यांनीं भरलेलं असं एक वर्ष निघून गेलं. हिंदुस्थान पुनः हा महान दिवस साजरा करणार आहे. मी नैनी तुरुंगाच्या सहा नंबरच्या कोठडींत बसलो होतो; पण माझं लक्ष त्या दिवसाच्या सभा मिरवणुकी, लाठीहल्ले, धरपकडी याकडेच वेधलं होतं. अभिमान, आनंद व मनस्ताप असे विविध तरंग उमटत होते, तोंच माझ्या विचारांची सांखळी अकस्मात् तुटली. दादू फार आजारी आहेत व त्यांच्याकडे जाण्यासाठीं माझी तावडतोब सुटका व्हावयाची आहे असं कळलं. काळजीनं व्यग्र झालो व विचार नाहींसे झाले. नुकतेंच सुरवात केलेलं पत्र बाजूला सारून, मी नैनी तुरुंगांतून आनंदभुवनाकडे निघालो.

दादूंच्या मृत्यूशय्येजवळ मी दहा दिवस होतो. त्यांच्या वेदना नि तळमळ व ते यमदूताला निधड्या छातीनं देत असलेली टक्कर, दहा दिवस अहोरात्र आम्हांला दिसत होती. आपल्या आयुष्यांत, ते अनेक वेळां झुंजले, त्यांनीं पुष्कळ जयही मिळविले. हार खाणें त्यांना माहीत नव्हतें व मृत्यूसमोर उभा असतांही ते डगमगले नाहींत. त्यांची ही शेवटली झुंज मी पहात असतां, दादूवर माझं इतकं प्रेम असून, त्यांच्या करितां मी कांहींच करूं शकत नव्हतो या विचारानं माझं अंतःकरण व्यथित झालं. माझ्या मनांत फार पूर्वी वाचलेल्या एडगार ॲलन पोच्या गोष्टींतील कांहीं ओळी आल्या.

‘ क्षीण इच्छाशक्तीचा दुर्बळपणा सोडला तर मनुष्य देवदूतापुढेंच काय पण मृत्यू पुढेंही सपशेल हार खाणार नाहीं. ’

६ फब्रुवारी रोजीं, पहाटे दादू आपल्याला सोडून गेले. ज्या ध्वजावर त्यांचें इतकें प्रेम त्यांतच त्यांचा नश्वर देह गुंडाळून, आपण लखनौहून आनंदभुवनात आणला. थोड्याच अवधींत त्यांच्या देहाची मूठभर राख झाली व गंगामाईनं हा अमूल्य ठेवा सागराकडे पोहोंचता केला.

त्यांच्यासाठीं लाखों लोक हळहळले; पण त्यांच्याच हाडामांसाचीं त्यांचीच मुलं आपण. आपलं काय ? आणि नवीन आनंद भुवनाचं काय ? आपल्या प्रमाणें तेंहि त्यांचंच अपत्य, त्यांनींच जिव्हाळ्यानं नि काळजीपूर्वक घडविलेलं. आज तें ओसाड व ओकं ओकं वाटतं. त्यांतलि चैतन्यच निघून गेल्यासारखं भासतं. आजही आनंदभुवनाच्या चबुतऱ्यावरुन जाताना दादूंना त्रास होऊ नये, ह्या विचारानं आपण जपून चालत असतो.

प्रत्येक पावलागणीक दादूंच्या आठवणीनं हृदय भरून येतं. दिवसां मागून दिवस जात आहेत; पण आपलं दुःख कमी झाल्याचं किंवा त्यांची गैरहजरी न जाणवल्याचं दिसत नाहीं. पण मला वाटतं, आपला हळवेपणा त्यांना आवडला नसता. त्यांनीं संकटांना तोंड दिलं, त्यावर मात केली. आपणही दुःखांत व्यग्र न होता आल्या प्रसंगाला तोंड द्यावं असं त्यांना वाटलं असतं. त्यांचं अपूरं राहिलेलं कार्य तसंच पुढं चालवावं असं त्यांना वाटलं असतं. काम पुढें दिसत असतांना, हिंदी स्वातंत्र्यासाठी आपल्या सेवेची जरुरी असतां, आपण स्वस्थ राहाणं वा दुःखांत बुडून जाणं कितपत योग्य आहे ? ध्येयाकरितां त्यांनीं देह ठेविला. त्याच ध्येयाकरितां आपण जगूं, लढूं व मरुं. किती झालं तरी आपण त्यांचींच मुलं. त्यांचें थोडं फार तेज, सामर्थ्य व खंबीरपणा आपणांत उतरला आहे.

हे पत्र लिहीत असतांना, माझ्या समोर अगदीं निळाभोर अरबी समुद्र पसरला आहे; दुसऱ्या बाजूला दूर अंतरावरील हिंदुस्थानचा किनारा

चालला आहे. मी या अफाट नि अमर्याद दर्याची, नैनी तुरुंगांतील उंच भिंतीत गुरफटलेल्या छोट्या कोठडीशीं तुलना करतो. तेथूनच मी तुला पूर्वीचीं पत्रं लिहिलीं आहेत. आतां क्षितिजाची बारीक रेषा माझ्यासमोर असून, त्या ठिकाणीं सागर आकाशाला भिडल्या सारखं वाटतं; पण तुरुंगात मात्र कैद्याचं क्षितीज म्हणजे भोंवतालच्या भिंतीचं टोक. आम्हां बंदीवानापैकीं आज बरेचजण बाहेर आहेत. त्यांना मोकळ्या हवेचा आस्वाद घेता येतो. पण आमचे पुष्कळ सहकारी अद्याप तुरुंगात असून, सागर, भूमि व क्षितीजाच्या देखाव्यांना मुकले आहेत. तसं पाहिलं तर, खुद्द हिंदुस्थान अद्याप बंदीत असून, त्याला स्वातंत्र्य मिळायचं आहे. हिंदुस्थान स्वतंत्र नसतां आपल्या स्वातंत्र्याला काय किंमत ?

---

२१

# अरबी समुद्र

एस्. एस्. कॅकोन्हिया

२२ एप्रिल १९३१

मुंबईहून कोलंबोला कॅकोन्हियाबोटीनें आपण चाललो आहोत, हें नवलच! चार वर्षांपूर्वी, याच कॅकोन्हियाची वाट पहात, मी कसा उभा होतों, हें मला चांगलं आठवतं. दादू या बोटीवर होते. मी तुला स्वित्सर्लंडमध्यें बेक्स येथील शाळेंत ठेवून, त्यांना भेटण्याकरितां व्हेनिसला गेलो होतो. पुन्हां कांहीं महिन्यांनीं दादू याच बोटीनें युरोपहून मुंबईला आले व मी त्यांना तेथें भेटलों. त्यावेळीं दादूबरोबर असलेले कांहीं प्रवासी आमच्याबरोबर आतांही आहेत; ते दादूबद्दल कितीतरी गोष्टी सांगतात.

काल गेल्या तीन महिन्यांतील स्थित्यंतराबद्दल मी लिहिलं. या काळांत घडलेला एक प्रसंग तूं लक्षांत ठेवावास असं मला वाटतं. हिंदुस्थानच्या तर तो कित्येक वर्षेपर्यंत आठवणींत राहील. एक महिन्यापूर्वी हिंदुस्थानांतील एक शूर वीर- गणेश शंकर विद्यार्थी- कानपुरांत दुसऱ्या लोकांना वांचवायला गेले असतां मारले गेले. गणेशजी माझे मित्र असून, थोर अंतःकरणाचे होते. त्यांच्या सारख्या निःस्वार्थी सहकाऱ्याच्या खांद्याला खांदा लावून काम करणं आम्हांला बहुमानाचं वाटे. गेल्या महिन्यांत कानपूर येथें दंगा होऊन, हिंदी लोक हिंदी लोकांचीच टाळकी सडकूं लागले. गणेशजींनीं त्या खाईत उडी घेतली; पण ती आपल्या देशबांधवांपैकीं कोणाशीं लढण्याकरितां नव्हे तर त्यांना वांचविण्याकरिता! त्यानीं

शेंकडों लोकांना वाचविलं; पण स्वतःचं रक्षण तें करूं शकले नाहींत. नव्हे, त्यानीं स्वतः:च्या जिवाची पर्वा केली नाहीं. ज्या लोकांना तें वांचवूं इच्छित होतें, त्यांच्याच हातून त्यांना मरण आलं. कानपूर व संयुक्तप्रांत एका तेजस्वी कार्यकर्त्याला मुकलं; आमचा एक जिव्हाळ्याचा व बुद्धीवान मित्र गेला! त्यांचा मृत्यु किती तेजस्वी! जमावाच्या माथेफिरूपणाला त्यांनीं शांत चित्तानं, न कचरतां तोंड दिलं. ऐन संकटांत व मृत्यू समोर असतां, त्यांच्या डोक्यांत एकच विचार घोळत होता. तो म्हणजे लोकांचा. त्याना वाचवावं कसं याचा !

तीन महिने ! काळरुपी महासागरांतील एक बिंदू. राष्ट्राच्या आयुष्यांतील उणेपुरं सेकंद ! तीनच आठवड्यापूर्वी मी सिंधमधील सिंधूच्या खोऱ्यांतील मोहेंजोदारोचे अवशेष पहावयास गेलो होतो. त्यावेळीं तूं माझ्या बरोबर नव्हतोस. भूपृष्ठाखालून भरीव विटांची घरं नि रुंदचरुंद रस्ते असलेलं असं महान शहर प्रकट होतांना पाहिलं. हें शहर पांच हजार वर्षांपूर्वीचं असावं असं म्हणतात.या प्राचीन शहरांत सापडलेलें सुरेख जडावाचे दागिने व भांडींही पाहिलीं. तेव्हां मला भास झाला कीं, उंची पोषाख केलेले तत्कालीन स्त्री-पुरुष रस्त्यावरुन फिरत आहेत, आपल्या बालिशवृत्तीला अनुसरुन मुलं खेळत आहेत, बाजार पेठा दुकानांनीं गजबजलेल्या आहेत, लोक सौदा करीत आहेत व देवालयांतील घंटांचा मधुर निनाद चालू आहे.

गेल्या पांचहजार वर्षांच्या जीवनक्रमांत हिंदमातेनं पुष्कळ स्थित्यंतरें पाहिलीं आहेत. मला कधीं कधीं वाटतं कीं, आपली ही आई जितकी प्राचीन तितकीच तरुण व सुंदर--आपल्या अर्भकांचा उतावळेपणा, त्यांचा क्षुल्लक मनस्ताप, त्यांचा क्षणिक आनंद व दुःखं पाहून हंसत तर नसेल !

---

२२

# सुट्टीचा दिवस व स्वप्नमय प्रवास

२६ मार्च १९३२

नैनी तुरुंगांतून, तुला गतकालीन इतिहासाबद्दल लिहून चौदा महिने झाले. पुढे तीन महिन्यांनीं, त्या मालेंतील आणखी दोन पत्रं अरबी समुद्रावरून लिहिलीं. यावेळीं आम्ही क्रॅकोव्हिया बोटीवरून लंकेकडे चाललो होतो. मी पत्र लिहीत असतांना, माझ्यासमोर अफाट सागर पसरला होता. माझी अधाशी दृष्टी त्याकडे लागली होती. पण डोळ्यांची तृप्ती होईना. नंतर लंकेंत गेलो व एक महिनाभर मनमुराद मजा मारून पाठीमागचे व्याप व मनस्ताप विसरण्याचा प्रयत्न केला. या अत्यंत सुंदर बेटांत आपण चोहोंकडे फिरलो, तेथील नितांत रमणीयता व बहरलेला निसर्ग पाहून थक्क झालो. आपण कँडी, नुवारा एलिया व अनुराधापुरा येथील प्राचीन श्रेष्ठत्वाची ग्वाही देणारे अवशेष पाहिलें; खरंच, आपण पाहिलेल्या कित्येक ठिकाणची स्मृतीच किती गोड वाटते! पण त्या सर्वांपेक्षां अयनवृत्तांवरील थंड अरण्याचा विचार करणंच मला आवडतं. समृद्ध, चैतन्ययुक्त व हजारों डोळ्यांनीं पहाणारं हें अरण्य; डौलदार, नाजूक, उंच व निर्भय असे अरेका वृक्ष; असंख्य श्रीफलें; हिरवीगार वनश्री, निळ्या सागराला व आकाशाला भेटतच आहेत असं वाटायला लावणारा व ताडवृक्षाच्या झालरीनं युक्त असा समुद्र किनारा: तिथें सागराचं जल चकाकतं व लांबवर उड्या मारतं, वारा वृक्षांच्या पाना-पानांमधून सळसळतो.

अयनवृत्ताला ही तुझी पहिलीच भेट होती. माझ्या दृष्टीनंसुद्धां हा नवीनच अनुभव होता. फार पूर्वी मी तेथें गेलो होतो, पण त्यावेळीं माझं तेथें थोडंच वास्तव्य असून, त्याची स्मृतीही जवळ जवळ नाहींशी झाली आहे. तेथील उष्णतेची भीति वाटत असल्यामुळें मी त्याकडे आकृष्ट झालों नव्हतो. माझं भान हरपलं तें फक्त तेथील समुद्र, पर्वत, उंचावरील धुकं नी हिमनद्या यांनीं. अर्थात लंकेमधील या अल्प वास्तव्यांतही अयन-वृत्तावरील कांहींतरी मोहकता व जादूगिरी अनुभवास आली. मी लंकेतून बाहेर पाऊल टाकलें तें विचारमग्न स्थितींत व पुन्हां तेथें जाण्याची आशा करीत.

आपला लंकेतील एक महिन्याचा विश्रांतीचा काळ भराभर गेला. पुन्हां खाडी ओलांडून, आपण हिंदुस्थानच्या दक्षिण टोकाला येऊन दाखल झालों. आपण कन्याकुमारीला भेट दिल्याचं आठवतं का तुला? या ठिकाणीं एका कुमारिका देवतेचं वास्तव्य असून ती तेथें पहारा करीत असते असा समज आहे. पाश्चात्य लोकांना आपल्या नांवांना नागमोडी वळणं देण्याची व ती भ्रष्ट करण्याची जी संवय आहे, तीस अनुसरून कन्याकुमारीला त्यांनीं केपकामोरीन करून टाकलं! त्यावेळीं आपण अक्षरशः हिंदमातेच्या चरणाशीं बसलों होतों. आपला अरबी समुद्र बंगालच्या उपसागराला भेटत असल्याचं दृश्यही दिसलं. ते दोघेजण हिंद मातेला आदरानं वंदन करीत आहेत, अशीही आपण कल्पना केली होती. तिथं अपूर्व शांतता होती व क्षणांत माझं मन हिंदुस्थानच्या दुसऱ्या टोकांकडं गेलं. त्या ठिकाणीं हिमालय, हिमाचा मुगुट धारण करून उभा असून, तेथेंही शांतता नांदते; पण या दोहोंच्यामध्यें मात्र कलह, दुःख व दारिद्य यांचं साम्राज्य पसरलेलं आहे.

आपण कन्याकुमारीचा निरोप घेऊन उत्तरेकडे चाललो. त्रावणकोर व कोचीन मधून आपण मलबारच्या धरणाजवळ आलों. किती सुंदर होतं तें; व आपली नौका, दोन लांकडी तीरामधून, चांदण्यारात्रीं प्रशांत जलांवर कशी विहार करीत होती! जणूं काय स्वप्नांतील प्रवासच तो. त्यानंतर आपण म्हैसूर, हैद्राबाद, मुंबईवरून शेवटीं अलाहाबादला आलों. नऊ महिन्यापूर्वींची, गेल्या जून महिन्यांतील गोष्ट ही.

पण या काळांतील हिंदुस्थानांतील सर्व मार्ग एकाच मुक्कामाकडे जातात; सर्व प्रवास—स्वप्नमय वा वास्तव—तुरुंगातच संपतात. आणि आज मी पुन्हां माझ्या ओळखीच्या भिंतीमागं येऊन दाखल झालो आहे. इथं विचार करावयाला नि तुला पत्रं लिहायला खूप वेळ आहे, मी तुला पत्रं लिहीन; मग तीं तुला पोहोंचोत वा न पोहोचोत. पुन्हां लढा सुरूं झाला आहे व आपले लोक—स्त्री—पुरुष, मुलेंमुली स्वातंत्र्याकारितां व या देशाची दारिद्र्यशापांतून मुक्तता करण्याकारितां लढत आहेत. पण, स्वातंत्र्य म्हणजे दुष्प्राप्य अशी देवता, आपल्या भक्ताकडून ती आत्यंतीक त्यागाची अपेक्षा करते.

तुरुंगात येऊन, मला आज तीन महिने झाले आहेत. तीन महिन्यापूर्वीं याच दिवशीं २६ डिसेंबर रोजीं मला सहाव्यांदा अटक झाली. आपली ही पत्रमाला सुरूं करायला मी बराच काल घेतला; पण वर्तमानकालानं मन व्यापल्यावर गत कालाचा विचार करणं कधीं कधीं अवघड असतं हें तुला माहितच आहे. तुरुंगांत माझं बस्तान बसायला व बाहेरील गोष्टींचा मनस्ताप विसरायला थोडा अवधी लागतो. यापुढें

मी तुला नियमितपणें लिहिण्याचा प्रयत्न करीन. पण मी सध्यां निराळ्या तुरुंगांत येऊन पडलो असून, या स्थलांतराला मी सरावलेला नसल्यामुळं माझ्या कार्यांत बराच व्यत्यय येतो. माझं क्षितीज पूर्वींपेक्षांही उंच आहे. माझ्या समोरील भिंत निदान उंचीच्या बाबतींत तरी चीनच्या प्रसिद्ध भिंतीशीं स्पर्धा करूं शकेल. जवळ जवळ २५ फूट उंच अशी ही भिंत ओलांडून सहस्त्ररश्मीला, आम्हाला दर्शन द्यायला दीड तास अधीक लागतो.

आमचें क्षितीज आज मर्यादित आहे. पण या स्थितींतहि, अफाट निळसर दर्या, पर्वत, वाळवंट यांच्या स्मृतीमुळं बरं वाटतं आणि तूं, तुझी आई व मी मिळून केलेला स्वप्नमय प्रवास—तो आतां क्वचितच खरा वाटतो.

२३

# जीवनचरितार्थ माणसाचा लढा

ता. २८ मार्च १९३२

जागतिक इतिहासाचे धागे जुळवून, गतकाळाकडे थोडीशी नजर टाकूं. इतिहास ह्मणजे गुंतागुंतीचं जाळं; उकलण कठीण, इतकंच नव्हे तर सर्वांच्या नजरेंत भरणंही कठीण. आपण त्यांतील एखाद्या ठराविक भागांत गुरफटून जाऊन, त्याला वाजवीपेक्षां अधीक महत्व देण्याचा संभव फार. जवळ जवळ, आपणां सर्वांनाच असं वाटतं कीं, आपल्या देशाचा इतिहास—मग तो कसाही असेना—बाकीच्या देशांच्या इतिहासापेक्षां अधिक तेजस्वी व विशेष अभ्यासनीय असतो. याबद्दल मी तुला पूर्वी एकदां इषारा दिला होता व आज पुन्हां तोच इषारा देत आहे. या भ्रमांत सापडणं सोपं आहे, आणि तसं होऊं नये ह्मणून हीं पत्रं लिहायला सुरुवात केली. पण मी स्वतः तीच चूक करीत आहे कीं काय असं मला वाटतं. मी तरी काय करणार ? माझं शिक्षणच मुळीं वैगुण्यपूर्ण होतं व मला शिकविलेला इतिहास विकृत स्वरूपाचा होता. पुढें, तुरुंगांतील एकांतवासांत, अभ्यास करून मी ही उणीव भरून काढण्याचा प्रयत्न केला व त्यांत मला थोडंफार यशही आलं. तरी पण, माझ्या मनरूपी चित्रसंग्रहांत बालपणीं व तारुण्यांत मी ज्या व्यक्तींचीं व देखाव्यांचीं चित्रं टांगलीं, तीं मी तेथून हलवूं शकत नाहीं. आधींच माझं इतिहासाविषयींचं ज्ञान मर्यादित व अपुरं, त्यांतच इतिहासासंबंधींच्या माझ्या दृष्टीकोनांवर पटल आलेलं. यामुळें माझ्या लेखनांत दोष आढळून येतील; पुष्कळ क्षुल्लक प्रसंगांचा

मी उल्लेख करीन तर अनेक महत्त्वाच्या प्रसंगांना फाटा देईन. या पत्रांना इतिहास विषयक पुस्तकांचं स्थान मिळावं, हा माझा उद्देश नाहीं. हजारों मैलांचें अंतर व अनेक चिरेबंदी भिंतीं यानीं आपली ताटातूट केली नसती तर, ज्या गुजगोष्टी आपण केल्या असत्या, त्याचं निदर्शक म्हणजे हीं पत्रं. निदान मी तरी तसं मानून समाधान करून घेतो.

इतिहासातील पानेच्या पानें व्यापून टाकणारीं विख्यात माणसं त्यांच्या विषयीं लिहिल्याशिवाय गत्यंतर नाहीं. हीं माणसं आपल्या परीनं चित्तवेधक असतात. ज्या कालात, तीं होऊन गेलीं, तो काल समजावून घेण्यासही मदत होते. पण इतिहास म्हणजे मोठीं माणसं, राजेमहाराजे यांच्या हालचालींची जंत्री नव्हे. तसं असतं तर इतिहासाचा खेळ, राजेमहाराजे जगाच्या रंगभूमीवरून सध्यां जवळजवळ नामशेष झाल्यामळं, आतांपर्यंत खलास झाला असता. अर्थात्, जे स्त्री–पुरुष खरोखरच थोर आहेत, त्यांना मोठेपणा दाखविण्यासाठीं सिंहासन, राजमुकुट, रत्न व पदव्या लागत नाहींत. राजे अगर संस्थानिक यांच्याजवळ राज्याशिवाय दुसर कोणतच भांडवल नसल्यामुळं, आपलें खरं स्वरूप लपविण्यासाठीं त्यांना पोषाख व जामानिमा चढवाना लागतो. आणि दुर्दैवानं, आपण बरेच जण या बाह्य भपक्याला भुलतो व एक चूक करतो. ती म्हणजे, जो नुसताच राजा आहे, अशा मुकुटधारी माणसाला पुरुषोत्तम समजण्याची.

खरा इतिहास म्हणजे कांहीं इकडच्या तिकडच्या थोड्या फार व्यक्तींची माहिती नसून, ज्या लोकांमुळं राष्ट्र बनलं जातं, ज्यांच्या श्रमा-मुळं जीवनांतील गरजेच्या व चैनीच्या वस्तू निर्माण होतात व हजारों

निरनिराळ्या मार्गांनीं, ज्यांची एकमेकांवर क्रिया प्रतिक्रिया होते. अशांची माहिती. माणसाचा असलाच इतिहास मनोरंजक होईल. युगानुयुगें, माणूस निसर्ग व मूळतत्वें, श्वापदें व अरण्यें या विरुद्ध कसा झगडला व शेवटीं सर्वांत कडतर म्हणजे आपल्याला पददलित ठेवणाऱ्या व आपल्याला लुबाडणाऱ्या स्वजातींतीलच कांहीं लोकांबरोबर लढण्याची त्याला कशी पाळी आली, याची माहिती म्हणजे इतिहास. इतिहास म्हणजे माणसाचा जीवनचरितार्थ चाललेला लढा; आणि जगण्याकरितां ज्या गोष्टी आवश्यक आहेत, अशा गोष्टींत अन्न, निवाऱ्याची जागा, कपडे, इत्यादींची जरुरी असल्यामुळं, त्यांचं या आवश्यक गोष्टींवर नियंत्रण आहे, तेच माणसांवर हुकमत गाजवीत आहेत. राजे लोक व मालकवर्ग यांच्या हातांत अधिकार आहे. याचं कारण, त्यांचा, जीवन चरितार्थ लागणाऱ्या गरजांवर ताबा आहे व याच ताब्याच्या जोरावर तें लोकांना उपाशी ठेवून, नमवूं शकतात. आपल्याला जें एक चमत्कारिक दृश्य दिसतं तें हें कीं, थोडे लोक, बहुजन समाजाला लुबाडत आहेत; कांहीं लोक काम न करतांही मिळवीत आहेत व असंख्य लोकांना काम करुनही अगदींच अल्प प्राप्ती होते.

एकटाच शिकार करणारा रानटी मनुष्य क्रमशः कुटुंब बनवितो. या कुटुंबांतील सर्वच माणसं, एकमेकांकरितां एकत्र काम करतात. पुष्कळ कुटुंबं सहकार्य करून खेडें वसवितात आणि निरनिराळ्या खेड्यांतील कामकरी, व्यापारी व कारागीर एकत्र येऊन, कारागिर श्रेणी (Guilds) काढतात. क्रमशः सामाजिक घटकांचा विकास होत असल्याचं दिसतं. प्रारंभी एक व्यक्ती—रानटी मनुष्य. समाज असा कसल्याही प्रकारचा

नसतो. यापुढील मोठा घटक ह्मणजे कुटुंब, त्यानंतर खेडं व त्याही पुढे खेड्यांचा समूह. हें सामाजिक एकीकरण कां ? जीवनाकरितां चाललेल्या झगड्यामुळं विकास व सहकार्य घडून आलं. शत्रुच्या बाबतींत, एकाकी संरक्षण वा चढाई, यापेक्षां, सहकार्यानं केलेलं संरक्षण वा चढाई अधिक प्रभावी ठरतं. कामाच्या बाबतींत तर सहकार्याची अधिक मदत होते. एकल्या दुकल्यानं काम करण्यापेक्षां, सहकार्यानं, अन्न व इतर जिनसांची निर्मिती करता येऊं लागली. कामाच्या बाबतींतील या सहकार्यामुळं आर्थिक एकीकरणाची किंवा, एकल्या दुकल्यानं शिकार करणाऱ्या रानटी माणसाची मोठ्या टोळ्यांत उत्क्रांती होत होती. खरं सांगावयाचं ह्मणजे या आर्थिक एकीकरणाच्या अभिवृद्धीमुळें माणसानं जिवनचरितार्थाच्या लढ्याला चालना दिली, व त्याचा परिणाम ह्मणजे समाज व सामाजिक एकीकरणाचा विकास. इतिहासाच्या दीर्घ कालावधींत, अनंत झगडे व हालअपेष्टांच्या दीर्घ कालावधींत, व हालअपेष्टांच्या भोवऱ्यांत व कधीं कधीं पिछेहाट होऊनही हा विकास झाला आहे. पण यावरून असं समजूं नकोस कीं, जगाची खूपच प्रगती झाली अगर जग पूर्वींपेक्षां फार सुखी आहे, कदाचित पूर्वींपेक्षां तें सुधारलेलं असेल; पण निर्दोषतापासून ते फार दूर आहे व जिकडे तिकडे भरपूर हाल अपेष्टा पहावयास मिळतात.

आर्थिक व सामाजिक घटकांच्या वाढीबरोबर जीवनही गुंतागुंतीचं होऊं लागलं. व्यापार वाढला, देणगीची जागा अदलाबदलीनं घेतली, नंतर पैसा. सर्व व्यवहारांत मोठंच स्थित्यंतर घडून आलं. सोन्याचांदीच्या नाण्यांमुळं चलन सुलभ होऊन व्यपारांत प्रगती होऊं लागली. पुढं, नाण्यांचाही सर्रास उपयोग न करतां लोक प्रतीकें वापरूं लागले. कागदाचं

एक चिठोरें त्यावरील "देण्याच्या वचनामुळें" पुरेसें वाटूं लागलें; बँकनोटा व हुंड्या प्रचारांत आल्या. पतीवर व्यवहार सुरू झाला. पतीमुळें आणखी व्यापार धंदे वाढण्यास मदत झाली. तुला माहितच आहे कीं, हल्ली हुंड्या व नोटांचा फार प्रसार झाला आहे. समंजस लोक बरोबर कांहीं सोन्याचांदीच्या पिशव्या घेऊन जात नाहींत.

अशा रीतीनं, अस्पष्ट गतकाळापासून इतिहासाची प्रगती होत गेली. लोक अधिकाधिक निर्मिती करूं लागले निरनिराळया धंद्यांमधील निष्णात लोक तयार झाले, देवाण घेवाण सुरू झाली व पर्यायानें व्यापार वाढला. या शिवाय विषेशतः गेल्या शंभर वर्षांत वाफेचं इंजीन आल्यामुळं नवीन नवीन व सुधारलेलीं दळणवळणाचीं साधनें कशीं अस्तित्वांत आलीं हेंही आपणास दिसून येतं. उत्पादन वाढल्यावर संपत्ति वाढली व निदान कांहीं लोकांना तरी अधिक फुरसत मिळूं लागली. आणि अशा रीतीनं आपण जिला सुधारणा म्हणतो तिचा विकास झाला.

हें सर्व होत आहे, आणि लोक, ज्ञानपूर्ण व प्रगतिपर युग, अधुनिक सुधारणा, आपली महान संस्कृति व शास्त्रीय विज्ञानाच्या चमत्कारांचं बढाई मारीत आहेत. आणि अशा स्थितींत गरीब हे गरीब व दुःखीच राहिले आहेत! मोठी राष्ट्रं एकमेकांशीं लढून लाखों लोकांची हत्याकरीत आहेत आणि आपल्या देशासारख्या मोठ्या देशांवर परकीयांचं राज्य आहे जर आम्हाला आमच्या घरांतही स्वातंत्र्य नाहीं तर सुधारणेचा उपयोग काय? पण आपण आतां उठून हातपाय हालवीत आहोंत ही गोष्ट निराळी.

आजच्या चैतन्यमय काळांत आपण वावरत आहोत; किती भाग्याची गोष्ट आहे ही! आपल्यापैकीं प्रत्येकाला एक मोठ्या साहसांत भाग घेण्याची संधी आली आहे व हिंदुस्थानच नव्हे तर सारं जग क्रांती अवस्थेंतून जात असल्याचं आपण पहात आहो. तूं मोठी भाग्यवान मुलगी आहेस. (ज्या क्रांतीनं रशियात नवीन युगाची नौबत झडली, ती क्रांती चालू असताना तूं जन्मलीस नि आज तूं खुद्द आपल्याच देशांतील क्रांती अवलोकीत आहेत व लवकरच तूं त्यांत भागही घेशील. जगभर अस्वस्थता व उलथापालथ दिसते. अगदीं पूर्वेकडे, जपान चीनच्या कंठाशी आला आहे; आणि पश्चिमेकडील नव्हे सर्व जगातील जुनी पद्धत ढासळूं पहात आहे. निरनिराळीं राष्ट्रं शस्त्रसंन्यासाची भाषा बोलत आहेत, पण त्याचवेळीं एकमेकांकडे संशयी दृष्टीनं पाहून, शस्त्रसंभार आटोकाट वाढवीत आहेत. भांडवलशाहीनं जगावर बरींच वर्षं प्रभुत्व गाजविलं, आता तिनं सायंप्रकाशांत प्रवेश केला आहे. जेव्हां ती अस्ताला जाईल,—नि तिला गेलंच पाहिजे—त्यावेळीं, ती आपल्यावरोबर अनेक अनिष्ट गोष्टी घेऊन जाईल।



२४

# सिंहावलोकन

२९ मार्च १९३२

युगांयुगांतील आपल्या प्रवासांत आपण किती मजल मारली? इजिप्त, हिंदुस्थान, चीन व नोसोस येथील प्राचीन कारकिर्दीबद्दल आपण या पूर्वींच थोडीफार चर्चा केली आहे. जिनं पिरॅमिड्स निर्माण केलीं, ती इजिप्तची प्राचीन व अजब संस्कृती आपण पाहिली. क्रमाक्रमानं तिचा ऱ्हास होत जाऊन तींतील ओज नाहींसं झालं व त्या ठिकाणीं फक्त पांकळ छाया राहिली. आकृत्या व चिन्हें यांचे हें दृश्य—पण त्यांत वास्तविक जिवंतपणा थोडाच होता. तसंच नोसोसचा, ग्रीसच्या मुख्य प्रदेशांतील त्याच्याच बांधवांनीं कसा नाश केला, हेंही आपण पाहिलं. हिंदुस्थान व चीनमध्यें आपण अस्पष्ट अशा दूरच्या काळापर्यंत नजर टाकली; साधनाभावीं फारशी माहिती मिळाली नसली तरी त्यांच्या तात्कालीन संपन्न संस्कृतीची आपल्याला कल्पना आली; आश्चर्य हें कीं, सांस्कृतीक दृष्ट्या हे दोन्ही देश, आपल्या प्राचीन कालाशीं अखंड दुव्यानं जोडले गेले आहेत. मेसापोटेमियांत, साम्राज्यामागून साम्राज्यं चमकलीं व ज्या मार्गानं सर्व साम्राज्यं गेलीं, तोच मार्ग त्यांनीं सुधारला.

याशिवाय, खिस्तापूर्वी ५०० ते ६०० वर्षांच्या काळांत, निरनिराळ्या देशांत, जे महान तत्वज्ञानी होऊन गेले, त्यांच्याबद्दलही आपण विचार केला. हिंदुस्थानांत बुद्ध व महावीर, चीनमध्यें कॉन्फ्युशिअस व

ग्वो–त्सी, इराणमध्यें झोरोॲस्टर व ग्रीसमध्यें पायथॅगोरस. बुद्धानं भिक्षुकशाही, हिंदुस्थानांतील वैदिकधर्मांची प्रचलित स्वरूपें, यावर हल्ला चढविला. त्याला असं दिसून आलं कीं, जनतेवर सर्व प्रकारच्या अंधः-श्रद्धा व धर्मविधी लादून, त्यांची फसवणूक केली जात आहे. या शिवाय त्यानं जातीभेदावरही हल्ला चढवून समतेची शिकवण दिली.

या नंतर आपण पश्चिमेकडे वळलों. या ठिकाणीं युरोप व आशिया एकमेकांना संलग्न झाले आहेत. आपण, इराण व ग्रीसच्या इतिहासांतील चढउतार, इराणमध्यें, एक बलाढ्य साम्राज्य कसं उदयास आलं व "राजाधिराज" डारियसचं साम्राज्य हिंदुस्थानांत सिंधपर्यंत कसं पसरलं होतं, या साम्राज्यानं छोटा ग्रीस गिळंकृत करण्याचा कसा प्रयत्न केला; पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे या छोट्या राष्ट्रानं सामना देऊन, आपलं अस्तित्व कसं शाबूत राखलं हेंही पाहिलं. या नंतर, ग्रीकांच्या इतिहासांतील अल्प पण वैभवशाली असा जो काळ आला त्याविषयीं, मी तुला थोडं फार सांगितलंच आहे. यावेळीं ग्रीसमध्यें कित्येक बुद्धिमान थोर व्यक्ती होऊन गेल्या व त्यांनीं सुंदर वाङ्मय व अतुल रमणीय अशा कलाकृती निर्माण केल्या.

ग्रीसमधील सुवर्णयुग फार काळ टिकलं नाहीं. मॅसेडोनच्या अले-क्झांडरनं, आपल्या मोहिमांनीं ग्रीसची कीर्ती दूरदूरच्या गांवात पसरविली; पण त्याच्याच अगमनाबरोबर ग्रीसच्या संस्कृतीचा हळूं हळूं ऱ्हास झाला. अलेक्झांडरनं इराणी साम्राज्याचा नाश केला, इतकंच नव्हे तर, जेता य नात्यानं हिंदुस्थानची सरहद्दही ओलांडली. तो एक महान सेनापती होता

हें वादातीत असलं तरी त्याच्या भोंवती आख्यायिका व कल्पित कथांचं एक जाळं विणलं गेलं आहे. सॉक्रेटीस, प्लेटो, फिडियास, सोफेक्लस किंवा ग्रीसमधील इतर थोर व्यक्तींचीं नांवं, फक्त बहुश्रुत लोकांना माहीत असतील, पण अलेक्झांडरचं नांव कोणी ऐकलं नाहीं ?

तुलनात्मक दृष्ट्या, अलेक्झांडरनं फारच थोडं कार्य केलं आहे. इराणी साम्राज्य त्यावेळीं जुनं व जीर्ण झालं असून यापुढं तें फार काळ टिकण्याचा संभव कमीच होता. हिंदुस्थानांतील अलेक्झांडरच्या आगमनाला, फक्त एक स्वारी या पलिकडं मुळींच महत्व नव्हतं. कदाचित् अलेक्झांडर आणखी जगला असतां तर, त्यानें कांहीं भरीव कार्य केलं असतं. तो तरुण वयांत मरण पावला व साम्राज्याचे तुकडे झाले. त्याचं साम्राज्य टिकलं नाहीं, तरी त्याचं नांव चिरंजीव झालं आहे.

अलेक्झांडरच्या पूर्वेकडील आक्रमणाचा एक मोठा परिणाम म्हणजे, पूर्व व पश्चिम यांच्यामध्यें प्रस्थापित झालेले नवीन संबंध. बरेचसे ग्रीक लोक पूर्वेकडे जाऊन, जुन्या शहरांतून स्थायिक झाले किंवा त्यांनीं स्वतःच वसाहती स्थापन केल्या. अलेक्झांडरच्या पूर्वीं, पूर्व व पश्चिम यांच्यामध्यें जो व्यापार व संघर्ष होता त्यांत, त्याच्या पश्चात खूप वाढ झाली.

अलेक्झांडरच्या स्वारीचा आणखी एक परिणाम—त्यांत सत्यता असेल तर—ग्रीकांच्या दृष्टीनं फार वाईट झाला. असं म्हणतात कीं, त्याचे सैनीक मेसापोटेमियाच्या दलदलीच्या प्रदेशांतून, मलेरियाचे डांस घेऊन गेले व अशा रितीनं मलेरियाचा प्रसार होऊन, ग्रीक लोक

कमजोर, निःसत्त्व बनले. ग्रीकांच्या न्हासाचं हें एक कारण सांगितलं जातं. अर्थात् या कारणांत सत्य किती आहे हें फारसं सांगता येत नाहीं.

अलेक्झांडरचं अल्पायुषी साम्राज्य संपुष्टांत आलं व त्याच्या जागीं अनेक छोटीं छोटीं साम्राज्यं उद्भवलीं यामध्ये टोलेमीच्या अधिपत्याखा-लील इजिप्त व सेल्यूक्सच्या अंमलाखालील पश्चिम आशिया हीं प्रमूख होत. सेल्यूक्सनं हिंदुस्थानवर आक्रमण करावयाचा प्रयत्न केला; पण त्याच्या दुर्दैवानं त्याला कळून आलं कीं, प्रत्युत्तरादाखल हिंदुस्थानही सनसणीत टोला देऊं शकतें. चंद्रगुप्त मौर्यानं उत्तर व मध्य हिंदुस्थानांत एक बलाढ्य राज्य स्थापन केलं होतं. चंद्रगुप्त त्याचा प्रसिद्ध ब्राम्हण मंत्री चाणक्य व चाणक्यानं लिहिलेलं अर्थशास्त्र या विषयीं, मी तुला पूर्वींच सांगितलं आहे. सुदैवानं या ग्रंथांत २२०० वर्षांपूर्वींच्या हिंदुस्थानची बरीच उद्बोधक माहिती मिळते.

आपलं सिंहावलोकन पुरं झालं. पुढील पत्रांत आपण मौर्यसाम्राज्य व अशोकाची माहिती पुढें चालू करूं. खरं पाहिलं तर तसं मी तुला १४ महिन्यापूर्वीं, नैनी तुरुंगांतून ता. २५ जानेवारी १९३१ रोजीं आश्वासन दिलं होतं ते अद्याप पुरं करायचंच आहे!

२५

# अशोकः "देवांचा लाडका"

ता. ३० मार्च १९३२

राजे लोक व संस्थानिक यांची हेटाळणी करण्याकडे माझी बरीचशी प्रवृत्ती आहे. मला त्यांच्यांत कौतुकास्पद किंवा आदरणीय असं अगदीं थोडं आढळून येतं. पण आतां आपण अशा माणसाकडे आलों होतं कीं, जो राजा व सम्राट असूनही थोर व आदरणीय होता. या पुरुषाचं नांव अशोक, चंद्रगुप्त मौर्याचा नातू. अशोक विषयीं एच्. जी. वेल्स, (याच्या कांहीं रम्य कादंबऱ्या तूं वाचल्या असशील) आपल्या 'आउट लाइन्स ऑफ हिस्टरी' या ग्रंथांत म्हणतो, "राजे, महाराजे, अधिराजे प्रभृति, इतिहासाच्या पानांपानांतून गर्दी करून राहिलेल्या राज्यकर्त्यांच्या मालिकेत, एक नांव–फक्त एकच नांव–ताऱ्याप्रमाणं चमकतं व तें नांव म्हणजे अशोकाचं. होल्गापासून जपानपर्यंत, अद्यापही त्याच्याविषयीं पूज्य भावना आहे. चीन, तिबेट व हिंदुस्थान यांना जरी त्याच्या तत्वाचा विसर पडला असला तरी, त्यांनीं त्याची थोर परंपरा जतन करून ठेविली आहे. आज, कॉन्स्टन्टाईन व शार्लमेन यांचीं नांवं माहीत असणाऱ्या लोकांपेक्षां, अशोकची स्मृति बाळगणाऱ्या लोकांची संख्या अधिक आहे."

हा मोठाच गौरव; पण तो योग्यच आहे. हिंदी माणसाला तर, हिंदुस्थानच्या इतिहासातील या कारकिर्दीची आठवण विशेष आनंदायक वाटते.

इसवी सनापूर्वी ३०० वर्षांच्या सुमारास चंद्रगुप्त मरण पावला. त्याच्या मागून त्याचा मुलगा बिंदुसार गादीवर आला व त्यानं २५ वर्षे शांततेनं राज्य केलं. त्यानं ग्रीकांशी असलेला संबंध चालू ठेवला. त्याच्या दरबारी, इजिप्तचा टॉलेमी व पश्चिम आशियाचा अधिपती–सेल्यूकसचा पुत्र ॲन्टी ओकस, याचे वकील येत. बाह्यदेशाशीं व्यापारही चालूं होता. असं म्हणतात कीं, इजिप्शीयन लोक, आपले कपडे हिंदुस्थानांतील निळीनें रंगवीत; तसंच मसाले भरून ठेविलेल्या प्रेताभोंवती ( Mummies ) ते हिंदी मलमल गुंडाळीत. बिहारमध्यें सापडलेल्या अवशेषावरून, मौर्यकाळापूर्वीही येथें एक प्रकारची कांच तयार होत असल्याचें आढळून येतं.

मेगॅस्थिनीज, या चंद्रगुप्ताच्या दरबारातील ग्रीक वकिलानं लिहून ठेविलेली पुढील माहिती तुला उद्बोधक वाटेल. हिंदी लोकांना कलाकौशल्याची व सौंदर्याची आवड असून विशेषतः आपली उंची अधिक दिसावी, म्हणून हिंदी लोक बूट वापरत असल्याचं त्यानं नमूद केलं आहे. यावरून बूट हा सर्वस्वी अर्वाचीन शोध नसल्याचं तुला कळून येईल.

बिंदुसार नंतर सन २६८ मध्यें अशोक या मोठ्या साम्राज्याचा मालक बनला. यावेळीं मौर्य साम्राज्य सर्व उत्तर हिंदुस्थान व थेट मध्य आशियापर्यंत पसरलेलं होतं. आपल्या कारकिर्दीच्या नवव्या वर्षी, दक्षिणेकडील उरलेला भागही आपल्या साम्राज्याखालीं आणावा या हेतूनं, अशोकनं कलिंगवर स्वारी केली असं दिसतं. कलिंग, हिंदुस्थानच्या पूर्व-किनाऱ्यावर महानदी, गोदावरी व कृष्णा यांच्यामध्यें होता. कलिंगचे लोक

मोठ्या शौर्यानं लढले. पण भयंकर कत्तल होऊन, त्यांना शरण जावं लागलं. हें युद्ध व कत्तल यामुळें अशोकवर खोल परिणाम होऊन, युध्दें वगैरे विषयीं, त्याचं मन विटून गेलं. या पुढें युद्धें करावयाचीं नाहींत, असं त्यानं ठरविलं. यावेळीं, दक्षिणेकडील एक चिमुकला पट्टा सोडला तर, सर्व हिंदुस्थान त्याच्या अंमलाखालीं होता. हा पट्टाही आपल्या अंमलाखालीं आणणं त्याला सहज शक्य होतं, पण त्यानं हा मोह टाळला. एकंदर माहितीवरून, विजयानंतर युद्धाचा त्याग करणारा अशोक हा एकटाच लष्करी पेशाचा राजा होता, असं एच्. जी. वेल्सचं मत आहे.

सुदैवानं, अशोकला काय वाटत असे व त्यानं काय केलं, याबद्दल त्याच्याच शब्दांतील माहिती उपलब्ध आहे. शिला व धातूंवर कोरलेलीं विविध आज्ञापत्रें म्हणजे अशोकचे आपल्या प्रजाजनांना व भावी पिढीला संदेशच होत. अलहाबादच्या किल्ल्यांत एक अशोकस्तंभ असल्याचं तुला माहितच आहे. आपल्या प्रांतांत असे आणखी बरेच स्तंभ आहेत.

या आज्ञापत्रांत, युद्धें व मोहिमा यांमधील कत्तलींमुळं, आपल्या अंगावर कसे शहारे आले व पश्चाताप झाला, हें अशोकानं सांगितलं आहे. तो म्हणतो, " स्वतःला जिंकणं व धर्मानं माणसाचीं अंतःकरणें काबीज करणं हाच खरा विजय होय. " मी त्याचीं कांहीं आज्ञापत्रेंच येथे उधृत करतो. तीं वाचनीय असून, त्यावरून तुला अशोकाची अधिक चांगली ओळख पटेल. एका आज्ञापत्रांत खालील मजकूर आहे.

" धर्मनिष्ठ व कृपाळू सम्राटांनीं, आठ वर्षे कलिंग देश जिंकण्याच्या कार्याला वाहून घेऊन, तो काबीज केला. या मोहिमेंत दीड लाख

लोक कैद करण्यांत आले, लाख लोख जखमी झाले व त्याच्या किती तरी पट ठार झाले."

"कलिंग देश साम्राज्याला जोडल्यानंतर सम्राटांनीं, दयाधर्म, धर्मप्रेम व धर्मप्रसार याना मनापासून आश्रय देण्यास प्रारंभ केला. सम्राटांच्या मनांत उपरति झाली. पूर्वीपासून अजित अशा देशावर मोहीम करणं म्हणजे, कत्तली, मृत्यू व लोक कैद करून नेणं. पूज्य सम्राटांना ही गोष्ट अत्यंत दुःखदायक व खेदकारक वाटते."

पुढें, या आज्ञापत्रात, "अशोकाला, या कामास आलेल्या अगर कैद केलेल्या लोकांचा एक शतांश नव्हे एक सहस्रांश लोक, मारले गेल्याचे खपणार नाहीं," असं म्हटलं आहे.

"सम्राट, आपला कोणी अपराध केला तर शक्य तोंवर ते तो सहन करतील. आपल्या राज्यांत, जे अरण्यवासिय लोक आहेत, त्यांच्या विषयींहि सम्राटांची वृत्ती कनवाळूपणाची असून, त्यांना योग्य रितीनं विचार करण्याची संवय लागावी, अशी त्यांची खटपट आहे. त्यांत यश आलं नाहीं, तर सम्राटांना वाईट वाटेल. सर्व प्राणिमात्रांना, सुरक्षितता, स्वातंत्र्य, मानसिक समाधान व संतोष लाभावा, अशी सम्राटाची इच्छा आहे."

अशोकानं पुढं असं स्पष्टीकरण केलं आहे कीं, "माणसांचीं अंतःकरणं कर्तव्यकर्म वा धर्मानं जिकणं हाच खरा विजय." त्यानं असे विजय आपल्या हद्दींतच नव्हें तर, दूरच्या राज्यांतही संपादन केले होते, असं म्हटलं आहे.

या आज्ञापत्रांत, ज्या कायद्याचा वारंवार उल्लेख आला आहे तो कायदा म्हणजे बुद्धाचा कायदा होय. अशोक पुढें कट्टा बौधधर्मीय झाला व बौद्धधर्माचा प्रसार करण्याचा त्यानं जारीनं प्रयत्न केला; पण धर्माबाबत कोणावर जबदस्ती किंवा सक्ती नव्हती. धर्मांतराच्या बाबतींतहि लोकांची हृदयें काबीज करणं, हीच कसोटी त्यानं ठेविली होती. धर्मनिष्ठ लोकांत अशोकासारखे सहिष्णू लोक थोडेच; अगदींच क्वचित् आढळतात. लोकांना आपल्या धर्मांत ओढण्यासाठीं, दहशत व लबाडी यांचा फारसा विधिनिषेध बाळगला जात नाहीं. धर्म व परमेश्वर यांच्या नांवावर झालेल्या धार्मिक छळवादानं नि धर्मयुध्दानीं इतिहास भरलेला असून त्यासाठीं इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षा अधिक रक्त सांडलं गेलं असेल; याच करितां, हिंदुस्थानच्या एका महान—अतीशय धर्मप्रवण पुत्रानं व एका बलाढ्य साम्राज्याच्या अधिपतीनं, आपल्या विचारसरणीकडे लोकाना आकृष्ट करण्यासाठीं काय केलं हे चांगलं लक्षात घेणं जरूर आहे. धर्म व श्रद्धा ही तरवारीच्या किंवा संगिनीच्या जोरावर एकाद्याच्या गळीं उतरवता येतील, अशी काहींची मूर्खपणाची समजूत असावी, हें खरोखर चमत्कारीक होय.

अशोकानं ( आज्ञापत्रांत त्याला " देवांचा लाडका " म्हटलं आहे. ) पश्चिम आशिया, युरोप व आफ्रिकेंतील निरनिराळ्या राष्ट्रांत आपले दूत व वकील पाठविले. तुला आठवत असेल कीं, सिलोनला यानं खुद्द आपला भाऊ महेंद्र व बहीण संघमित्रा, या दोघांना रवाना केलें. असं म्हणतात कीं, त्यांनीं सिलोनला जातांना गया येथील पवित्र पिंपळ वृक्षाची फांदी नेली होती. अनुराधापूराच्या देवालयांतील पिंपळाचं

झाड तुला आठवतं कां ? प्राचीन काळांतील त्या फांदीपासून हें झाड वाढलं असल्याचं आपल्याला सांगण्यांत आलं होतं.

हिंदुस्थानांत बौध्दधर्माचा झपाट्यानं प्रसार झाला. अशोक केवळ अर्थहीन प्रार्थना अगर पूजासमारंभ यांना धर्म समजत नसे. त्याच्या धर्माच्या व्याख्येंत चांगली कृत्यें व समाजोन्नती यांचा अंतर्भाव होई व म्हणूनच, त्याच्या कारकिर्दींत सर्व देशभर सार्वजनिक उद्यानें, दवाखाने, विहिरी व रस्ते यांची वाढ झाली; स्त्रियांच्या शिक्षणाकरितां खास सोय होती. अगदीं उत्तरेकडे पेशावर जवळ तक्षशीला किंवा तक्षिला, मथुरा ( इंग्लिशानीं या शहराला मुत्रा असं ग्राम्यस्वरूप दिलं आहे. ) मध्य हिंदुस्थानांतील उज्जयनी व बिहारमध्यें पाटणाजवळ नालंद अशीं चार मोठीं विश्वविद्यालयीन केंद्रें असून, या ठिकाणीं, हिंदुस्थानांतलिच नव्हे तर चीन, पश्चिम आशिया वगैरे दूरदूरच्या देशांतील विद्यार्थी येत. अभ्यासाकरितां आलेले हेच विद्यार्थी, बुध्दाची शिकवणूक घेऊन, परत जात. याच काळांत, ठिकठिकाणीं मठ स्थापन झाले; या मठांना विहार म्हणत. पाटलीपुत्र किंवा पाटणाच्या आसपास तर इतके विहार होते कीं, सबंध प्रांताला विहार असं नांव पडून त्याचाच बिहार असा अपभ्रंश झाला. पुढें, नेहमी प्रमाणेंच, या विहारांतील ज्ञानरुपी स्फूर्तिजन्य गंगा नाहींशीं होऊन त्यांना विवक्षित नित्य नैमित्तिकाच्या व पुजा अर्चेच्या चव्हाट्याचं स्वरुप आलं.

अशोकाची जीव संरक्षणाची व्याप्ती सर्व प्राण्यांना लागूं होती. विषेशतः जनावरांकरितां म्हणून, दवाखानें काढण्यांत येऊन, पशु यज्ञाला

बंदी करण्यांत आली होती. खुद्द, आपल्या सध्यांच्या काळापेक्षां, तो वरील बाबतींत कांहींसा पुढें होता. दुर्दैवानं, सध्यांही आपल्या देशांत पशुयज्ञ अस्तित्वांत असून, तो एक धर्माचा मूळभूत भाग समजला जातो. जनावरांच्या जोपासनेबद्दल फार थोडी तदतुद करण्यांत आली आहे.

अशोकाचा आदर्श व त्याच प्रमाणें बौद्ध धर्माचा प्रसार यामुळं शाकाहार लोकप्रिय झाला. या वेळ पावेतों, हिंदुस्थानांतील ब्राह्मण व क्षत्रीय हे सामान्यतः मांसाहार करीत व मद्यादि मादक पेयें प्राशन करीत. या पुढें मात्र मांसाहार व मद्यप्राशन बरचेंसें कमी झालें.

अशोकानं आडतीस वर्षें राज्य केलं. आपल्या कारकिर्दीत, त्यानं शांततेच्या मार्गानं हित साधण्याकरितां अतिशय परिश्रम केलें. सार्वजनिक कार्यांकडे लक्ष देण्यास तो सदैव तयार असें. (" कोणत्याहि प्रसंगीं अगर कोणत्याहि ठिकाणीं, मी भोजन करीत असो किंवा अंतःपुरांत असो, शयनगृहांत असो कीं, एकांतांत असो, वाहनांत असो कीं, राजोद्यानांत असो, अधिकृत वार्ताहरांनीं आपल्याला सार्वजनिक कार्यांची सदैव माहिती दिली पाहिजे, " ) अशी त्याची आज्ञा होती. एकादां निकट प्रसंग उद्‌भवला, तर त्याची अशोकला तावडतोब वर्दी देण्यांत येत असे. अशोक म्हणतो " कोणत्याही घटकेला अगर कोठेंही, लोककल्याण साधणं माझं कर्तव्य आहे. "

अशोक इसवीसनापूर्वी २२६ मध्यें मरण पावला. मरण्यापूर्वी कांहीं दिवस, त्यानं बौद्ध भिक्षूची दीक्षा घेतली होती.

आपल्याला मौर्य कालीन फारच थोडे अवषेश, मिळतात. पण जे कांहीं मिळतात ते मोहेंजोदारो सोडल्यास हिंदुस्थानांतील आर्यसंस्कृतीचे अगदीं आरंभीचे अवषेश असं समजावयास हरकत नाहीं. बनारस जवळ सारनाथ येथें कळसांवर सिंह असलेला सुंदर अशोकस्तंभ, तुला आढळून येईल.

अशोकाची राजधानीं जें महान पाटलीपुत्रशहर तें मात्र नामषेश झालं, १५०० वर्षांपूर्वीं किंवा अशोकानंतर सहाशें वर्षांनीं फाऱ्हीएन नांवाच्या एका चिनी प्रवाशानं, पाटलीपुत्राला भेट दिली. यावेळींहि पाटलीपुत्र संपन्न व भरभराटींत असलं तरी, अशोकाचा राजवाडा पडीत स्थितींत होता. पण हा पडका राजवाडा पाहूनही, फाऱ्हीएनच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, " ही कृती मानवी असल्याचं दिसून येत नाहीं. " असं त्यानं आपल्या प्रवास वर्णनांत लिहून ठेविलं.

अशोकाचा दगडी राजवाडा नामषेश झाला, त्याचा मागमूसही आढळून येत नाहीं. पण अशोकाची स्मृती सर्व आशियाखंडभर जागृत असून. त्याची आज्ञापत्रें आपल्याशीं अशा भाषेंत, गुजगोष्टी करतांत कीं, ती आपल्याला कळते व कौतुकास्पद वाटते. त्यापासून आपल्याला पुष्कळसं शिकतायेण्यासारखं आहे. हें पत्र लांबलं असून, तें तुला कंटाळवाणं वाटेल. तरीही तें संपवितांना मी, अशोकांच्या आज्ञापत्रांतील एक छोटासा उतारा देतो.

" सर्व धर्म निरनिराळ्या कारणांकरितां आदरणीय आहेत. असा आदर दर्शविल्यामुळेंच मनुष्य आपल्या विवक्षित धर्माला मान्यता मिळवून देतो व त्याबरोबरच इतर लोकांच्या धर्मांची सेवा करतो. "

---

२६

# अशोक कालीन जग

ता. ३१ मार्च १९३२

अशोकानं, दूरदूरच्या देशांत शिष्टमंडळें व वकील पाठविल्याचं, तसंच हिंदुस्थान व त्या देशांमध्यें अव्याहत संघर्ष व व्यापार चालू असल्याचं, आपण पाहिलं. पण लक्षांत ठेव कीं, तात्कालीन संघर्ष व व्यापार, याचं सद्यःकालीन तत्सम गोष्टीशीं कांहींच साम्य नव्हतं. आतां व्यापाराकरितां, लोकांना रेल्वे, आगबोटी व विमानांतून प्रवास करणं बरचसं सुलभ झालं आहे. पण त्या कालांत प्रवास करणं धोक्याचं व जिकीरीचं असल्यामुळें फक्त साहसी व कणखर लोकच अशा प्रवासाला सिध्द होत. यामुळं त्या वेळचा व आतांचा व्यापार यांत, तुलनाच होऊं शकत नाहीं.

अशोकानं "दूरचे देश" म्हणून ज्यांचा उल्लेख केला, ते देश कोणते ? त्याच्या वेळचं जग कसं होतं ? इजिप्त व भूमध्यसमुद्र किनारा सोडला तर, सारा अफ्रिकाखंड अज्ञात होता. तात्कालीन उत्तर, मध्य व पूर्व युरोप त्याचप्रमाणें उत्तर व मध्य आशियाचीही आपल्याला थोडी फार माहिती आहे. अमेरिकेची कांहींच माहिती नाहीं. मात्र पुष्कळांना असं वाटतं कीं, अमेरिकाखंडांत आरंभीच्या काळापासून, अतिशय प्रगतिपर सुधारणा अस्तित्वांत असाव्यांत. कोलंबसानं पुढं बऱ्याच कालानं, इसवी सनाच्या पंधराव्या शतकांत—अमेरिकेचा "शोध लाविला" असं

म्हणतात. या वेळीं दक्षिण अमेरिकेंतील पेरु व आजूबाजूच्या देशांत उच्च दर्जाची संस्कृति अस्तित्वांत होती. यावरून, इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत हिंदुस्थानांत अशोक राज्य करीत असतां, अमेरिकेंत सुसंस्कृत लोक राहात असून, तेथें सुसंघटित अशी राज्य पध्दति असणं अगदीं शक्य आहे. अर्थात, त्याबद्दल पुरावा मिळत नाहीं व नुसते तर्कवितर्क लढविण्यांत फारसा अर्थ नाहीं. मी या गोष्टींचा मुद्दाम उल्लेख करीत आहे. आपला असा ग्रह होण्याचा संभव असतो कीं, ज्या देशाबद्दल आपण ऐकलं अगर वाचलं आहे, अशाच देशांत सुधारलेल्या लोकांचं वास्तव्य असतं. पुष्कळ काळपर्यंत युरोपियन लोकांची अशी समजूत होती कीं, प्राचीन इतिहास म्हणजे फक्त ग्रीस, रोम व ज्यू यांचा इतिहास असून, बाकीचं जग, त्याकाळीं, जंगली स्थितींत होतं. पुढें त्यांच्यांतीलच कांहीं पंडीतांनीं व पुराणवस्तू संशोधकांनीं, हिंदुस्थान, चीन वगैरे देशांबद्दल माहिती दिल्यावर, त्यांना आपलं ज्ञान किती मर्यादित आहे हें कळून आलं. आपण ही चूक न होऊं देण्याची खबरदारी घेतली पाहिजे. आपल्या मर्यादित ज्ञानाच्या पल्ल्यांत आपल्या जगांत, जें जें कांहीं घडलं आहे, तें सर्व येतं अशी समजूत करून घेतां कामा नये.

सध्यां पुरत मात्र आपल्याला असं म्हणतां येईल, अशोक कालीन सुधारलेल्या –अर्थात इसवीसनापूर्वी तिसऱ्या शतकांतील–जगांत युरोप अफ्रिकेंतील भूमध्यसमुद्र किनाऱ्यावरील देश, पश्चिम आशिया, चीन व हिंदुस्थान हेच प्रामुख्यानें मोडत. चीनशीं, यावेळीं, पाश्चिमात्य देश, इतकेंच काय पण पश्चिम आशियाचेंहि प्रत्यक्ष असं फारसं दळण वळण नसल्यानं पश्चिमेकडे, चीनविषयीं भरमसाट कल्पना प्रचलीत होत्या.

हिंदुस्थान हा त्यावेळीं चीन व पाश्चात्य देश यांना सांधणारा दुवा होता, असं दिसतं.

अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याचं साम्राज्य त्याच्या सेनापतींनीं आपापसांत कसं वाटून घेतलं हें आपण पाहिलंच आहे. यांतील तीन प्रमुख विभाग म्हणजे (१) सेल्यूकसच्या अंमलाखालील पश्चिम आशिया, इराण व मेसापोटेमिया, (२) टोलेमीच्या अंमलाखालील इजिप्त आणि (३) आन्टीगोनसच्या अंमलाखालील मॅसेडोनिया. पहिलीं दोन साम्राज्यें दीर्घ काल टिकलीं. सेल्यूकस हा हिंदुस्थानचा शेजारी असून हिंदुस्थानचा एकादा तुकडा आपल्या साम्राज्याला जोडण्याची त्याला हाव होती; पण चंद्रगुप्त हा त्याला फारच जबरदस्त प्रतिस्पर्धी भेटला. चंद्रगुप्तानं त्याला परत पिटाळून लाविलंच, पण सध्यां आफगाणिस्थान म्हणून ओळखला जाणारा गांधार प्रांत त्याला सोडायला लाविला.

मॅसेडोनिया तितकंसं सुदैवी नव्हतं. उत्तरेकडून त्यावर गॉल वगैरेंची टोळधाड आली. गॉल लोकांच्या या आक्रमणापुढें या राज्याचा एकच भाग टिकाव धरून स्वतंत्र राहूं शकला. हा भाग म्हणजे सध्यां जेथें तुर्कस्थान आहे तें आशियामायनार मधील पेर्गामम. हें लहानसं ग्रीक संस्थान, शंभर वर्षांपेक्षां अधिक कालपर्यंत, ग्रीक संस्कृति व कलांचं माहेरघर होतं येथें अनेक सुंदर इमारती, एक ग्रंथालय, व वस्तुसंग्रहालय होतं. अल्पशा प्रमाणांत तें समुद्रापलीकडील अलेक्झांड्रीयाचं प्रतिस्पर्धीच होतं.

अलेक्झांड्रीया ही इजिप्तमधील टोलेमी घराण्याची राजधानी. प्राचीन जगांतील विख्यात असं हें एक मोठं शहर होतं. अॅथेन्सचं वैभव

बरंच कमी झालं नि अलेक्झांड्रीयानं ग्रीकांचं सांस्कृतिक केंद्र म्हणून त्याची जागा घेतली. तेथील ग्रंथालयें व वस्तुसंग्रहालयें यामुळें दूरदूरचे असंख्य विद्यार्थी आकृष्ट होऊन येत व त्याठिकाणीं तत्वज्ञान, गणितशास्त्र व धर्म आदिकरून प्राचीन जगांतील अनेक प्रमुख प्रश्नावर चर्चा चाले. युक्लीडचं नांव आज शाळेतील प्रत्येक मुलामुलीला माहित आहे. तो अलेक्झांड्रीयाचा रहिवाशी असून अशोकचा समकालीन होता.

तुला माहितच आहे कीं, टोलेमी घराणं मूळचं ग्रीक, पण या घराण्यानं इजिप्तमधील अनेक रितीरिवाजांचा अवलंब केला; इतकंच नव्हे तर, त्यानं इजिप्तमधील कांहीं प्राचीन देवतांचाही स्वीकार केला. महाभारतांतील वैदिक देवाप्रमाणं, होमरच्या काव्यांतून वरचेवर येणाऱ्या ज्युपिटर, आपोलो प्रभृति प्राचीन ग्रीक देवतांना इजिप्तमध्यें रजा मिळाली, किंवा त्यांना नांव बदलून, नवीन पेहरावांत प्रगट व्हावं लागलं. प्राचीन इजिप्तमधील, इसीस, ओसिरी होरस ही दैवतें व त्याचप्रमाणं प्राचीन ग्रीक दैवतें यांचा मिलाफ करून जनतेपुढें आराधनेकरितां नवीन दैवतें ठेवण्यांत आलीं. लोकाना काय ? दंडवत घालायला व पूजा करायला दैवतें मिळाल्याशीं कारण ! मग तीं दैवतें कशींही असेनात व त्यांचीं नांवें कांहीं असेनात. नवीन दैवतांत सर्वांत विख्यात म्हणजे सेरापिस.

अलेक्झांड्रीया हे नामांकित व्यापारी केंद्रही असून, सुधारलेल्या जगाच्या सर्व भागांतून व्यापारी तेथे येत. असं सांगतात कीं, अलेक्झांड्रीया-मध्यें हिंदी व्यापाऱ्यांचीही एक वसाहत होती. दक्षिण हिंदुस्थानांतील मलबार किनाऱ्यावर अलेक्झांड्रीयांतील व्यापाऱ्यांची एक वसाहत होती, हें आपल्याला माहितच आहे.

इजिप्तपासून जवळच भूमध्य समुद्राच्या पलिकडे रोम होतं. यावेळीं रोम मोठ बनलं असलं तरी यापेक्षांही ते पुष्कळ मोठं व अधिक प्रबळ बनायचं होतं. आणि रोमच्या समोरच, अफ्रिकेच्या किनाऱ्यावर, कार्थेज हें त्याचं प्रतिस्पर्धि व वैरी होतं. प्राचीन जगाचं स्वरूप समजून घेण्यापूर्वी आपण या दोन्ही शहरांची हकिगत थोडी विस्तारानं पाहिली पाहिजे.

पश्चिमेकडील रोमप्रमाणेंच, पूर्वेकडे चीन महत्व पावत होतं. अशोक कालीन जगाचं योग्य चित्र रेखाटण्यापूर्वीं आपण चीनचाही विचार केला पाहिजे.



२७

# च'इन व हनवंश

ता. ३ एप्रील १९३२

गतवर्षी नैनी तुरुंगांतून, मी तुला लिहिलेल्या पत्रांत, चीनमधील आरंभीचा काल, हो-आंग-हो नदीवरील वसाहती, हसीआ, शांग किंवा चीन चौ ही प्रारंभीचीं राजघराणीं, हळुंहळू चीनचं राज्य कसं उदयास आलं नि काळाच्या ओघाबरोबर मध्यवर्ति सरकार कसं विकास पावलं, याबद्दल थोडंफार लिहीलं. यानंतरच्या दीर्घ कारकीर्दीत चौ घराण्याच्या नामधारी सत्तेखालीं असतांनाच, चीनमधील ही मध्यवर्तिकरणाची गति थांबली व जिकडं तिकडं बेदिली माजली; स्थानीक विभागांतील छोटे छोटे सरदार जवळ जवळ स्वतंत्र होऊन आपापसांत भांडूं लागले. ही खेदजनक परिस्थिति कित्येक शतकांपर्यंत टिकली. जणूं काय प्रत्येक गोष्ट चीनमध्यें अनेक शतकें किंवा हजार हजार वर्षें टिकावयाचीच असा शिरस्ताच होता! शेवटीं या छोट्या सरदारापैकीं एकानं, च'ईनच्या उमरावानं, प्राचीन पण निर्बल अशा चौ घराण्याला गादीवरून हुसकून लावलं. या उमरावाच्या घराण्यालाच च'ईन घराणं ह्मणतात. आणि या च'ईनवरूनच या देशाला चीन हें नांव पडलं.

इसवी सनापूर्वी २५५ मध्यें च'ईन घराण्यानं आपल्या कारकीर्दीचा प्रारंभ केला. यापूर्वी तेरा वर्षें अशोक हिंदुस्थानांत राज्य करूं लागला होता. अशारीतीनं, सध्यां आपण चीनमधील अशोकच्या समकालीन

राजांचा विचार करीत आहोत. पहिल्या तीन च'ईन बादशहांनीं अल्प-कालच राज्य केलं. यानंतर इ. स. पूर्वी २४६ मध्यें चौथा बादशहा गादीवर आला. आपल्या परीनं हा बादशहा मोठा विलक्षण होता. त्याचं नांव वांग पेंग असं होतं. पुढं त्यानं हुआंग-ती हें नांव धारण केलं व या दुसऱ्या नांवानंच तो प्रसिद्ध आहे. हुआंग-तीचा अर्थ "आद्य बादशहा". स्वतःविषयीं व आपल्या कालाविषयीं त्याच्या भलत्याच कल्पना असू , गतकालाविषयीं त्याला कांहींचाही आदर वाटत नसे. लोकांनीं भूतकाल विसरून आपणापासून—आद्य बादशहापासून इतिहासाला प्रारंभ झाला असं मानावं, अशी त्याची इच्छा! आपल्यापूर्वी २००० वर्षांपेक्षांहि अधिक काल चीनमध्यें बादशहा मागून बादशहा झाले याची त्याला फारशी क्षिती वाटत नव्हती. देशांतून या पूर्वींच्या बादशहांची आठवणसुध्दां नाहींशी करावयाची होती आणि हे बादशहाच काय, पण गतकालांतील प्रख्यात व्यक्तीसुध्दां त्याला विस्मृतिच्या पडद्याआड करावयाच्या होत्या. त्याचं फर्मान सुटलं कीं, गतकालांच्या सर्व हकिगती, विशेषतः इतिहास व कॉन्फ्युसिअसचे अभिजात शास्त्रीय ग्रंथ जाळून पोळून समूळ नष्ट करावेत. याला फक्त वैद्यकीय व कांहीं शास्त्रीय ग्रंथ अपवाद होते. बादशहा आपल्या फर्मानांत ह्मणतो, "प्राचीन काळचा उपयोग जर कोणी वर्तमान काळाला कमीपणा आणण्यासाठीं करूं लागला तर, त्याला त्याच्या नातेवाईकासह सुळावर चढविले जाईल." त्यानें आपले शब्द पाळले. ज्या शेंकडों पंडितांनीं, आपल्याला प्रिय असलेले ग्रंथ, छपवून ठेवण्याचा प्रयत्न केला, त्यांना जिवंत पुरण्यांत आले. हा 'आद्य बादशहा' किती दयाळू व शांत वृत्तीचा असला पाहिजे!

मला त्याची नेहमीं आठवण होते व त्याच्याविषयीं थोडीफार सहानुभूतिही वाटते. (पुष्कळ वेळां गतकालीन हिंदुस्थानची भरमसाट स्तुति केली जाते. काहीं लोक नेहमींच गतकालाकडं पहातात, त्याचं गोडवं गातात व नेहमीं त्यापासून स्फूर्तिची आशा करतात. जर गतकालापासून आपल्याला खरोखरच स्फूर्ति मिळत असेल तर ती आपण अवश्य घ्यावी; पण कोणत्याही व्यक्तीनं अगर राष्ट्रानं सदा गतकालाकडे पहात राहणं मला हितप्रद वाटत नाहीं. कुणीतरी म्हटल्याप्रमाणं मनुष्यानं सदा मागं जावं, मागं पहावं, असा उद्देश असता तर त्याच्या पाठीला डोळे असते. आपण गतकाळाचा अभ्यास अवश्य करावा व त्यांत जें स्पृहणीय असेल त्याचं अवश्य कौतुक करावं; पण आपण सदा पुढं पाहिलं पाहिजे. आपलीं पावलं पुढं पडलीं पाहिजेत.)

जुने ग्रंथ व ग्रंथवाचकाची वासलात लावण्यांत बादशहा—हुआंग—ती रानटीपणानं वागला, हे निःसंशय. याचा परिणाम म्हणजे त्याचं सर्व कार्य त्याच्या मृत्यूबरोबरच संपुष्टांत आलं. आपण पहिले बादशाह, त्यानंतर येणारे दुसरे, तिसरे, असा क्रमकाल समाप्तीपर्यंत चालू रहावा अशी त्याची मनिषा. पण लक्षांत ठेवण्याजोगीं गोष्ट म्हणजे, चीनच्या सर्व राजघराण्यांत च'ईन घराणं अल्पायुषीं ठरलं. मी तुला सांगितल्याप्रमाणं चीनच्या इतिहासांत कित्येक राजघराणीं शेकडों वर्षे टिकलीं व च'ईन घराण्याच्या पूर्वीच्या राजवंशानं तर ८६७ वर्षे राज्य केलं; पण महान च'ईन घराणं उदयास आलं, भरभराटलं, एका बलाढ्य साम्राज्यावर राज्य करून ऱ्हास पावलं व शेवटीं लयाला गेलं; आणि हें सर्व अवघ्या पन्नासच वर्षांत. बलाढ्य अशा बादशहांच्या थोर वंशपरंपरेतील बादशहा

हू—आंग— ती आद्य ठरायचा होता; पण त्याच्या मृत्यूनंतर अवघ्या तीनच वर्षांत, ख्रिस्ती सनापूर्वी २०९ मध्यें, त्यांची वंशपरपरा संपुष्टांत आली. लवकरच कॉनफ्युसिअसचें पुरून ठेविलेले आभिजात ग्रंथ व इतर वाङ्मयकृतींना सूर्य प्रकाश दाखविण्यांत आला. पुन्हां त्यांनी पूर्वीचं मानाचं स्थान पटकाविलं.

राजकर्ता या नात्यानं, बादशहा हु—आंग—ती इतका दुसरा प्रबल बादशहा चीनमध्यें झाला नाहीं. त्यानं अनेक स्थानिक सरदारांचे हक्क नष्ट केले, सरंजामशाही जमीनदोस्त करून त्याठिकाणीं प्रबल असं सरकार स्थापिलं व सारा चीन, इतकंच नव्हे तर आनामसुद्धां जिंकला. त्यानंच चीनची प्रचंड भिंत बांधावयास सुरवात केली. हें मोठं खर्चाचं काम; पण संरक्षणाकरितां मोठी फौज ठेवण्यापेक्षां या भिंतीवर पैसा खर्च करणं चिनी लोकांना अधिक फायदेशीर वाटलं. मोठ्या स्वारीला या भिंतीमुळं क्वचितच अडथळा होत असला तरी क्षुल्लक आक्रमणें तीमुळं रोखलीं जात. यावरून एवढं दिसून येतं कीं, चिनी लोकांना शांतता पाहिजे होती. सामर्थ्य असूनही ते लष्करी पेशाचे शोकीन नव्हते.

हु—आंग ती—" आद्य बादशहा " मरण पावला, नी त्याच्या वंशांत दुसरा बादशहा क्वचितच झाला. त्याच्या काळापासून, चीनमधील ऐक्य परंपरा मात्र कायम आहे.

यानंतर, निराळा राजवंश—हन वंश पुढें आला. हा वंश ४०० हूनही अधिक काळ टिकला. या वंशांतील आरंभीच्या राज्यकर्त्यामध्यें एक स्त्रीहि होऊन गेली. या घराण्यांतील सहावा पुरुष वु—ती हा असून

तो चीनमधील अत्यंत प्रबळ व विख्यात राजकर्त्यांपैकीं एक होता. पन्नास वर्षांहून अधिक काल त्यानं राज्य केलं. उत्तरचीनवर वारंवार स्वाऱ्या करणाऱ्या तार्तरांचा त्यानं मोड केला. पूर्वेकडं कोरिया ते पश्चिमेकडं कास्पीयन समुद्रापर्यंत चिनी बादशहाची सत्ता असून, मध्य आशियांतील सर्व टोळ्यांनीं त्याचं प्रभुत्व मान्य केलं होतं. आशियाच्या नकाशाकडे पहा. त्यावरून इसवी सनापूर्वी पहिल्या व दुसऱ्या शतकांत, केवढ्या मोठ्या प्रदेशावर त्याचा दरारा व चीनची सत्ता होती, याची तुला थोडी फार कल्पना येईल. या काळांतील रोमविषयीं आपल्याला बरंचसं वाचायला मिळतं व एकाद्याचा असा ग्रह होतो कीं रोमनं सर्व जगाला निष्प्रभ केलं असलं पाहिजे. रोमला "जगाची राणी" असं म्हणत. पण यावेळीं रोम मोठं असलं व त्याचा मोठेपणा वाढत असला तरी, चीन अधिक विस्तृत व अधिक प्रबल साम्राज्य होतं.

बु-तीच्या काळांत चीन व रोममध्यें दळणवळणास सुरवात झाली असावी. या दोन राष्ट्रांतील व्यापार त्यावेळीं पार्थियन लोकांमार्फत चाले. पार्थियन लोक आज ज्या प्रदेशाला इराण व मेसापोटेमिया म्हणतात, त्याप्रदेशांतील. पुढें रोम व पार्थिया यांमध्यें युध्द सुरू होऊन या व्यापारांत अडथळा आल्यामुळं रोमनें थेट चीनबरोबर व्यापार करण्याचा प्रयत्न केला व त्याकरितां रोमचं एक जहाज, प्रत्यक्ष चीनमध्यें आलंहि होतं. पण ही गोष्ट इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांतील. आपण अद्याप, इसवी सनापूर्वीच्या शतकांतच आहोंत. चीनमध्यें बौध्दधर्म आला तो हन घराण्याच्या कारकीर्दींत. इसवी सनापूर्वींहि तो चीनमध्यें माहित होता, पण त्याच्या प्रसाराला मात्र पुढें प्रारंभ झाला. असं सांगतात कीं चीनच्या

त्यावेळच्या बादशहानं स्वप्नांत एक सोळा फूट उंचीची व्यक्ती पाहिली. या व्यक्तीच्या मस्तकाभोंवतीं दैदिप्यमान तेजोवलय होतं. बादशहाला स्वप्नांतील हें दृश्य पश्चिमेला दिसल्यामुळें त्यानं पश्चिम दिशेकडे दूत पाठविले आणि हे दूत बुध्दाची मूर्ति व त्याचं लिखाण घेऊन परत आले. बौध्दधर्माबरोबरच चीनमध्यें हिंदी कलेनेंही प्रवेश केला व तेथून ती पुढें कोरिया व जपानमध्यें पसरली.

हन कारकिर्दींत आणखी दोन संस्मरणीय गोष्टी घडल्या. लाकडी ठोकळ्यांवर मुद्रण करण्याच्या कलेचा शोध लागला. मुद्रणकला पुढें जवळ जवळ १००० वर्षे फारशी उपयोगांत नसली तरी या बाबतींत चीन युरोपपेक्षां ५०० वर्षे पुढं होतं, यांत शंका नाहीं.

दुसरी उल्लेखनीय गोष्ट म्हणजे, सार्वजनिक अधिकाऱ्याकरितां परीक्षा पध्दतिची सुरवात. मुलांमुलींना परीक्षा आवडत नाहींत व मला त्यांच्या बद्दल सहानुभूति वाटते. पण सार्वजनिक अधिकारी नेमण्याची, तत्कालीन चिनीपध्दत एका दृष्टीनं मोठी विलक्षण होती. इतर देशात अलीकडच्या काळापर्यंत अधिकाऱ्यांच्या नेमणुकीबाबत बराचसा पक्षपात होई किंवा एका विशिष्ट वर्गातील वा जातींतील अधिकारी नेमले जात. चीनमध्यें परीक्षा पास होणाऱ्या कोणाही माणसाची नेमणूक होई. ही परीक्षापध्दत नमुनेदार होती, अशांतला भाग नाहीं. कारण एकादा मनुष्य कॉनफ्युसिअसच्या वाङ्मयांतील परिक्षा पास झाला तरी अधिकारी नात्यानं तो योग्य ठरत नसेल; पण पक्षपातीपणा वगैरे दृष्टीनं पाहिलं तर ही मोठीच सुधारणा असून, ती चीनमध्यें २००० वर्षे टिकली. अगदीं अलीकडे या पध्दतीला फाटा देण्यांत आला आहे.

२८

# रोम विरुद्ध कार्थेज

ता. ५ एप्रील १९३२

अतिपूर्वेकडून आपण आतां पश्चिमेकडे जाऊन रोमच्या अभिवृध्दीचा तलास लावूं. रोमची स्थापना इसवीसनापूर्वी आठव्या शतकांत झाली असं म्हणतात. अगदीं आरंभीच्या रोमन लोकांच्या—हे बहुधा आर्यांचेच वंशज असावेत—टायबर जवळील सात टेंकड्यावर ज्या कांहीं वसाहती होत्या, त्यांचीच क्रमशः वाढ होत जाऊन, एक शहर बनलं असावं आणि याच नगर संस्थानची वाढ व विस्तार इटलीभर होऊन, शेवटीं त्यानं सिसिलीसमोरील मेसिना हें दक्षिण टोक गांठलं असावं.

ग्रीसमधील नगरसंस्थानें तुला आठवत असतीलच. ज्या ज्या ठिकाणीं ग्रीक लोक गेले त्या त्या ठिकाणीं त्यांनीं नगर संस्थानांची कल्पना नेली. ठिपक्या ठिपक्याप्रमाणें सर्व भूमध्यसमुद्रकिनाऱ्यावर ग्रीक वसाहती व नगरसंस्थानें होतीं. आतां रोममध्यें मात्र आपणाला याहून अगदीं निराळं पहायला मिळतं. प्रारंभीं कदाचित रोम, ग्रीक नगरसंस्था-नाहून निराळं नसावं; पण लवकरच शेजारच्या टोळ्यांचा पराभव करून, रोमनं आपला विस्तार वाढविला. अशा रितीनं रोमनसंस्थानचा प्रदेश वाढत जाऊन, त्यांत इटालीचा मोठा भाग मोडूं लागला. या मोठ्या प्रदेशांत नगरसंस्थानचं मूळ स्वरूप राहणंच शक्य नव्हतं. या सर्व प्रदेशावर

रोमचें राज्य असून, रोमनसरकार तर एका विशिष्ट तऱ्हेचं होतं. त्या ठिकाणीं बडा बादशहा किंवा राजा नव्हता व त्याचप्रमाणं तें आधुनिक पध्दतीचं प्रजासत्ताकही नव्हतं; तरीहि तेथील सरकार एक प्रकारचं लोकशाही पक्षाचं असून, जमिनजुमला असलेल्या कांहीं सधन कुटुंबाचेंच त्यांत प्राधान्य होतं. लोकसभा ( Senate ) राज्य कारभार करते, असं मानलं जाई व या सेनेटची निवड " कौन्सल " म्हणून ओळखल्या जाणाऱ्या दोन व्यक्ती करीत. दीर्घकालपर्यंत, फक्त उमरावांनाच सेनेटचे सभासद होता येत असे. रोमन लोकांत दोन वर्ग होते. मोठ्या कुटुंबांतील बहुधा जमिनदार असे श्रीमंत उमराव आणि दुसरे सामान्य नागरीक ( Plebians ). रोमन संस्थानें किंवा प्रजासत्ताकांचा शेंकडों वर्षांचा इतिहास म्हणजे, या दोन वर्गांतील झगड्याचा इतिहास. उमरावांच्या हातीं सर्व सत्ता व सत्तेबरोबर संपत्तीही होती तर सामान्य नागरिक पददलित असून, त्यांच्या जवळ पैसा अगर सत्ता या दोहोंचाही अभाव होता. सामान्य नागरिकांनीं सत्तेकरितां झगडा चालू ठेविला व हळूं हळूं त्यांच्या पदरांत अधिकाराचे कांहीं तुकडे पडले. मनोरंजक गोष्ट ही कीं, या दीर्घकालीन लढ्यात सामान्य नागरिकांनीं एकदा एक प्रकारच्या असहकारितेचा अवलंब केला होता. सामुदायिकरित्या, रोमबाहेर जाऊन त्यांनीं एक नवीनच शहर वसविलं. उमराव वर्ग घाबरून गेला. सामान्य नागरिकाशिवाय त्यांचं सर्व गाडं अडून राहिलं. सामान्य नागरिकाबरोबर समेट घडवून आणून त्यांनीं त्यांना कांहीं थोड्या सवलती दिल्या. त्यामुळं सामान्य नागरिकाला उच्च अधिकारी, इतकंच नव्हे तर सेनेटचा सभासदही होतां येऊं लागलं.

आपण उमराव वर्ग व सामान्य नागरिक यांमधील झगड्याच्यासंबंधीं बोलतो आणि यामुळं, तेथें इतर कोणी नसावेंत, असं वाटण्याचा संभव आहे. पण वरील दोहों शिवाय रोमन राज्यांत असंख्य गुलाम असून, त्यांना कसलेहि अधिकार नव्हते. त्यांना मतदानाचा हक्क नव्हता; गुरा-ढोराप्रमाणें ते आपल्या धन्याची खासगी व वैयक्तिक मालमत्ता समजली जात. मालकांच्या लहरीप्रमाणें त्यांचा विक्रय करण्यांत येई अगर त्यांना शिक्षा ठोठावण्यांत येई. कांहीं विवक्षित अटीवर त्यांची सुटका होऊं शके; आणि अशा रितीनं जेव्हां त्यांची सुटका झाली तेव्हां त्यांनीं "मुक्त माणसांचा वर्ग" म्हणून ओळखला जाणारा वर्ग स्थापिला. पश्चिम जगांत, प्राचीन काळीं, गुलामांना मोठी मागणी असून, ती पुरविण्यासाठीं गुलामांच्या प्रचंड बाजारपेठा निघाल्या; आणि दूरदूरच्या प्रदेशांतील स्त्रीपुरुष, इतकेंच काय पण मुलेंही पकडून आणून त्यांना गुलाम म्हणून विकण्यासाठीं मोहिमा काढण्यांत येत. प्राचीन इजिप्तप्रमाणें प्रचण्ड प्रमाणांत वावरणारी गुलामगिरी ही, प्राचीन ग्रीस व रोमचे वैभव व बादशाही दिमाखाचा पाया होती.

त्यावेळीं हिंदुस्थानांतही अशीच गुलामगिरीची पद्धत चालू होती काय? बहुतेक नसावी. चीनमध्येंही गुलामगिरीची पद्धत नव्हती. याचा अर्थ प्राचीन हिंदुस्थान अगर चीन मध्यें कसलीच गुलामगिरी नव्हती, असा नव्हे. जी गुलामगिरी अस्तित्वांत होती, ती घरगुती स्वरुपाची असून, कांहीं घरगुती नोकरांना गुलाम समजण्यांत येई. शेतावर किंवा इतरत्र राबणाऱ्या प्रचंट टोळ्या किंवा श्रमजीवि गुलाम हिंदुस्थान

किंवा चीनमध्यें असल्याचें दिसत नाहीं. गुलामगिरीच्या अत्यंत अधोगतीला पोहोंचलेल्या या अंगापासून हे दोन्ही देश सुटले होते.

रोमची अभिवृद्धी झाली, त्यामुळें उमराव वर्गाचा फायदा होऊन ते अधिक धनवान बनले; त्यांची अधिक भरभराट झाली. सामान्य नागरिक मात्र गरीबच राहिले. त्यांच्या डोक्यावर उमराव वर्ग बसला होता व उमराव नी सामान्य नागरिक हे दोन्ही वर्ग बिचाऱ्या गुलामांच्या डोक्यावर बसण्याकरितां एकवटले होते.

रोमची चढती कमान होती; पण तेथील राज्यकारभार कशा प्रकारचा होता? सेनेट कारभार करी असं मी म्हटलं आहे; आणि सेनेटची निवड दोन लोकनियुक्त सभासद करीत. पण या सभासदांची निवड कोण करीत? नागरिक हे मतदार होते. आरंभीं रोम हें लहान नगर संस्थान होतं. सर्व नागरिक रोममध्यें किंवा रोमच्या आसपास रहात. यावेळीं त्यांना एकत्र जमवून मतदान करणं फारसं कठीण जात नसे. पण रोमची वाढ झाली त्यावेळीं रोमपासून लांब रहाणारे जे अनेक नागरिक होते, त्याना मतदान करणं सोपं नव्हतं. ज्यांना हल्लीं "प्रातिनिधीक सरकार" म्हणतात त्याची त्यावेळीं उत्क्रांति झाली नव्हती किंवा त्यांचा अम्मलही नव्हता. सध्यां, तुला माहितच आहे, कीं प्रत्येक भाग किंवा मतदार संघ, राष्ट्रीय समिती, पार्लमेंट किंवा राष्ट्रीय सभेकरितां आपला प्रतिनिधी निवडतो व एक प्रकारें हे छोटं मंडळ सर्व राष्ट्राचं प्रातिनिधीक ठरतं. ही कल्पना जुन्या रोमनांना सुचली नाहीं. ते फक्त रोममध्येंच मतें घेत आणि या मतदान प्रसंगीं दूरदूरच्या

मतदारांना येणं अशक्य होई. तसं पाहिलं तर दूरच्या मतदारांना काय चाललं आहे हें क्वचितच समजे. त्यावेळीं वृत्तपत्रें, पत्रकें किंवा छापलेलीं पुस्तकें नव्हतीं व फारच थोड्या लोकांना वाचतां येई. रोमपासून दूर राहणाऱ्या लोकांचा मतदानाचा हक्क अशा रितीनं व्यवहारतः निरुपयोगी ठरे. मतदानाचा हक्क असूनही अंतर त्यांचा हा हक्क हिरावून घेई.

वरील माहितीवरून तुला दिसून येईल कीं, खुद्द रोममधील मतदारांनाच निवडणुकींत किंवा महत्वाच्या निर्णयांत भाग घेतां येई. उघड्या जागेंतील आवारांत जाऊन, ते मतें घेत. या मतदारांपैकीं पुष्कळसे गरीब नागरिक असत. ज्या धनिक उमरावांना, उच्च अधिकार सत्ता पाहिजे असेल, ते या गरीब लोकांना लांच देऊन, आपल्याला मतें द्यायला लावीत. आधुनिक काळांतील निवडणुकींमध्यें कांहीं कांहीं प्रसंगीं आढळून येणारी लाचलुचपत व युक्त्याप्रयुक्त्या रोमन निवडणुकींत भरपूर प्रमाणांत चालत असे.

इटालीमध्यें रोमची अभिवृध्दी होत असतांनाच, उत्तर आफ्रिकेंत कार्थेज बलाढ्य होत चाललं होतं. कार्थेजियन लोक, फोएनिशीयन लोकांचे वंशज असून, त्यांच्यात दर्यावर्दीपणा व व्यापार वंशपरंपरेनें चालत आले होते. त्यांचंही प्रजासत्ताक राज्य होतं; पण रोमपेक्षांही या राज्यांत धनिकांनाच अधिक वाव होता. कार्थेज हें नगरसंस्थान असून, तेथें गुलामांची प्रचंड संख्या होती.

रोम व कार्थेज या दोहोंमध्यें प्रारंभीच्या काळांत, दक्षिण इटाली व मेसिना या ग्रीक वसाहती होत्या. येथील ग्रीकांचे उच्चाटन करण्याकरितां रोम व कार्थेज एक झाले व त्यांत यश आल्यावर कार्थेजनं सिसिली बळकावला व रोमची हद्द थेट इटलीच्या दक्षिण टोंकापर्यंत येऊन भिडली. रोम व कार्थेज यामधील ही दोस्ती व तह फार काळ टिकला नाहीं. त्यांच्यांत लवकरच खटके उडूं लागून हाडवैर निर्माण झालं. चिंचोळया समुद्राच्या दोन्ही बाजूला समोरासमोर असलेल्या या दोन बलाढ्य सत्तांना पुरेल इतका भूमध्य प्रदेश मोठा नव्हता. दोघेही महत्वाकांक्षी. रोमची वाढ होत असून, त्याच्या ठिकाणीं तरुणाची महत्वाकांक्षा व आत्मविश्वास होता. कार्थेज, प्रारंभीं, रोमच्या आकास्मिक उदयाकडे थोडंसं उपहासानं पाही; समुद्रावरील आपल्या प्रभुत्वाचा त्याला विश्वास वाटे. मध्यंतरी थोडा फार शांततेचा काळ सोडला तर, एक शतकाहून अधिक काळ, ते एकमेकांशीं लांडग्यासारखे झगडले व त्यामुळें असंख्य लोकांचे हाल झाले. त्यांच्यामध्यें झालेलीं तीन युद्धें, प्युनिक युद्धें, म्हणून प्रसिद्ध आहेत. पहिलं प्युनिक युद्ध इसवीसनापूर्वी २६४ तें २४१ पर्यंत टिकलं व त्यांत रोमचा विजय झाला. पुढें बावीस वर्षांनीं दुसरं प्युनिक युद्ध सुरूं झालं. या युद्धांत कार्थेजनं हॉनिबाल या इतिहासांतील विख्यात सेनापतीला पाठविलं होतं. जवळ जवळ, १५ वर्षे हॉनिबालनं रोमला त्राहिभगवान करून, रोमनलोकांचा थरकांप उडविला. विशेषतः इसवीसनापूर्वी २१६ मध्यें कनाईच्या लढाईत त्यानं रोमन फौजेची भयंकर कत्तल उडविली. रोमन लोकांचे समुद्रावर प्रभुत्व असून, हॉनिबलचा कार्थेजशी संबंध तुटला होता; अशा स्थितींत कार्थेज

कडून फारशा मदतीची अशा नसतांही त्यानं हा पराक्रम गाजविला. पण पराभव, हानि व हॅनिबालचं अरिष्ट कायम असतांही, रोमनलोक डगमगले नाहींत; आपल्या कट्टया शत्रूंशीं ते लढतच राहिले. हॅनिबालशीं समोरासमोर लढाई देण्यास ते भीत. त्यांनीं असल्या लढाया टाळल्या नि फक्त त्याला सतावून, त्याचं दळणवळण तोडण्याचा क्रम चालू ठेविला. यावेळीं रोमन सैन्याचा सेनापति फेबीयस हा असून, अशा प्रकारें, समोरासमोरील लढाया टाळण्याच्या पद्धतीचा तो भोक्ता होता. मी त्याच्या नांवाचा उल्लेख केला आहे. याचं कारण तो कोणी महान किंवा लक्षांत ठेवण्यास योग्य पुरुष होता म्हणून नव्हे; तर त्याच्या नांवामुळें, इंग्लिश भाषेंत फेबियन हा शब्द, प्रसृत झाला आहे. "फेबीयन" डावपेंच म्हणजे परिस्थिती निकरावर न आणणें. युद्ध किंवा निकराची परिस्थिति टाळून, हळूं हळूं, उत्क्रांति मार्गानं ध्येय साध्य करण्याची फेबियनांना आशा वाटते. इंग्लंडमध्यें, फेबियन सोसायटी आहे. या संस्थेला समाजसत्तावाद मान्य आहे; पण तडकाफडकी मार्ग किंवा आकस्मिक बदल यावर मात्र विश्वास संस्थेचा नाहीं.

हॅनिबालनं, इटालींतील बराचसा प्रदेश उजाड केला; पण शेवटीं चिकाटी व खंबीरपणा यामुळं रोमचाच विजय झाला. इसवीसनापूर्वीं २०२ मध्यें झामाच्या लढाईंत हॅनिबालचा पराभव झाला व रोमच्या अशमनीय सूडाच्या भावनेपासून आपला बचाव करण्यासाठीं एका ठिकाणहून दुसऱ्या ठिकाणीं असं त्याला जीव घेऊन पळावं लागलं. शेवटीं त्यानं विष घेऊन आत्महत्या केली.

यानंतर, पन्नास वर्षेपर्यंत रोम व कार्थेज यांच्यांत समेट राहिला होता. कार्थेजचा पुरा पाडाव होऊन, रोमला आव्हान देण्याचं त्याच्यांत आता क्वचित्‌च सामर्थ्य राहिलं होतं; पण रोमचं मात्र समाधान झालेलं नव्हतं. कार्थेजियन लोकांवर त्यांनी तिसरं युद्ध लादलं. या युद्धांत भयंकर कत्तल उडून, कार्थेजचा पुरा नाश झाला. एकेकाळच्या मानी कार्थेजवर—भूमध्य प्रदेशाच्या सम्राज्ञीवर—नांगर फिरविण्यांत आला.

---

## २९

# रोमन प्रजासत्ताकाचें साम्राज्यांत रूपांतर

ता. ९ एप्रील १९३२

कार्थेजचा पराभव नि नाश यामुळं रोम पश्चिमेकडे सर्व श्रेष्ठ बनून त्याला कोणी प्रतिस्पर्धी उरला नाही. यापूर्वीच रोमनें ग्रीक संस्थानें काबीज केली होती. दुसऱ्या प्यूनिक–युद्धानंतर रोमनें कार्थेजचा मुलूख हस्तगत केल्यामुळं स्पेन रोमच्या वर्चस्वाखाली आले होते. मात्र रोमन साम्राज्याची व्याप्ति, अद्यापही भूमध्य प्रदेशांपुरतीच असून, सर्व उत्तर व मध्य युरोप स्वतंत्र होत.

विजय व वाढतं साम्राज्य यामुळं रोममध्यें संपत्ति व ऐषआरामी दिसू लागली. जित–राष्ट्रांतिल सोनें व गुलाम यांचा प्रवाह रोमकडे वळला; पण कोणाकडे? मी आधिच सांगितल्याप्रमाणें सेनेट म्हणजे रोममध्यें राज्यकारभार करणारं मंडळ असून, त्यांत फक्त धनिक अशा उमरावी कुटुंबांनाच वाव असे. या धनिक लोकांचं रोमन प्रजासत्ताक व तेथील जीवनक्रम यांवर नियंत्रण असून, रोमचं सामर्थ्य व विस्तार यांच्या वाढी बरोबरच या लोकांची संपत्तीही वाढूं लागली. अशारीतीनं ते अधिक धनवान बनत चालले व गरीब हे गरीबच राहिले, नव्हे अधिकच गरीब झाले. गुलामांची संख्या वाढूं लागली व एका बाजूला जितकी ऐष-आरामी तितकीच दुसऱ्या बाजूला विपत्ति दिसू लागली. असा प्रकार होऊं लागला की देशांत बहुधा अशांतता निर्माण होते. लोक सहन तरी किती करतात हें आश्चर्यकारक खरंच; पण मानवी सहनशीलतेलाही मर्यादा आहेच. तिचा कडेलोट झाला की स्फोट हें व्हावयाचेच!

गोरगरीबांना खेळ व सर्कशींतील सामने याद्वारें खूष राखण्याचा धनिक लोक प्रयत्न करीत. लोकांचं मनरंजन करण्यासाठीं दोन योध्यांना एकमेकांशी लढवून परस्परांचा जीव घ्यायला लावण्यांत येई. अशारीतीनं खेळाच्या नांवाखालीं पुष्कळ गुलाम व युध्द कैदी ठार करण्यांत आले होतें.

हे प्रकार चालू असतां रोमन राज्यांतील बंडाळी वाढत्या प्रमाणावर होती. बंडे, कत्तली त्याचप्रमाणें निवडणुकीतील लांचलुचपत, लांडीलबाडी चालूच होती. पददलित अशा गुलामांनीही यावेळीं स्पार्टाकस नांवाच्या योध्याच्या नेतृत्वाखालीं बंड पुकारलं. हें बंड निर्दयपणें चिरडण्यांत येऊन बंडवाल्यापैकीं ६००० लोकांना सुळावर चढविण्यांत आलं! हळू हळूं साहसी लोक व लष्करी अधिकारी यांना महत्व येऊन त्यांची सेनेटवर छाप पडूं लागली. यादवी माजली, प्रदेश उजाड झाला. प्रतिस्पर्धी सेनापती एकमेकांशी झगडू लागले. पूर्वेकडे पार्थियांतही ( मेसापोटेमिया ) इसवीसनापूर्वी ५३ व्या वर्षी काराहईच्या लढाईत आक्रमक रोमन फौजेचा मोठा पराभव होऊन, पार्थियन सैन्यान त्यांचा धुव्वा उडविला.

या काळांत रोममध्यें जे अनेक सेनापति होते त्यांतील दोन नावें विशेषरीतीनं नजरेसमोर येतात. तीं म्हणजे पाँपी व ज्यूलियस सीझर हीं होत. सीझरनं फ्रान्स ( तत्कालिन गॉल ) व ब्रिटन हे देश जिंकले. पोम्पी पूर्वेकडे चालून गेला व तेथें त्याला थोडं बहुत यशही आलं. या दोघांत हाडवैर होतं. दोघेही महत्वाकांक्षी व दोघांनाही प्रतिस्पर्धी सहन होत नसत. गरीब बिचारे सेनेट—दोघेंही त्याला तोंडदेखला मान

ःत असले तरी हळू हळूं त्याला गौणत्व येत चाललं होतं. पुढें पॉम्पीचा ाराभव करून सीझर रोमन राज्याचा प्रमुख बनला. पण रोम प्रजासत्ताक असल्यामुळें अधिकृतरीत्या सीझरला प्रत्येक गोष्ट मनाप्रमाणें करतां येत नसे. म्हणूनच त्याला राजा किंवा बादशहा करण्याचे प्रयत्न झाले. खुद्द सीझरचीही या गोष्टीला संमत्ती असली तरी प्रजासत्ताकाच्या दीर्घ प्रथेमुळें तो कचरला. ही प्रथा त्याच्यामानानं इतकी जबरदस्त ठरली कीं, खुद्द सेनेट सभागृहाच्या पायरीवरच ब्रूटस प्रभृतींनीं त्याला भोसकून ठार केलं. ज्यांत हा प्रसंग दिलेला आहे तें शेक्सपियरचं ज्यूलियस सीझर हें नाटक तू वाचलंच असशील.

ज्यूलियस सीझर इसवी सनापूर्वी ४४ मध्यें मारला गेला; पण त्याच्या मृत्यूमुळें प्रजासत्ताक तरूं शकलं नाहीं. सीझरचा दत्तकपुत्र ऑक्टेव्हियन व त्याचा मित्र मार्क अँटनी यानीं सीझरच्या वधाचा सूड उगवला. राजशाही पुन्हां परत आली. ऑक्टेव्हियन राज्याचा धुरीण ( Princeps ) बनला व प्रजासत्ताक संपुष्टांत आलं. सेनेट चालूंच राहिलं; पण नाममात्र!

धुरीणपद मिळाल्यानंतर ऑक्टेव्हियननं ऑगस्टस् सीझर हें पद धारण केलं. त्याच्या नंतरच्या सर्व वारसांना "सीझर" म्हणत. पुढें सीझर हाच शब्द बादशहा या अर्थीं वापरण्यांत येऊं लागला. कैसर व झार हे सीझर या शब्दाचेच अपभ्रंश. कैसर हा फार पूर्वीपासून हिंदी शब्द असल्याचं कैसर–ई–न कैसर–इ–हिंद यावरून दिसून येतं. इंग्लंडच्या जॉर्ज बादशहाला कैसर–इ–हिंद ही पदवी आहे. जर्मन कैसर गे[illegible] गत ऑस्ट्रियन कैसर, तुर्की कैसर व रशियन झारची झाली.

ज्यानं रोमच्यावतीनं इंग्लंड पादाक्रांत केलं, त्या ज्यूलियस् सीझरचं नांव धारण करायला आज मितीला इंग्लंडचा राजा हा एकटाच रहावा, ही विचार करण्यासारखी चमत्कारिक गोष्ट नाहीं कां ?

ज्यूलियस सीझरचं नांव बादशाही भपक्याशीं निगडीत झालं आहे. ग्रीसमधील फार्सालसच्या लढाईत पॉम्पीनं त्याला पराभूत केलं असतं तर ? कदाचित पॉम्पी हा धुरीण किंवा बादशहा बनला असतां व पॉम्पी म्हणजे बादशहा असा अर्थ रूढ होऊन आपल्याला जर्मन पॉम्पी ( दुसरा विल्यम ) पहायला मिळाला असतां व जॉर्ज बादशहाहि पॉम्पी इ-हिंद झाला असतां !

रोमन राष्ट्राच्या संक्रमणावस्थेंत प्रजासत्ताकाला साम्राज्याचं स्वरूप येत होतं. यावेळीं इजिप्तमध्यें एक स्त्री होऊन गेली. सौंदर्याबद्दल इतिहासांत तिची ख्याति आहे. ही स्त्री म्हणजे क्लिओपॅट्रा. ती वर्तनानं तितकीशी चांगली नव्हती; पण केवळ सौंदर्यामुळं इतिहासाच्या प्रवाहाला, ज्यांनीं निराळं वळण दिलं अशा थोड्या स्त्रियांपैकीं ती एक होती. ज्यूलियस सीझर इजिप्तमध्यें गेला त्यावेळीं ती लहान होती. पुढें तिचा मार्क ॲंटनीशीं दाट स्नेहसंबंध जडला; पण या स्नेहसंबंधाचा फायदा ॲन्टनीला क्वचितच मिळाला. इतकंच नव्हेतर एका मोठ्या आरमारी लढाईत तिनं आपली सर्व जहाजं विश्वासघातानं काढून घेऊन त्याला फशी पाडलं. प्रख्यात फ्रेंच लेखक पास्कल यानं फार पूर्वी " क्लिओपॅट्रेचं नाक थोडं लांब असतं, तर जगांत मोठीच उलथापालथ झाली असती." *

---

* " Le nez de cleopatre; S'il cut ete plus court toute la face de la terre aurait change "

असं लिहिलं आहे. अर्थात यांत बरीच अतिशयोक्ति आहे. क्लिओपॅट्राच्या नाकामुळें जगांत मोठी घडामोड झाली असती असं म्हणतां येत नाहीं; पण सीझरला इजिप्तला जाऊन आल्यानंतरच आपण कोणी राजा, बादशहा किंवा परमेश्वर 'प्रेषित' आहोंत असं वाटूं लागणं शक्य आहे. इजिप्तमध्यें लोकशाही नसून राजसत्ता होती आणि राजा म्हणजे सर्व श्रेष्ठच नव्हे तर प्रति—परमेश्वरच मानला जाई. इजिप्शियन लोकांचीही पुरातन विचारसरणी होती आणि अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर इजिप्तवर राज्यकरणाऱ्या टॉलेमी या ग्रीक घराण्यानंही बहुतेक सर्व इजिप्शियन रूढी व विचारसरणी यांचा अवलंब केला. क्लिओपॅट्रा टॉलेमीच्या घराण्यांतील असल्यामुळं ती ग्रीक विशेषत: मॅसिडोनियन राजकन्या होती हें उघडच आहे.

क्लिओपॅट्रामुळें असो अगर नसो, राजा म्हणजे परमेश्वर ही इजिप्शियन भावना रोममध्यें गेली व तेथें तिनं मूळ धरलं. ज्युलियस सीझरच्या काळांत व प्रजासत्ताक उर्जितावस्थेंत असतानांही त्याचे पुतळे उभारून त्याची पूजा करण्यांत येत होती. रोमन बादशहांनीं ही प्रथा कशी रूढ केली हें पुढें पाहूं.

आतां आपण रोमच्या इतिहासांतील एका महत्त्वाच्या वळणापाशीं—प्रजासत्ताकाच्या अंतकाळापर्यंत—येऊन दाखल झालों. इसवीसन २७ मध्यें ऑक्टेव्हियन ऑगस्टस् सीझर ही पदवी धारण करून धुरीण बनला. रोम व तेथील बादशहा यांची ही हकीगत आपल्याला पुढें चालूं करावयाचीच आहे. मध्यंतरीं प्रजासत्ताकाच्या या शेवटच्या काळांतील रोमन प्रदेशांकडे पाहूं.

रोमचा यावेळीं इटली व पश्चिमेकडे स्पेन व फ्रान्स (गॉल) यांवर अंमल असून पूर्वेकडे ग्रीस व एशिया मायनॉर हे देश रोमकडेच होते. एशियामायनॉरमध्येंच पेर्गामम हें ग्रीक संस्थान होतं, हें तुला आठवतच असेल. उत्तर आफ्रिकेंत इजिप्त हे दोस्त व सुरक्षित राष्ट्र असून कार्थेज व भूमध्य प्रदेशाचा कांहीं भागही रोमन रुत्तेखालींच होता. अशा रीतीनं उत्तरेकडे रोमनराज्याची सरहद्द ऱ्हाइनला भिडली होती. जर्मनी, रशिया, उत्तर व मध्य यूरोप व त्याच प्रमाणें मेसापोटेमियाच्या पूर्वेकडील भाग हा रोमन साम्राज्यांत मोडत नव्हता.

रोम या काळांत वैभवशाली होतं; पण इतिहासाची माहिती नसलेल्या युरोपांतील अनेक लोकांची अशी समजुत होती कीं, रोमचं जगावर प्राबल्य होतं; पण ही समजुत वस्तुस्थितीस अगदीं सोडून होती. याच काळांत चीनमधील हन् वंशाची आशियापासून कास्पियनपर्यंतच्या अफाट प्रदेशावर सत्ता होती. मेसापोटेमियांतील ज्या कारहाईच्या लढाईंत रोमन लोकांचा मोठा पराभव झाला, त्या लढाईंत पार्थियनांना मंगोलियन लोकांची मदत झाली असल्याचा संभव आहे.

पण रोमन इतिहास, विशेषत: रोमन प्रजासत्ताकाचा इति ास युरोपियन लोकांना प्रिय असल्यानं त्यांना वाटतं कीं, आजच्या युरोपियन राष्ट्रांचं रोम हे एका दृष्टीनं पूर्वज आहे. त्यांत कांहींसं तथ्यही आहे. इंग्लिश शाळेंतील मुलांना हल्लींचा इतिहास माहीत असो कीं नसो, त्यांना ग्रीक व रोमन इतिहास शिकणं भाग पडे. मला स्वत:ला ज्यूलियस सीझरच्या गॉलमधील मोहिमेची मूळ लॅटिनमधील हकीगत वाचणं कसं भाग पडलं हें चांगलं आठवतं. सीझर हा नुसता मोठा योद्धाच नसून

तो ऐटबाज व प्रभावी लेखकही होता. त्यानं लिहिलेलं "डी बेलो गॉलिको' हें पुस्तक अद्यापही युरोपांतील हजारों शाळांतून वाचलं जातं.

आपण अशोककालीन जगाचं जें सिंहावलोकन सुरू केलं तें आतां पुरं केलं. इतकंच नव्हे तर, चीन व युरोपमध्यें अशोकाच्या काळापेक्षांही पुढें मजल मारली आहे. आपण आतां इसवीसनाच्या प्रवेशद्वारांत आलों आहोंत व हिंदुस्थानातील लोकांची माहिती तेथपर्यंत आणून भिडविण्याकरितां आपल्याला परत फिरलं पाहिजे. हिंदुस्थानांत अशोकाच्या मृत्यूनंतर मोठ्या घडामोडी झाल्या. दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांत नवीन साम्राज्यं उदयास आली.

एकंदरींत जगाचा इतिहास अखंड आहे हें तूं लक्षांत घ्यावेंस, असा माझा प्रयत्न आहे. पण तुला आठवतंच असेल कीं, या आरंभीच्या काळांत जगातील निरनिराळ्या देशांतील दळणवळण अगदींच मर्यादित होतं. रोम पुष्कळ बाबतींत पुढारलेलं असलं तरी रोमनांचं, भूगोल नि नकाशांचं ज्ञान तुटपुंजं असून त्या बाबतींत त्यांनीं विशेष तसदीही घेतली नाहीं. रोमन सेनापति नि सेनेटमधील शहाणी माणसं आपल्याला जगाचे धनी समजत; पण त्यांच्यापेक्षां शाळेतील सध्यांच्या मुलांमुलींना भौगोलिक ज्ञान कितीतरी अधिक आहे. शिवाय रोमन लोक जसे आपल्याला जगाचे धनी समजत होते, तसेंच आशियाच्या दुसऱ्या बाजूला हजारों मैल दूर असलेले चीनचे राज्यकर्तेहि आपल्याला जगाचे धनी समजत.

---

## ३०

# दक्षिण हिंदुस्थानचा उत्तरेवर प्रभाव

ता. १० एप्रील १९३२

पूर्वेकडील चीन व पश्चिमेकडील रोमचा दीर्घ प्रवास आटोपून आपण आतां हिंदुस्थानात आलो. अशोकच्या मृत्यूनंतर मौर्य साम्राज्य फारकाळ टिकलं नाहीं. थोड्याच अवधींत तें ऱ्हास पावलं. उत्तरेकडील प्रांतांना अवनति येऊन दक्षिणेंत एक नवीन सत्ता—आंध्रराज्य उदयास आलं. मृत्यूपंथाला लागलेल्या मौर्य साम्राज्यावर अशोकच्या वंशजांनीं कसंबसं राज्य केलं; पण शेवटीं पुष्यमित्र नांवाच्या त्यांच्याच ब्राम्हण सेनापतीनं त्यांचं उच्चाटन करून सत्ता बळकावली. पुष्यमित्रानं आपली राजा म्हणून द्वाही फिरविली व त्याच्या कारकीर्दींत ब्राम्हणी धर्माचं पुनरुज्जीवन झालं असं म्हणतात. यावेळीं बौद्धभिक्षूंचाहि कांहींसा छळ झाला असला तरी जसजसा हिंदी इतिहास तूं वाचत जाशील, तसतसं तुला कळून येईल कीं, बौद्धधर्मावरील ब्राम्हणी धर्माचा हल्ला बराचसा कौशल्यपूर्ण असून त्यानं बौध्द भिक्षूंचा जो थोडाफार छळ झाला तो बहुधा राजकीय स्वरूपाचा होता. धार्मिक नव्हे. बौद्धसंघाची प्रबळ अशी संघटना होती. पुष्कळ राज्यकर्त्यांना त्यांची राजकीय दृष्टया दहशत वाटत असल्यामुळें त्यांनीं ते संघ हाणून पाडण्याचे प्रयत्न केलें. शेवटीं बौद्धधर्माचं या देशांतून कायमच उच्चाटन झालं; पण त्याकरितां ब्राम्हणी धर्माला थोडेफार बौध्द-धर्माशीं एकरूप व्हावं लागलं, त्यांतील बऱ्याचशा गोष्टी ग्रहण कराव्या लागल्या व आपल्या घरांत त्याला जागा द्यावी लागली.

हा नवीन ब्राम्हणी धर्म म्हणजे पूर्वीच्या गोष्टींची नवी आवृत्ति किंवा बौद्ध धर्माच्या सर्वच गोष्टींना नकार नव्हता. ब्राम्हणी धर्माचे जुने नेते बरेच हुषार असून, पूर्वीपासून आत्मसात व मिलाफ करण्याची त्यांची पध्दत होती. आर्य लोक हिंदुस्थानांत आले, तेव्हां त्यांनीं द्राविडी लोकांची बरीचशी संस्कृति व चालिरीति उचलल्या. सर्व इतिहास कालांत बुध्दिपुरस्कर वा अजाणतेपणीं ते असंच वागत आले. बौध्दधर्माविषयीं त्यांनीं हेंच केलं व बुध्दाला त्यांनीं हिंदुधर्मातील एक अवतार बनविलं. एका बाजूला बुध्दाची पूजा व आराधना सुरूं झाली तर दुसऱ्या बाजूला बुध्दाचीं तत्वें बाजूला सारून कांहीं क्षुल्लक फरकानं, ब्राम्हणी-धर्म—हिंदुधर्म तसाच राहिला. आपले हे सारे तर्कच करीत आहे. कारण बौध्दधर्माचं हें ब्राम्हणीकरण दीर्घकाल चाललं असून अशोकाच्या मृत्यू-नंतरही बौध्दधर्म हिंदुस्थानांत कित्येक शतकेंपर्यंत टिकला.

मगध राज्यात एकामागून एक झालेले राजे अगर राजवंश यांचा विचार करण्याचं कारण नाहीं. अशोकाच्या मृत्यूनंतर दोनशें वर्षांनीं मगधाचा प्रमुख दर्जा संपुष्टांत आला असला तरीहि तें बौद्ध संस्कृतीचं महान केंद्र समजलं जात असे.

मध्यंतरी उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत महत्वाच्या घडामोडी होत होत्या. उत्तरेकडे मध्य आशियांतील बाक्ट्रीयन्, शक, सिथियन्, तुर्क, कुशन वगैरे टोळ्यांच्या वारंवार स्वाऱ्या होत. मला वाटतं मध्य आशियांत या लोकांच्या टोळ्या कशा उदयास आल्या, इतिहासाच्या निरनिराळ्या काळांत त्या कशा बाहेर पडल्या व सर्व आशिया व यूरोपहि त्यांनीं कसा व्यापला हें मी तुला मागं सांगितलं आहे. इसवीसनापूर्वी दोनशें वर्षं

हिंदुस्थानांवर अशा अनेक स्वाऱ्या झाल्या. पण लक्षांत ठेव कीं, या स्वाऱ्या, केवळ प्रदेश जिंकण्याकरितां व लुटीकरितां नसून, येथें येऊन स्थायिक होण्यांकरितां होत्या. मध्य आशियांतील बहुतेक टोळ्या भटक्या असून जसजशी त्यांची संख्या वाढली, तसतसा आपला प्रदेश त्यांना चरितार्थाच्या दृष्टीनं पुरेना. साहजीकच देशांतर करून त्यांनीं नवीन प्रदेश धुंडाळायला सुरवात केली. आणि या दांडग्या स्थलांतराला सर्वांत प्रबल कारण म्हणजे पाठीमागून आलेला दाब. एखादी मोठी टोळी इतरांना पिटाळून लावी आणि पर्यायानं त्यानां दुसऱ्या देशावर आक्रमण करणं भाग पडे. अशा रीतीनं जे लोक हिंदुस्थानांत आक्रमक म्हणून आले ते बहुधा आपल्या प्रदेशांतून पिटाळले गेलेलें असें असत. इणांच्या कारकीर्दीप्रमाणं, जेव्हां जेव्हां चिनी साम्राज्य प्रबळ असें, तेव्हां तेव्हां ते या भटक्या लोकांनां हांकून देऊन त्यांना नव्या वसाहती शोधण्याची पाळी आणी. —

आणखीहि एक गोष्ट लक्षांत ठेव. या भटक्या टोळ्या हिंदुस्थानाकडे केवळ एक शत्रू–राष्ट्र या नात्यानंच पहात नसत. त्यांचा रानटी म्हणून उल्लेख केला जातो. व तत्कालिन हिंदुस्थानांशीं तुलना करतां ते तितकेसे सुधारलेलें नव्हतें हें निःसंशय. पण त्यांच्यापैकीं बरेचजण कट्टे बौद्धधर्मीय असून आपल्या धर्मांची जन्मभूमि, या दृष्टीनं ते हिंदुस्थानकडे पहात.

खुद्द पुष्यमित्राच्या कालांत वायव्य सरहद्द प्रांतांवर बाक्मीयाच्या मिनन्दरनं एक स्वारी केली. हा मिनन्दर कट्टा बौद्धधर्मीय होता. बाक्मीया हा देश हिंदुस्थानाला लागूनच होता. आरंभी तो सेल्यूकसच्या

साम्राज्यांत मोडत असे. पण पुढें तो स्वतंत्र झाला. मिनंदरची स्वारी परतून लावण्यांत आली पण काबूल व सिंध मात्र त्याच्याकडेच राहिले.

यानंतर शकांच्या स्वाऱ्यांना सुरवात झाली. हे लोक संख्येनं मोठे असून थोड्या फार काळांत त्यांनीं सर्व उत्तर व पश्चिम हिंदुस्थान व्यापला. शक म्हणजे तुर्की लोकांपैकींच एक मोठी टोळी होती. त्यांना त्यांच्या प्रदेशांतून दुसऱ्या एका मोठ्या टोळीनं-कुशानांनीं हुसकून लाविलं. याचा परिणाम म्हणजे शकांनीं बाक्‌त्रिया व पार्थिया व्यापून क्रमशः ते उत्तर हिंदुस्थानांत, विशेषतः पंजाब, राजपुताना व काठेवाडांत स्थायिक झाले. हिंदुस्थाननं त्यांना सुसंस्कृत केलं व त्यांनीं भटकण्याची संवय सोडून दिली.

बाक्‌त्रियन किंवा शक लोक यांच्या आगमनामुळें हिंदी-आर्यसमाज व्यवस्थेला कांहीं बाध आला नाहीं, हें लक्षांत ठेवण्याजोगं आहे. हे राज्यकर्ते बौद्ध धर्मीय असून ते बौद्धधर्मपीठांच्या अनुज्ञेप्रमाणें चालत. आणि या धर्म-पीठांचा पाया तर प्राचिन हिंदी आर्य अशा लोकशाही ग्रामिण वर्गावर उभारीलेला होता. अशारीतीनं या राज्यकर्त्यांच्या अंमलाखालींहि हिंदुस्थान चंबळ्हंशी मध्यवर्ती सत्तेखालील स्वायत्त अशा ग्रामपंचायतींचा किंवा लोकसत्ताकांचा समुच्चय असंच स्वरूप राहिलं. या काळांतहि तक्षशीला व मथुरा ही बौद्ध ज्ञान-विद्येची केंद्र असून तेथें चीन, पश्चिम आशिया वगैरे भागांतून विद्यार्थी येत.

पण वायव्य सरहद्दीकडून वारंवार होणाऱ्या स्वाऱ्या व मौर्य राज्याचा क्रमशः होणारा ऱ्हास यांचा एक परिणाम झाला. दक्षिणेंतील हिंदी राज्यें हींच प्राचीन हिंदी-आर्य पध्दतीची खरी प्रातिनिधीक बनली. सहाजीकच हिंदी आर्य सत्तेचं केंद्र दक्षिणेकडे सरकलं. उत्तरेकडील स्वाऱ्यामुळं अनेक

कर्तबगार व्यक्तींनीही दक्षिणकडे स्थलांतर केलं असावं. पुढें हजार वर्षांनीं मुसलमानांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं याच प्रवृत्तीची पुनरावृत्ति झाल्याचं तुला दिसून येईल. मध्यांही उत्तरेपेक्षां परकीय स्वाऱ्या नि संघर्ष यांची झळ दक्षिणेला किती तरी कमी प्रमाणांत लागल्याचं दिसून येईल. उत्तर हिंदुस्थानांत रहाणारे आपण बहुतेकजण हिंदु व मुसलमान संस्कृति व थोडीशी पाश्चात्यांची चमक अशा मिश्र संस्कृतीत वाढलेलो आहोत. आपली भाषाही—मग तूं तिला हिंदी, उर्दू किंवा हिंदुस्थानी असं कांहीही नांव दे—मिश्र आहे; पण तूं स्वतःच पाहिलं आहेस कीं, दक्षिण हिंदुस्थान प्रामुख्यानें हिंदु व सनातनी आहे. शेंकडों वर्षं, दक्षिणेनं प्राचीन आर्य परंपरेचं संरक्षण करण्याचा व ती जतन करून ठेवण्याचा प्रयत्न केला आहे आणि त्यामुळेंच तेथील समाज कट्टर बनला असून त्यांच्यात कमालीची असहिष्णुता आढळून येते. भिंती या भयंकर सोबती होत. कधीं कधीं बाहेरच्या आरिष्टांपासून त्या आपलं रक्षण करतात व आपल्याला नको असलेल्या आगांतुकाला बाहेर ठेवतात; पण त्याचबरोबर त्या आपल्याला कैदी व गुलाम करतात. भिंतीमुळे पावित्र्य म्हणतात ते व सुरक्षितता लाभत असली तरी त्याकरितां स्वातंत्र्य ही किंमत द्यावी लागते. आणि सर्व भिंतीपेक्षां भयंकर अशा कोणत्या भिंती असतील तर त्या मनांतील. अनिष्ट रुढी केवळ त्या जुन्या आहेत एवढ्याचसाठीं त्या टाकून देण्याचा या मनांतील भिंती प्रतिबंध करतात नि नवीन विचारसरणी केवळ नवीन म्हणून तिचा स्वीकार करूं देत नाहींत.

अर्थात दक्षिण हिंदुस्थाननं हजारों वर्षांपेक्षांही अधिक काळ, धार्मिक दृष्टयाच नव्हे तर कला, राजकीय, शास्त्र वगैरे बाबतींत हिंदी परंपरा जतन

करून एक मोठंच कार्य केलं आहे. तुला जर जुन्या हिंदी कलेचे नमुने पहावयाचे असतील तर दाक्षिण हिंदुस्थानांत जावं लागेल. राजकीय बाबतीत मेगॅस्थिनीज या ग्रीक प्रवाशानं लिहून ठेवलेली माहिती आपणांपुढं आहेच. ' दक्षिणेंतील लोकप्रतिनिधीक सभांचे राजांच्या सत्तेवर नियंत्रण असे ' असं मेगॅस्थिनीज म्हणतो.

मगधाच्या ऱ्हासानंतर विद्वान लोकच नव्हे तर कलावंत, शिल्प-कारागीर व हरहुन्नरी लोकहि दक्षिणेत गेले. यावेळीं दक्षिण हिंदुस्थान व युरोप यांच्यामध्यें बराच व्यापार चाले. मोती, हस्तिदंत, सोनें, तांदूळ, मिरी मिरची, मोर इतकेंच नव्हें, तर माकडेही त्यावेळीं बाबिलोन, इजिप्त, ग्रीस या पुढें रोम वगैरे भागांत निर्यात होत. यापूर्वींपासून मलबारांतील सागवानी लांकूड चाल्डिया व बाबिलोनिया या देशांत रवाना होऊं लागलें होतें. विशेष लक्षांत ठेवण्यांजोगी गोष्ट म्हणजें हा सर्वच किंवा बराचसा व्यापार, द्राविडी लोक हिंदी जहाजांतून करीत. यावरून प्राचीन जगांत दक्षिण हिंदुस्थाननें किती पुढारलेलं स्थान मिळविलं होते, हें तुला कळून येईल. दक्षिण हिंदुस्थानांत कितीतरी रोकड नाणीं सांपडली आहेत. आणि मी तुला पूर्वींच सांगितल्याप्रमाणें मलबारमध्यें अॅलेक्झांड्रियनांच्या व अलेक्झांड्रियामध्यें हिंदी लोकांच्या वसाहती होत्या.

अशोकाच्या मृत्युनंतर लवकरच दक्षिणेंतील आंध्रप्रांत स्वतंत्र झाला. आंध्र म्हणजे सध्यां हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरील व मद्रासच्या उत्तरेकडील—काँग्रेसनं योजिलेला एक प्रांत आहे हें तुला कदाचित् माहीत असेल. आंध्रदेशाची भाषा तेलगू आहे. अशोकानंतर आंध्राची सत्ता

झपाट्यानं वाढत जाऊन शेवटीं त्यांनं अरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंतचा सर्व दक्षिण भाग व्यापला.

पुढे दक्षिण हिंदुस्थानने वसाहतींच्या प्रचंड योजना हातीं घेतल्या, पण त्याविषयीं आपल्याला नंतर बोलायचं आहेच.

वर मी शक, सिथियन प्रभृतींचा उल्लेख केला आहे. हिंदुस्थानवर आक्रमण करणारे हे लोक उत्तर हिंदुस्थानांत स्थायिक झाले. व पुढे हिंदुस्थानांत मिसळून गेले. आपण हिंदुस्थानांतील लोक जितके आर्यांचे वंशज आहोंत, तितकेंच त्यांचेही आहोंत. विशेषतः शूर व उमदे असे रजपूत व काटक असे काठेवाडी लोक त्यांच्याच वंशांतील होत.

३१

# सरहद्दीवरील कुश साम्राज्य

११ एप्रिल १९३२

गेल्या पत्रांत मी हिंदुस्थानावरील शक व तुर्की लोकांच्या स्वाऱ्या-बद्दल सांगितलं. याशिवाय, बंगालच्या उपसागरापासून अरबीसमुद्रापर्यंत पसरलेल्या दक्षिणेंतील बलाढ्य आंध्रराज्याची अभिवृध्दी कशी झाली. हेही दिग्दर्शित केलं. शक लोकांना, कुशांनीं पिटाळून लावलं व पुढें कांहीं काळानंतर कुशच इकडे वळले. इसवीसनापूर्वी पहिल्या शतकांत त्यांनीं हिंदी सरहद्दीवर जें राज्य स्थापलं, त्याला पुढें मोठ्या साम्राज्याचं स्वरूप आलं. या साम्राज्याचा विस्तार, दक्षिणेकडे काशी व विंध्यपर्वतापर्यंत असून, उत्तरेकडे काशगर, यारकंद, खोतान व पश्चिमेकडे इराण व पार्थियाच्या सरहद्दीपर्यंत होता. थोडक्यांत सांगावयाचं म्हणजे, संयुक्त प्रांत पंजाब, काश्मीर आदिकरून सर्व उत्तर हिंदुस्थान व मध्य आशियाचा मोठा भाग या साम्राज्यांत मोडत असे. दक्षिणेंतील आंध्रराज्याच्या समकालीन असं हें साम्राज्य, जवळजवळ ३०० वर्षं टिकलं. कुश राज्याची आरंभीची राजधानी काबुल ही होती, असं दिसतं; पुढें राजधानी पेशावर किंवा तत्कालीन पुरुषपुरा येथें हालविण्यांत येऊन, तेथेंच कायम करण्यांत आली असावी.

कुश साम्राज्य, अनेक दृष्टयां उद्बोधक होतं. हें साम्राज्य बौध्दधर्मीय सून कुश सम्राटांपैकीं कनिष्क हा विख्यांत सम्राट, कट्टा धर्मनिष्ठ होता.

पेशावर जवळील तक्षशिला ही या साम्राज्याची राजधानी बराच काळपर्यंत बौध्द संस्कृतीचे केंद्रस्थान होती. मला वाटतं कुश लोक, मंगोलियन किंवा तत्सम वंशाचे असल्याचं, मी मागें तुला सांगितलं आहे. कुश राजधानीस या मंगोलियन लोकांची सतत येजा चालू असून तेथूनच त्यांनीं बौध्द संस्कृती आपल्या देशांत नेली असावी असं मला वाटतं. बौध्द विचासरणीनं पश्चिम आशियांतही, याच मार्गें प्रवेश केला असावा अशी माझी समजूत आहे. ॲलेक्झांडरच्या काळापासून, पश्चिम आशिया ग्रीकांच्या अंमलाखालीं असून, बऱ्याच ग्रीकांनीं आपल्या संस्कृतीचं लोण तेथें नेलं होतं. या ग्रीक आशियांतील संस्कृतीचा आतां हिंदी बौध्द संस्कृतीशी मिलाफ झाला.

चीन व पश्चिम आशियावर जशी हिंदुस्थानची छाप पडली, तशी त्यांचीही हिंदुस्थानवर पडली. पश्चिमेकडील ग्रीक–रोमनभाग, पुर्वेकडील चिनी व दक्षिणेकडील हिंदी प्रदेश, यांच्या मधील कुश साम्राज्याची स्थिती आशियाच्या पाठीवर पाय सोडून बसलेल्या भव्य पुरुषासारखी होती. हें साम्राज्य म्हणजे हिंदुस्थान व रोम आणि हिंदुस्थान व चीन यांच्यामधील टप्पाच होय.

कुश साम्राज्याच्या या मध्यवर्ती स्थानामुळं, हिंदुस्थान व रोम यांच्यामध्यें निकटवर्ती दळणवळण सुरू होण्यास मदत झाली, हें तुला समजून आलंच असेल. तुलनात्मक दृष्ट्या, ज्यूलिअस सीझरकालीन रोमन प्रजासत्ताकाचा शेवटचा काळ व रोमन साम्राज्याचीं प्रारंभीचीं दोनशे वर्षें यांत व कुश कारकिर्दींत साम्य आहे. असं सांगतात कीं, एका कुश सम्राटानं, ऑगस्टस् सीझरकडे, आपला एक वकील

प्रतिनिधी पाठविला होता. यावेळीं खुष्कीच्या मार्गे तसंच समुद्रमार्गे व्यापार चालू असून, हिंदुस्थानांतून रोमकडे ज्या जिनसा निर्यात होत, त्यांत अत्तरें, मिरी मिरच्या, रेशीम, ताग, मलमल, जरीचे कापड व मौल्यवान रत्नें असत. प्लिनी नांवाच्या एका रोमन लेखकानं, रोमहून हिंदुस्थानकडे जो सुवर्णप्रवाह चालू होता त्याविरुद्ध कडक शब्दांत निषेधही व्यक्त केला होता. त्याच्या मतें, या चैनीच्या जिनसाकरितां रोमन साम्राज्याला वार्षिक दहा कोट सेस्टरेसीस खर्चावे लागत. पौंड—रुपयांच्या भाषेत सांगावयाचं म्हणजे ही रक्कम दहा लाख पौंड किंवा जवळ जवळ दीडकोट रुपये होई.

या आमदानींत बौद्ध मठांत किंवा संघाच्या बैठकींत मोठा वाद विवाद अगर चर्चा होई. दक्षिणेकडून व पश्चिमेकडून, नवीन विचारसरणीची किंवा नव्या पेहरावातील जुन्याच विचारसरणीची जी लाट येऊं लागली होती तिचा आघात बौद्ध धर्मातील साधेपणावर होऊं लागला होता. याचे पर्यवसान म्हणजे बौद्ध धर्मात महायान, ( मोठे वहान ) व हिनयान ( छोटें वहान ) असे दोन पंथ निर्माण झाले. आणि नवीन मतें व कल्पना यामुळें धर्म व जीवनाकडे पाहाण्याचा त्यांना दृष्टीकोन जसा बदलला, तशी कला, शिल्प वगैरेची प्रकट स्वरुपेंही बदलून गेलीं. हे बदल कसे घडून आले, हें सांगणं सोपं नाहीं. कदाचित, बौद्ध धर्माच्या प्रवाहाला निराळं वळण लावायला, ब्राह्मणी व ग्रीक या दोन प्रमुख प्रवृत्त्या कारणीभूत झाल्या असाव्यात.

मी तुला अनेक वेळां सांगीतलेंच आहे कीं, बौद्ध धर्म म्हणजे जाति पद्धती, भिक्षुकशाही व पशुयज्ञ या विरुद्ध बंड होतं. गौतमाला मूर्तिपूजा

मान्य नव्हती. आपण कोणी पूजनीय असे देव आहोंत, असं त्यानं कधींच सांगितलं नाहीं. तो ज्ञानदृष्टी प्राप्त झालेला 'बुद्ध' होता. त्यावेळीं बुध्दाच्या प्रतिमा तयार करण्यांत आल्या नव्हत्या व तत्कालीन शिल्पकलेंत मूर्तींना स्थान नव्हतं .पण, ब्राह्मण वर्गाला हिंदु धर्म व बौद्ध धर्म यामध्यें पडलेलं खिंडार भरून काढायचं असून, बौध्य विचारसरणींत हिंदू कल्पना व प्रतिकें अंतर्भूत करण्याविषयीं त्याची सारखी धडपड चालूं होती. या शिवाय ग्रीक-रोमन भागांतील कारागिरही देवांच्या मूर्ति करण्यांत सरावलेले होते. साहाजिकच, बौध्द धर्मांत प्रतिमांचा प्रवेश झाला. प्रारंभीं, बुध्दाच्या मूर्ति ऐवजी बोधी-सत्वांच्या मूर्ति घडविण्यांत आल्या. बौध्द परंपरेप्रमाणें, बोधी-सत्व ह्मणजे बुध्दाच्या पूर्वींचे अवतार. ही प्रथा चालूं राहून शेवटीं खुद्द बुध्दाच्या मूर्ति घडविण्यांत आल्या; त्याची पूजा केली जाऊं लागली.

बौध्द धर्मांतील महायान पंथाला हे बदल मान्य असून वैचारीक दृष्टया, तो ब्राह्मणी धर्माला जवळचा होता. कुश सम्राटांनीं बौध्दधर्मापैकीं महायान पंथाचा स्वीकार करून त्याच्या प्रसारालाहि सहाय्य केलं. याचा अर्थ ते हिनायानपंथ किंवा इतर धर्मांच्या बाबतींत असहिष्णु होते असा नव्हे. कनिष्कानं झोरोऑस्ट्रीयन धर्मालाहि उत्तेजन दिलं होतं, असं म्हणतात.

त्याकाळीं, विद्वान लोकांमध्यें, महायान व हिनायान पंथांतील गुणदोषांसंबंधीं जे कडाक्याचे वादविवाद होत, ते वाचनीय आहेत. वादविवादाकरितां संघाच्या प्रचंड बैठकी भरत. खुद्द कनिष्कानंहि, संघाची एक सर्वसाधारण सभा काश्मीरमध्यें भरविली होती. पुढें कित्येक

शतकापर्यंत हा वादविवाद व झगडा चालू होता. महायान पंथ उत्तरेकडे व हिनयन पंथ दक्षिणेकडे फोंफावला. महायान पंथ सध्यां, चीन, जपान व तिबेट या देशांत प्रचलित असून हिनयन सिलोन व ब्रह्मदेशांत आहे. हिंदुस्थानांपुरतें हे दोन्ही पंथ हिंदुधर्मांतच विलीन झाले.

माणसाच्या मनाचं हुबेहूब प्रतिबिंब ह्मणजेच कला. जसजसा आरंभींच्या बौध्द तत्वज्ञानांचा साधेपणा जाऊन, त्या ठिकाणीं बारीक बारीक बाबतींतही कल्पनाना मूर्त स्वरूप देण्याचं प्रस्त वाढलं तसतसं हिंदी कलेलाहि बारकाव्यांच आणि कलाकुसरीचं स्वरूप आलं. विशेषतः वायव्येकडील गांधार देशांतील महायान वास्तुकलेंत पुतळे व कलाकुसरी याना अधीक प्राधान्य देण्यांत आलं होतं. हिनयन शिल्पकलेलाहि या नवीन स्वरूपासून सर्वस्वीं अलिप्त राहतां आलं नाहीं. तिचा साधेपणा नि संयम नाहींसा होऊन, त्या जागीं मनोहर कलाकुसर व प्रतीकें आलीं.

या काळचीं थोडीं फार स्मृतिचिन्हें अद्यापहि पहावयास सांपडतात. सर्वांत प्रेक्षणीय ह्मणजे अजंठा येथील कोरीव लेणीं हीं होत.

आपण आतां कुशांचा निरोप घेऊं. लक्षांत ठेव कीं, शक व इतर तुर्की लोकांप्रमाणें, जितराष्ट्रांवर जेते ह्मणून राज्य करणारे आपण कोणी परकीय आहोत अशी कुशांची मुळींच भावना नव्हती. हिंदुस्थान व हिंदवासियांशीं ते धर्मरज्जूनें बांधले गेले होतें. याशिवाय, हिंदुस्थानांतील आर्य लोकांची अनुशासन तत्वेंही त्यांनीं स्वीकारली होती आणि बऱ्याच प्रमाणांत, आर्य पध्दतीशीं त्यांचं जुळत होतं. ह्मणूनच उत्तर हिंदुस्थानवर त्यांना जवळ जवळ ३०० वर्षे राज्य करतां आलं.

३२

# जीजस व ख्रिस्तीधर्म

१२ एप्रिल १९३२

हिंदुस्थानच्या वायव्येकडील कुश साम्राज्य व चीन मधील हन् घराणं यामुळें इतिहासांतील एक महत्वाचा टप्पा ओलांडून आपण अलिकडे आलों आहोंत. आपल्याला हा टप्पा परत जाऊन पाहिला पाहिजे. आतांपर्यंत आपण खिस्तपूर्व काळाचा विचार करीत होतो. आतां आपण खिस्त काळांत, इसवीसनांत प्रवेश केला आहे. नांवावरून वाटवं त्या प्रमाणें खिस्तापासून किंवा खिस्ताच्या अनुमानित जन्म दिवसापासून या सनावळीला प्रारंभ झाला. पण वस्तुस्थितीवरून या सनावळी पूर्वी खिस्त, चार वर्षे अगोदर जन्मला असावा, असं दिसतं. अर्थात हा महत्वाचा मुद्दा नव्हे. खिस्तानंतरच्या काळाला, खिस्त काळांत (Anno Domini) असं म्हणण्याची प्रथा आहे. ही सार्वत्रिक प्रथा स्वीकारण्यांत तोटा नसला तरी, माझ्या दृष्टीनं खिस्तानंतर असं म्हणणं अधिक शास्त्रशुध्द ठरेल. कारण आतांपर्यंत आपण खिस्त-पूर्वकाळांत (इसवीसनापूर्वी) असं म्हणत आलों आहोंत. माझा स्वतःचा दुसरी पध्दत अवलंबिण्याचा विचार आहे.

खिस्ताची किंवा जीजसची कथा बायबलच्या नव्या करारांत दिली असून, ती तुला माहितच आहे. खिस्तसूत्रांमध्यें दिलेल्या हकिगतीं वरून त्याच्या तारुण्यांतील जीवनाबद्दल फार थोडं वाचावयास मिळतं. जन्म नझरेथ येथें

झाला, गॅलिली येथें त्यानं उपदेशाला सुरवात केली व तिथीं उलटल्यावर तो जेरुसलेम येथें आला. लवकरच त्याची पॉन्टीयस पायलेट या रोमन गव्हर्नरापुढें चौकशी होऊन, त्याला शिक्षा ठोठावण्यांत आली. जीजसनं केलं काय व उपदेशास प्रारंभ करण्यापूर्वी त्यानं कुठं संचार केला, हें स्पष्ट-पणें विदित केलेलं नाहीं. सर्व मध्य आशिया, काश्मिर, लडाख व तिबेट-मध्यें असा दाट समज आहे कीं, जीजस किंवा इसानं, त्या भागांत प्रवास केला. तो हिंदुस्थानांत येऊन गेला, असंहि कांहीं लोकांना वाटतं. खात्रीनं असं कांहींच सांगता येत नाहीं. ज्या तज्ञांनीं, जीजसचं चरित्र अभ्यासिलं आहे, त्यांना मुळीं, तो हिंदुस्थान व मध्यआशियांत आला होता हें पटत नाहीं. मात्र जीजसचं असं येणं असंभवनीय नव्हतं. त्या काळीं हिंदुस्थानांतील विशेषतः वायव्य प्रांतातील तक्षशीला विद्यापीठाकडे, दूर-दूरचे विद्यार्थी आकर्षिले जात व ज्ञानशोधार्थ, जीजसही तेथें येणं शक्य होतं. पुष्कळ बाबतींत, जीजसच्या शिकवणुकीचं गौतमाशी इतकं साम्य आहे कीं, जीजसला ती ज्ञात असणं अगदीं संभवनीय वाटतं. पण त्या बरोबर ही गोष्ट तितकीच खरी कीं, बौध्दधर्म त्या काळीं इतर देशांतून पुरेसा पसरलेला असल्यामुळें, जीजसला हिंदुस्थनांत न येतांही बौध्द शिकवणूक चांगली कळूं शकली असती.

शाळेंतील प्रत्येक मुलाला, धर्मामुळें झगडे व तीव्र कलह कसे उद्भवतात हें माहीत असतं. पण जगांतील धर्मांचा आरंभ कसा झाला, हें पहाणं व त्यांची तुलना करणं मोठं उद्बोधक आहे. निरनिराळ्या धर्मांच्या दृष्टीकोनांत नि शिकवणुकीत इतकं साम्य असतां तपशील व क्षुल्लक गोष्टीसाठीं, लोक एकमेकांची डोकीं फोडण्याचा मूर्खपणा कां करतात,

याचं आश्चर्य वाटतं. याचं कारण मूळ शिकवणुकींनंतर बऱ्याच गोष्टी घुसडल्या जाऊन, त्याला बेमालूम असं विकृत स्वरूप दिलं जातं नि धर्म प्रवर्तकांच्या जागीं क्षुद्र मताचे नि असहिष्णूवृत्तीचे मायेफिरु येतात हेंच होय. बरेच वेळां, धर्माचा राजकारण व साम्राज्यशाहीचा हस्तक म्हणूनहि उपयोग केला जातो. "स्वतःच्या फायद्याकरितां अगर जनतेला लुबाडण्याकरितां, त्यांच्यांत अंधश्रध्दा निर्माण करावयाची," असं रोमन राज्यकर्त्यांचं धोरण असे. लोक जितके धर्मभोळे, तितकी त्यांची मुस्कटदाबी करणं सोपं. रोमन उमराववर्ग तत्वज्ञानांत लुडबुड करी; पण जी गोष्ट त्यांना हितप्रद, ती गोष्ट जनतेला हितप्रद किंवा योग्य समजली जात नसे. पुढें बऱ्याच कालानंतर मॅचिआव्हेली नांवाचा एक प्रसिध्द पुरुष होऊन गेला. आपल्या एका राजकारण विषयक ग्रंथांत त्यानं धर्म ही सरकारला एक आवश्यक बाब असून, प्रत्येक राज्यकर्त्यानं, आपल्याला जो धर्म सत्यावर,आधारलेला नसेल,अशालाच उत्तेजन द्यावं, असं प्रतिपादिलें आहे. अगदीं अलिकडेही, धर्माच्या आवरणाखालीं, साम्राज्यशाही पुढें कशी सरकते याची असंख्य उदाहरणें देतां येतील. अशा स्थितींत कार्लमार्क्सनं "धर्म म्हणजे अफूची गोळी आहे" असे उद्गार काढावेत, यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

जीजस हा ज्यू होता. ज्यू लोक मोठे चिर्काटीचे लोक आहेत. डेव्हीड व सालोमन यांच्या अंमदानींतील अल्प भरभराटीचा काळ सोडला तर, त्यांच्या पाठीमागे दुर्दशा हात धुवून लागल्याचं दिसतं. शिवाय वर उल्लेखिलेली भरभराटहि अल्प प्रमाणांतच असून, केवळ ज्यू लोकांनीं तिला कल्पनेनं अवास्तव स्वरुप दिलं. या काळाला ते सुवर्ण युग

म्हणतात. हें सुवर्ण युग पुन्हां ठरल्या वेळेला येणार असून, त्यावेळीं आपण पुन्हां वैभवशाली व बलाढ्य होऊं, असं त्यांना वाटतं. ज्यू लोक सर्व रोमन साम्राज्य व इतरत्रहि पसरले, पण त्यांची एक जूट कायम असून, आपला भाग्याचा दिवस उगवणार व त्याकरितां एक प्रेषित अवतरणार ही त्यांची श्रध्दा कायमच होती. ना घरदार ना आसरा, नशीब हात धुवून पाठीमागें लागलेलं व असह्य छळ होऊन पुष्कळ वेळां प्राणांतिक तडाखे बसलेले—अशा स्थितींतही गेलीं २००० वर्षें त्यांनीं आपलं वैशिष्ट्य व एकजूट कायम राखली, हें इतिहासांतील एक मोठंच आश्चर्य !

ज्यू लोक प्रेषिताकडे डोळे लावून बसलेले होते व त्यांना जिजसबद्दल आशाहि वाटत असावी. पण लवकरच त्यांच्या आशेवर पाणी पडलं. प्रचलीत परिस्थिती व सामाजिक व्यवस्था याविरुध्द बंड करण्याची त्यांना अपरिचीत अशी भाषा जीजस बोलूं लागला. विशेषत: धर्माला ज्यांनीं व्रतें नि समारंभ यांचं स्वरुप दिलं होतं, अशा धनिक व त्याच प्रमाणें ढोंगी लोकांविरुध्द त्याचा कटाक्ष असे. लोकांना संपत्ति व वैभव यांची लालूच दाखविण्याचं दूरच राहो, पण, काल्पनिक स्वर्गीय राज्यासाठीं जवळ होतं नव्हतं त्या सर्वांचा त्याग करण्याचा तो आदेश देई. जीजस आपलं म्हणणं कथा, दृष्टांतरूपानं सांगे; पण एक गोष्ट मात्र स्पष्ट आहे कीं, तो जन्मजात बंडखोर होता; प्रचलित परिस्थिती त्याला मान्य नसून, वींत परिवर्तन घडवून आणण्याकरितां तो बाहेर पडला होता. ज्यू लोकांना अर्थात हें नको होतं. जीजसवर उलटून, त्यांनीं त्याला रोमन सत्ताधाऱ्यांच्या स्वाधीन केलं.



तसं पाहिलं असतां, धार्मिक दृष्ट्या रोमन लोक असहिष्णू नव्हते. त्यांच्या साम्राज्यांत सर्व धर्मांचे लोक असून, एखाद्यानं ईश्वराची निंदा केली, देवादिकांना शिव्याशाप दिले, तरी त्याला शिक्षा होत नसे. टिबेरियस नावाच्या एका रोमन बादशहानं तर, "देवादिकांचा अपमान होत असेल तर तो त्यांचा त्यांनीं पाहून घ्यावा" असे उद्गार काढले होते. जीजसला, पॉन्टीयस पायलेट नांवाच्या ज्या रोमन गव्हर्नरपुढे उभं करण्यांत आलं होतं त्याचीहि सदर प्रश्नाकडे पहाण्याची दृष्टी धार्मिक नसावी. रोमन लोकांच्या मतें जीजस हा राजकीय चळवळ्या होता, तर ज्यू लोकांना तो सामाजिक बंडखोर वाटत होता; आणि यांच दृष्टीनं, त्याची चौकशी होऊन त्याला शिक्षा ठोठावण्यांत आली, नि शेवटीं गोलगोथा येथें क्रूसावर चढविण्यांत आलं. या संकटप्रसंगीं, त्याच्या पट्टशिष्यांनींहि त्याला सोडून देऊन त्याचा इनकार केला. आणि त्यांच्या या द्रोहामुळें, जीजसला आपलं संकट जवळ जवळ असह्य झालं, इतकें कीं, मृत्यूपूर्वी त्यानं असे हृदयद्रावक उद्गार काढले, "देवा, देवा, कां रे तूं मला विसरलास?"

मृत्यूसमयीं जीजस अगदीं तरुण असून, त्याचं वय तिशीपेक्षां थोडं जास्त असावं. ख्रिस्तसूत्रांमधील त्याच्या मृत्यूचं हृदयविदारक वर्णन वाचून आपण द्रवून जातो. जीजसच्या शिकवणुकीप्रमाणं फार थोडे लोक वागत असले तरी पुढील काळांत, ख्रिश्चन धर्माचा जो प्रसार झाला, त्यामुळें लाखों लोक, त्याचं नांव आदरानं घेऊं लागले. पण हें लक्षांत ठेविलं पाहिजे कीं, ज्यावेळीं त्याला क्रूसावर चढविण्यांत आलं, त्यावेळीं, पॅलेस्टाईन बाहेर तो

फारसा ज्ञात नव्हता. रोममधील लोकांना त्याची कांहींच माहिती नव्हती व खुद्द पॉन्टीयस पायलेटनंही, सदर प्रसंगाला फारसं महत्व दिलं नसेल.

जीजसच्या निकटच्या अनुयायांनीं व शिष्यांनीं भीतीमुळं त्याचा इनकार केला; पण त्याच्या मृत्यूनंतर, पॉल नांवाच्या एका अज्ञात इसमानं स्वसमजूतीप्रमाणं ख्रिश्चन तत्त्वांच्या प्रसाराला सुरवात केली. विशेष गोष्ट म्हणजे त्यानं जीजसला कधींहि पाहिलं नव्हतं. पुष्कळ लोकांचं असं मत आहे कीं, पॉलनं उपदेशिलेला ख्रिश्चनधर्म जीजसच्या शिकवणूकीपेक्षां फारच निराळा आहे. पॉल कर्तबगार व विद्वान असला तरी जीजसप्रमाणं तो सामाजिक बंडखोर नव्हता. अशाही स्थितींत पॉलला यश येऊन ख्रिश्चन धर्माचा हळुंहळू प्रसार होत गेला. आरंभीं, रोमन लोकांनीं या धर्माची फारशी पर्वा केली नाहीं. ख्रिश्चन म्हणजे ज्यू पैकींच एक पंथ असावा, ही त्यांची कल्पना. पण पुढें ख्रिश्चन धर्म प्रखर बनला, ख्रिश्चन लोक इतर सर्व धर्मांचे विरोधक असून, खुद्द बादशहाच्या प्रतिमेची सुद्धां पूजा करण्याचं त्यांनीं नाकारलं. रोमन लोकांना हा काय प्रकार आहे, हें न कळून तिच्या मागें त्यांना संकुचित मनोवृत्ती दिसूं लागली. ख्रिश्चन लोक म्हणजे कोणी माथेफिरु, भांडखोर व मानवी प्रगतीच्या आड येणारे असंस्कृत लोक, अशी त्यांची समजुत झाली. धर्म या दृष्टीनं त्यांना ख्रिश्चन धर्म सहनहि केला असतां; पण बादशहाच्या प्रतिमेविषयीं आदर न दाखविण्यांची ख्रिश्चनांची वृत्ति त्यांना राजद्रोही वाटून, त्यांना देहांत शासनाची शिक्षा ठोठावण्यांत आली. या शिवाय, ख्रिश्चन लोक द्वंद्वयुध्दासारख्या खेळांवर कडक टीका करीत. याचा परिणाम म्हणजे

ख्रिश्चनांचा छळवाद सुरू होऊन, त्यांची मालमत्ता जप्त करण्यांत आली व कैक ख्रिश्चनांना शिक्षा म्हणून सिंहापुढें फेंकण्यांत आले. तू या ख्रिश्चन हुतात्म्यांच्या गोष्टी वाचल्या असशील व त्या संबंधींचे कांहीं चित्रपटहि पाहिले असशील. पण एकदां मनुष्य ध्येयाकरितां बलिदान करण्यास तयार झाला, नव्हे तशा प्रकारच्या मृत्यूंत तो भूषण मानू लागला तर त्याला किंवा त्याच्या ध्येयाला गाडणं अशक्य होतं. ख्रिश्चनांच्या बाबतींत, रोमन साम्राज्याला हाच अनुभव आला. या झगड्यांत शेवटीं ख्रिश्चनांचा विजय झाला. एवढंच नव्हे तर, ख्रिस्तानंतर चवथ्या शतकाच्या आरंभीं, खुद्द एका रोमन बादशाहानंच ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला व ख्रिश्चन धर्माला साम्राज्याच्या अधिकृत धर्माचं स्थान मिळालं. हा बादशाहा म्हणजे, कॉन्स्टन्टाईन. यानंच कॉन्स्टॅन्टीनोपल शहर वसविलं. त्याच्याकडे आपण नंतर येऊं.

ख्रिश्चन धर्माच्या अभिवृद्धीबरोबरच, जीजसच्या दैवीपणाबद्दल कडाक्याचा वाद सुरू झाला. खुद्द गौतमबुद्धानं, आपणांत दैवीपणा नाहीं असं सांगितलं तरी त्याची देवावतार म्हणून पुढें पूजा केली जाऊं लागली, हें मी मागें सांगितल्याच तुला आठवतच असेल. बुद्धाप्रमाणें, जीजसहि आपल्याला अवतार समजत नव्हता. जीजसनं, आपण ईश्वरपुत्र व मानव पुत्र आहोंत, असं वरचेवर सांगितलं आहे. याचा अर्थ तो स्वतःला दैवी अवतार किंवा अतिमानुष समजे असा नव्हे; पण माणसांना आपल्यांतील थोर व्यक्तींना देव बनविणं आवडतं आणि एकदां त्यांनीं अशारितीनं देवपण चिकटविलं कीं, त्यांची तत्वंहि गुंडाळून ठेवण्यांत येतात. सहाशें वर्षांनंतर महंमद पैगंबरानं आणखी एका महान धर्माची सुरवात केली.

पूर्वीच्या अनुभवानं शहाणा होऊनच कीं काय पुन्हां पुन्हां व स्पष्ट रितीनं त्यानं सांगितलं कीं, " मी मानव आहे, देव नाहीं. "

जीजसचीं तत्वें समजावून घेऊन, तीं आचरणांत आणण्याऐवजीं खिश्चन लोकांत, जीजसच्या दैवीपणाचं स्वरूप व त्रैमूर्ति, यावरच वाद विवाद माजला नि झगडे सुरू झाले. एकमेकांवर पाखंडीपणाचा आरोप करण्यांत येऊं लागला. जुलूम व डोकेफोड सर्रास सुरू झालीं. एकेकाळीं नुसत्या एका जोडाक्षरावरच, खिश्चन धर्मांतील निरनिराळ्या पंथात, मोठा नि कडाक्याचा वाद माजून राहिला होता. प्रार्थनेंत, Homo-ousion हा शब्द असावा, असं एका पक्षाचं म्हणणं, तर दुसरा पक्ष Homoi-ousion या शब्दाबद्दल हट्ट धरून बसला. दोन्ही शब्दांमधील हा फरक जीजसच्या दैवीपणाला उद्देशून होता. पुढें या जोडाक्षरापायीं भीषण युध्द होऊन, कित्येक लोक मारले गेले.

एकीकडे चर्चची सत्ता वाढत होती तर दुसरीकडे या अंतर्गत भांडणांना ऊत आला होता. पाश्चिमात्य देशांत अगदीं अलिकडच्या काळापर्यंत, निरनिराळ्या खिश्चन पंथातील हीं भांडणं चालूंच होती.

ज्या काळांत, खिश्चन धर्माबद्दल रोममध्यें तिरस्काराची भावना वसत असून, तेथें तो एक बहिष्कृत पंथ ठरला होता, त्याच वेळीं, किंवा त्याचा इंग्लंड—पश्चिमयुरोपात प्रसार होण्यापूर्वीं कितीतरी अगोदर या धर्मानं हिंदुस्थानांत प्रवेश केल्याचं ऐकून खात्रीनं तुला आश्चर्य वाटेल. जीजसच्या मृत्यूनंतर १०० वर्षांच्या आंतबाहेरच, खिश्चन मिशनरी, दक्षिण हिंदुस्थानांत, समुद्रमार्गे आले. त्यांचं येथें मोठ्या आदरानं स्वागत करण्यांत येऊन, त्यांना आपला धर्म उपदेशिण्याची मुभा देण्यांत

आली. या मिशनऱ्यांनीं पुष्कळ लोकांना ख्रिश्चन धर्माची दिक्षा दिली. त्यांचे वंशज बदलत्या परिस्थितीला तोंड देत, अद्यापहि येथें वास्तव्य करून आहेत. यापैकीं बहुतेक लोक जुन्या ख्रिश्चन पंथाचे असून, हे पंथ सध्यां युरोपांत अस्तित्वांत नाहींत. कांहींचें मूळ ठिकाण आशियामायनॉरमध्यें आहे.

राजकीय दृष्ट्यां ख्रिश्चनधर्म आजचा प्रधानधर्म आहे. त्याचं कारण तो युरोपांतील प्रबळ लोकांचा धर्म आहे. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, या धर्माचा आद्य प्रवर्तक जीजस हा अहिंसेचा पुरस्कर्ता असून, त्यानं प्रचलित समाजपध्दतीविरुध्द बंड पुकारलं होतं. त्याचेंच बोलभांड अनुयायी आज साम्राज्यशाही, शस्त्रास्त्रवाद, युध्दं व संपत्तीची आराधना यातच गुरफटलेले आहेत. ख्रिस्ताचा उपदेश व आजचा युरोप–अमेरिकेंतील ख्रिश्चन धर्म यांत किती आश्चर्यकारक भेद हा ! अशा स्थितींत,स्वतःला ख्रिस्ताचे अनुयायी म्हणवून घेणाऱ्यापेक्षां गांधीजी, हे ख्रिस्ताला अधिक जवळचे आहेत असं अनेकांना वाटावं, यांत आश्चर्य तें काय !

# ३३

# रोमन् साम्राज्य

२३ एप्रिल १९३२

फार दिवस झाले, मी तुला कांहींच लिहिलें नाहीं. अलाहाबादकडच्या-विशेषतः तुझ्या आजीसंबंधाच्या वार्तेनं माझं मन राग, अभिमान वगैरे विरोधी मनोविकारांनीं भरुन गेलं आहे. माझ्या वृध्द व जर्जर आईवर काठीमार होत असतां, मी मात्र तुरुंगांतील, साधारणतः सुखासीन जीवन कंठीत असावं याची मला थोडी लाज वाटते. पण......विचारांना मोकाट सोडून, मी माझ्या कथासूत्रांत व्यत्यय येऊं देतां कामा नये.

आपण रोमकडे—किंवा जुन्या संस्कृत ग्रंथांतून म्हटल्या प्रमाणें, रोमककडे परत वळूं. रोमन प्रजासत्ताकाचा शेवट होऊन, रोमन साम्राज्य कसं अस्तित्वांत आलं, याचा आपण उहापोह केल्याचं, तुला आठवतच असेल. ज्युलियस् सीझरचा दत्तक पुत्र ऑक्टेव्हियन हा ऑगस्टस सीझर हें नांव धारण करुन, पहिला अधिपती झाला. तो आपल्याला राजा म्हणवीत नसे. याचं एक कारण म्हणजे, तें पद त्याच्या दृष्टीनं फारसं मानाचं नव्हतं व दुसरं कारण म्हणजे त्याला प्रजासत्ताकाचं दिखावू स्वरूप राखायचं होतं. म्हणून त्यानं Emperator (बादशहा) हें नवीन पद धारण केलं. हें पद सर्वांत मानाचं समजलं जातं. तुला कदाचित माहित असेल कीं, इंग्लिशमधील Emperor ( सम्राट ) हा शब्द Emperator या शब्दावरुनच आला. अशारितीनं ज्याकीं

जगांतील राज्यकर्ते धडपडले व ज्याचा बहुतेक सर्वांनीं उपयोग केला, असे दोन, एम्परर व सिझर किंवा कायसर किंवा झार. रोममधील प्रारंभींच्या साम्राज्यानं प्रचारांत आणले. प्रारंभीं एकाच वेळीं सर्व जगावर सत्ता गाजविणारा एकच सम्राट असतो, अशी समजूत होती. रोमला जगाची सम्राज्ञी म्हणत व पश्चिमेकडील लोकांची अशी कल्पना होती कीं, रोमनं साऱ्या जगाला झाकून टाकलं आहे. ही कल्पना अर्थात चूक असून, तीमुळें त्यांच्या इतिहास–भूगोलाच्या अज्ञानाच मात्र प्रदर्शन झालं. रोमन-साम्राज्य हें बव्हंशीं, भूमध्य प्रदेशीय साम्राज्य असून, पूर्वेकडे, त्याचा कधींच विस्तार होऊं शकला नाहीं. याच काळांत, रोमन साम्राज्यापेक्षां मोठीं व अधिक सुधारलेलीं राज्यें चीन व हिंदुस्थानांत झालीं. अर्थात, पाश्चिमात्य जगाच्या दृष्टीनं विचार केल्यास रोमचं असं एकच एक साम्राज्य त्याकाळीं असल्यामुळें, तिकडील लोकांना, तें जागतिक साम्राज्यच वाटे. या साम्राज्याचा दराराहि मोठा होता.

रोमच्या बाबतींत अत्यंत अपूर्व गोष्ट म्हणजे, त्या मागें असलेली जागतिक वर्चस्वाची व स्वामित्वाची कल्पना. रोम गडगडलं, तेव्हांहि याच कल्पनेच्या जोरावर तें तरलं व त्याच्यांत जोम राहिला आणि दुसरी गोष्ट म्हणजे या कल्पनेचं रोममधून उच्चाटन झालं तरी, इतरत्र ती अस्तित्वांत होती. खुद्द रोमनसाम्राज्य रसातळाला जाऊन पिशाच्च बनलं; पण वरील कल्पना मात्र कायम राहिली!

रोम व तेथील वारसदार या विषयीं लिहितांना मला थोडं जड जात आहे. तुला काय सांगायचं तें वेंचून काढणं व त्यांनीं निवड करणं हें सोपं नाहीं रोमविषयीं मी वाचलेलीं पुस्तकें जुनीं असून, ती बव्हंशी

तुरुंगांत वाचली आहेत. या मुळें माझं मन म्हणजे, या पुस्तकांतून पैदा केलेल्या विकृत चित्रांचा गोंधळखानाच झाला आहे. तसं पाहिलं तर, मी तुरुंगांत आलो नसतो, तर रोमन इतिहासावरील एक विख्यात ग्रंथ मला वाचावयालाही मिळाला नसतां. हा ग्रंथ इतका दांडगा आहे कीं, अनेक व्यापांतून सवड काढून, तो शेवटपर्यंत वाचणंही कठीण. या ग्रंथाचं नांव "दि डिक्लाइन् अँड फॉल ऑफ दि रोमन एम्पायर" असं असून तो गिबन या इंग्लिश गृहस्थानं लिहिला आहे. १५०० वर्षांपूर्वी स्वीत्सर्लंडमधील लाक लेमनच्या किनाऱ्यावर हा ग्रंथ लिहिला गेला. हा ग्रंथ बराच जुना असला तरी आजही या ग्रंथाची मोहिनी कायम आहे. ग्रंथाची भाषा आलंकारिक पण मधुर असून, एकाद्या कादंबरीपेक्षांहि त्यांत अधिक मन रमतं. सुमारें दहा वर्षांपूर्वीं, मी तो लखनौच्या तुरुंगांत वाचला. एक महिनाभर मी गिबनच्या सहवासांत असून, त्याच्या शब्द-सृष्टींतून निर्माण झालेल्या गतकालीन प्रतिमांमध्यें गुरफटून गेलो होतों. पण, हा ग्रंथ पुरा होण्यापूर्वीं, अकस्मात माझी सुटका झाली. रम्यतेचा दुवा तुटला व प्राचीन रोम कॉन्स्टॅन्टीनोपलकडे परत जाऊन, राहिलेलीं शंभर पानें पुरी करायला वेळ काढणं अगर ती मनःस्थिती आणणं कठीण पडलं.

वरील गोष्ट सुमारें दहा वर्षांपूर्वींची. त्यावेळीं मी जें कांहीं वाचलं, त्यावलं बरंचसं विसरूनही गेलो आहे. तरी पण, अद्यापहि माझ्या स्मरणांत त्यांतील खूपसं असून, त्यामुळें गोंधळ उडाला आहे. हा गोंधळ तुझ्यापुढें उभा करण्याची माझी इच्छा नाहीं.

असो! प्रथम आपण निरनिराळ्या काळांतील रोमन साम्राज्य अगर साम्रज्यें, याकडे नजर फेकूं. नंतर आपल्याला या चित्राची रूपरेषा काढतां येईल.

रोमन साम्राज्याला, इसवी सनाच्या सुमारास, ऑगस्टस सीझर–पासून सुरवात झाली. थोडा काळपर्यंत, बादशहा सिनेटला मानत असत; पण लवकरच रोमन प्रजासत्ताकाचे शेवटचे तंतू नाहींसे होऊन, बादशहा सर्व सत्ताधारी व एकतंत्री राज्यकर्ते—जवळ जवळ प्रतिपरमेश्वरच—बनले. त्यांच्या हयातींत त्यांची देवकोटींत गणना होई, नि मृत्यूनंतर देव म्हणून पूजा केली जाई. त्यावेळच्या बहुतेक सर्व लेखाकांनीं आरंभींच्या रोमन बादशहांना, विशेषतः ऑगस्टसला, एकुनएक सद्‌गुण चिकटविले आहेत. या काळाला ते सुवर्ण युग किंवा ऑगस्टसचें युग म्हणत. त्यांच्या मतें या वेळीं प्रत्येक सद्‌गुणाचा प्रकर्ष झाला होता. गुणी जनांचा योग्य परामर्ष घेतला जाऊन, दुष्टांना शासन होई. एकतंत्री राजवटींतील लेखकांची ही रीतच असते. कारण स्तुतीबद्दल त्यांना मोबदला मिळतो. ज्यांची पुस्तकें आम्हांला शाळेंत वाचावी लागलीं, अशा सुप्रसिद्ध लेखकांपैकीं, व्हर्जिल, ओव्हिड, होरॅस हे याच सुमारास होऊन गेले. प्रजासत्ताकाच्या शेवटच्या कालांतील यादव्या नि बेदिली यानंतर, एकतंत्री सत्तेखालीं कां होईना, जो शांततेचा काळ आला तो त्यांना मोठाच स्वागतार्ह वाटणं स्वाभाविक होतं. यावेळीं व्यापार वाढून, सुधारणेचीहि थोडी फार अभिवृद्धी झाली.

पण ही सुधारणा म्हणजे काय चीज होती ! ही सुधारणा फक्त श्रीमंत लोकांचीच—शिवाय हे श्रीमंत लोक प्राचीन ग्रीकांप्रमाणे कलोपासक किंवा तीक्ष्ण बुद्धीचे नसून, साधारण प्रतीचे व मध्यम होते. मजा करणं,

हें त्यांचं मुख्य ध्येय असें. जगाच्या सर्व भागांतून, अन्नसामुग्री व चैनीचे जिन्नस येत आणि जिकडे तिकडे बडेजाव व अवडंबर दिसून येई. आजही अशा लोकांचा वर्ग नामशेष झालेला नाहीं. भपका, प्रदर्शन, डोळेदिपविणाऱ्या मिरवणुकी, सर्कशींतील खेळ, द्वंद्व युद्धाचे प्राणघातकी सामनें—जिकडे तिकडे हेच. पण या भपक्यामागें, जनतेच्या हाल अपेष्टा होत्या. कर जबर असून, त्यांचा बोजा प्रामुख्यानें सामान्य जनतेवर पडे. कामाचा बोजा गुलामांना उचलावा लागे. याही पुढची पायरी म्हणजे, वैद्यकीय, तत्वज्ञान, चिंतन हीं कामंहि रोममधील या बड्या धेंडांनीं आपल्या ग्रीक गुलामांवर बव्हंशी लादली होती. शिक्षण तर राहूंद्याच, पण ज्या जगाचे ते स्वतःला धनी समजत, त्यांतील वस्तुस्थितीचं ज्ञान मिळविण्याची लालसाही त्यांच्या ठिकाणीं फारच थोडी दिसून येई.

बादशहांमागून बादशहा झाले. कांहीं वाईट होते तर कांहीं अति-वाईट होते. क्रमशः सैन्य सर्वसत्ताधारी बनून, राजाच्या हातातील कर्तु-मन्यथाकर्तुम शक्ती या सैन्याच्या हातीं गेली. सहाजिकच सैन्याला खुष करण्याच्या बाबतींत सट्टेबाजी सुरू झाली व जनतेकडून किंवा जित प्रदे-शांतून संपत्ति शोषून घेऊन, ती सैन्याला लांच म्हणून देण्यांत येऊं लागली. गुलामांचा व्यापार हा त्या वेळचा, पैसे मिळविण्याचा एक किफायतशीर धंदा असल्यामुळें, रोमन सैन्य पूर्वेकडील देशांत गुलाम पकडण्याकरितां नियमितपणें मोहिमाही काढी. जागच्या जागीं गुलाम विकत घेण्याकरितां सैन्याबरोबर व्यापारीही असत. डेलोस बेट हें ग्रीकांचं पवित्र ठिकाणः पण ते गुलामी व्यापाराचं मोठं बाजार पेठ बनलं. एकेक

दिवशीं तेथें दहा दहा हजार गुलामांचा व्यापार होई! रोममधील एका भव्य थिएटरांत एक लोकप्रिय बादशहा तर, एकेका वेळेला बाराबाराशें योध्यांचं प्रदर्शन करी. हे योद्धे म्हणजे बादशहा व त्याच्या लोकांचं मनरंजन करण्यासाठीं मृत्युच्या दाढेंत जाणारे गुलाम!

साम्राज्य कालीन रोमन संस्कृती अशा प्रकारची होती. तरीही आपला दोस्त गिबन म्हणतो, "जगाच्या इतिहासांत, मानवजात सर्वांत सुखी व संपन्न केव्हां होती हें सांगायला एकाद्याला बोलाविलं तर, तो डॉमिशीयनच्या मृत्युपासून तो कोमोडस गादीवर येईपर्यंतच्या काळाकडे बोट दाखवील!" हा काल म्हणजे इसवी सन ९६ तें १८० पर्यंतचा काल होय. गिबनची विद्वत्ता लक्षांत घेऊनही किती लोक त्याच्याशी सहमत होतील, याची मला शंका वाटते. गिबनची मानव जातीसंबंधींची भाषा प्रामुख्यानें भूमध्यप्रदेशापुरतीच मर्यादित होती. कारण त्याला हिंदुस्थान अगर चीन किंवा प्राचीन इजिप्तसंबंधीं फार थोडी किंवा जवळ जवळ कांहींच माहिती नव्हती.

मला वाटतं, मी रोमविषयीं थोडेसे कठोर विचार व्यक्त केलें आहेत. रोमन साम्राज्यांत जी थोडीबहुत शांतता प्रस्थापित झाली, त्यामुळें सर्वांना समाधान वाटलं असलं पाहिजे. सरहद्दीवर वरचेवर लढाया होत; पण खुद्द साम्राज्यात, निदान प्रारंभीच्या काळीं, शांतता असून कांहींशी सुरक्षितता भासूं लागली व त्यामुळें व्यापार वाढला. रोमन नागरिकत्वाचे हक्क सर्व रोमन साम्राज्याला लागू करण्यांत आले—पण लक्षांत ठेव कीं, गरीब गुलामांना त्यांतून वगळण्यांत आलं होतं. शिवाय, रोमन बादशहा सर्वसत्ताधारी असल्यामुळें, नागरिकांना फार थोडे हक्क असत. राजकारणा-

वरील कसलीहि चर्चा म्हणजे बादशहाशी द्रोह असं मानण्यांत येई. वरच्या वर्गांकरितां कांहीसे समान सरकार व एकच कायदा होता. ज्या बऱ्याच लोकांची, तत्पूर्वीच्या जुलमी सोटेशाहीखालीं दुर्दशा उडाली होती, त्यांचा वरील गोष्टीमुळें मोठाच फायदा झाला असला पाहिजे.

हळूंहळूं रोमन लोक फारच आळशी बनले व खुद्द आपल्याच सैन्यांतून लढण्यासाही अपात्र ठरूं लागले. खेड्यांपाड्यांतील लोक, त्यांच्यावर जो बोजा लादण्यांत आला होता, त्यामुळें अधिकाधिक गरीब बनत चालले. शहरवासियांची तीच तऱ्हा; पण शहरवासियांनीं आपल्याला सतावूं नये, म्हणून बादशहांना त्यांना खूष राखायचं होतं. याकरितां रोम शहरांतील लोकांना, रोट मोफत पुरविण्यांत येऊं लागले व त्यांच्या करमणुकीकरितां सर्कशीचे फुकट खेळ होऊं लागले. अशारितीनं शहरवासीयांना खूष राखण्यांत आलं; पण मोफत रोट पुरविणं फक्त थोड्याच ठिकाणीं शक्य होतं व तेंहि इजिप्त सारख्या इतर देशांतील गुलामांच्या पोटावर मारुनच ! या लोकांना रोटाकरितां विनामूल्य पीठ द्यावं लागे.

रोमन लोक तावडतोब लष्करांत दाखल न झाल्यामुळें साम्राज्या-बाहेरील रानटी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या लोकांना लष्करांत दाखल करून घेण्यांत आलं, आणि अशारितीनं, रोमन सैन्यांत, शत्रूंच्या आप्त, संबंधीं किंवा नातलगांचाच भरणा होऊं लागला. सरहद्दीवर तर "या रानटी" टोळयांनीं रोमन लोकांना चांगलंच घेरलं होतं. रोम दुबळं बनत चाललं, तर "रानटी" लोक अधिक प्रबळ व साहसी होत चालल्याचं दिसूं लागलं. विशेषतः पूर्व सरहद्द धोक्यांत आली होती. ही सरहद्द रोमपासून दूर असल्यामुळें, तिचं संरक्षण करणं सोपं नव्हतं.

पुढें, ऑगस्टस सीझरनंतर ३०० वर्षांनीं कॉन्स्टन्टाईन नांवाच्या एका बादशहानं एक मोठंच पाऊल टाकलं व त्याचें फार दूरगामी परिणाम झाले. त्यानं प्रत्यक्ष रोमन साम्राज्याची राजधानीच पूर्वेकडे हालविली. बायझन्टीयम् नजीक, काळा समुद्र व भूमध्यसमुद्र यांच्यामधील बॉस्फरसच्या किनाऱ्यावर, नवीन शहर बसविण्यांत आलं, व त्यानं या शहराला खुद्द आपलंच नांव—कॉन्स्टॅन्टीनोपल—दिलं. अशा रितीनं कॉन्स्टॅन्टीनोपल ( याला नवीन रोमहि म्हणत ) हें रोमन साम्राज्याच्या राजधानीचं शहर व केंद्रस्थान बनलं. आजही आशियाच्या बऱ्याच भागांत, कॉन्स्टॅन्टीनोपलला रुम किंवा रौम म्हणतात.

३४

# रोमन साम्राज्याचा विनाश

२४ एप्रिल १९३२

रोमन साम्राज्याचं सिंहावलोकन आपण पुढें चालूं करूं. इसवी सनाच्या ४ थ्या शतकाच्या आरंभीं सन ३१६ मध्यें कॉन्स्टन्टाईननं जुन्या बायझन्टियमजवळ कॉन्स्टॅन्टीनोपल शहर वसविलं व त्यानं आपल्या साम्राज्याची राजधानी, जुन्या रोमहून या नव्या रोमध्यें, बॉस्फरसवरील एका दूरच्या ठिकाणीं हालविली. नकाशा पहाताच तुला दिसून येईल कीं, हें नवीन कॉन्स्टॅन्टीनोपल शहर युरोपच्या सीमेवर असून तें अवाढव्य आशियाकडे जणूं काय नजरच लावून बसलं आहे ! हें शहर म्हणजे, सदर दोन खंडांमधील दुवाच वाटतो खुष्कीचे तसेंच समुद्रवरचे मोठमोठाले व्यापारी—मार्ग याच शहरामधून जातात. शहर व राजधानी या दोन्ही दृष्टयां तें उत्तम ठिकाणीं वसलेलं आहे. कॉन्स्टन्टाइनची निवड नामी होती; पण राजधानीच्या स्थित्यंतराची फळं त्याच्या घराण्याला भोगावी लागलीं. ज्या प्रमाणें जुनं रोम हे साधारणतः आशियामायनर व पूर्व देशापासून दूर होतं, त्याचप्रमाणें ही नवीन पौर्वात्य राजधानी गॉल-ब्रिटन सारख्या पाश्चिमात्य देशांपासून अति—दूर होती.

या अडचणीवर इलाज म्हणून, थोडा काळ, संयुक्त बादशहा ही टोळ काढण्यांत आली. एकाचं ठाणं रोममध्यें तर दुसऱ्याचं कॉन्स्टॅन्टीनोपल

येथें असे. यामुळें झालं काय तर, साम्राज्याचे पूर्व साम्राज्य व पश्चिम साम्राज्य असे सरळ दोन भाग पडले. पण ज्याची रोम ही राजधानी, तें पश्चिमेकडील साम्राज्य बाहेरच्या आघाताला फार दिवस तोंड देऊं शकलं नाहीं. ज्यांना "रानटी" म्हणून संबोधलं जाई, अशा लोकांपासून त्याला स्वसंरक्षण करतां आलं नाहीं. प्रारंभी जर्मनांतील गॉथांच्या टोळीनं येऊन रोम उध्वस्त केलं व त्यांच्या मागोमाग, वॅन्डाल व हूण आले व पश्चिम साम्राज्य ढांसळलं. हूण हा शब्द तुझ्या कानांवर आला असला पाहिजे. गेल्या महायुद्धांत, जर्मन लोक क्रूर व रानटी आहेत हें दर्शविण्याकरितां, ब्रिटीश लोक त्यांना हूण म्हणून सर्रास उपयोग करीत. खरी गोष्ट ही कीं, युध्दकालांत जवळ जवळ प्रत्येकाचं डोकं भडकतं. सुधारणा, शिष्टाचार सर्व कांहीं विसरून जाऊन माणूस निर्दय बनतो नि माणुसकी सोडून वागूं लागतो. जर्मन लोक असं वागले व तीच गोष्ट इंग्रज-फ्रेंचांची. या बाबतींत, क्वचितच भेदाभेद करतां येईल.

हूण त्याचप्रमाणें वॅन्डाल हे शब्द, निर्भर्त्सनावजा होऊन बसले आहेत. कदाचित हे हूण व वॅन्डाल साधारणत: आडदांड व क्रूर असून, त्यांनीं बरंचसं नुकसानहि केलं असावं; पण आपण लक्षांत ठेविलं पाहिजे कीं, आपल्याला त्यांच्याविषयीं जी सर्व माहिती मिळते, ती त्यांच्या शत्रूकडून-रोमन लोकांहून. सहाजिकच या बाबतींत फारशी निःपक्षपातीपणाची अपेक्षाकरितां येत नाहीं. कांहीं कां असेना, गॉथ, वॅन्डाल, हूण या लोकांनीं, पश्चिम रोमन साम्राज्य पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें खालीं आणलं. या लोकांना इतक्या सहजासहजीं लवकरच विजय मिळाला, त्याचं आणखी एक कारण संभवतं. तें म्हणजे त्यावेळीं ह्या साम्राज्या-

खालीं रयत अगदीं गांजलेली असावी. लोकांवर कराचा असह्य बोजा असून, ते इतके कर्जबाजारी होते कीं, कोणतंही स्थित्यंतर त्यांना स्वागतार्ह वाटलं असावं. भयंकर दारिद्र्य व हालअपेष्टा, यामुळें हिंदी रयतेलासुद्धां आज कोणताही बदल स्वागतार्ह वाटेल.

असो, पश्चिम रोमन साम्राज्य कोलमडलं. कांहीं वर्षांनीं या साम्राज्याचं पुनरुत्थापन झालं; पण वेगळ्या स्वरुपांत! पूर्वेकडील साम्राज्यालाही जरी हूण वगैरेंच्या स्वाऱ्यांना तोंड देणं चांगलंच जड गेलं तरी त्या स्थितींतहि तें टिकाव धरून होतं. इतकंच नव्हे तर अरब व पुढें तुर्कांशीं सतत लढण्याचा प्रसंग येऊनहि तें शतकानुशतकें जीव धरून होतं. ११०० वर्षांच्या थक्क करून सोडणाऱ्या काळानंतर सन १४५३ मध्यें, ओस्मानली लोकांनीं कॉन्स्टॅन्टीनोपल हस्तगत करून. हे साम्राज्य जमीन दोस्त केलं. त्या वेळेपासून गेलीं ५०० वर्षे कॉन्स्टॅन्टीनोपल किंवा इस्तंबूल तुर्कांच्याच ताब्यांत आहे. तेथूनच युरोपवर वारंवार चाल करून तें अगदीं व्हिएन्नच्या तटापर्यंत मुसंडी मारीत. या पुढील काळांत त्यांना क्रमशः माघार घ्यावी लागली व बारावर्षांपूर्वी, महायुद्धांत पराभव झाल्यामुळें, त्यांच्या हातून जवळ जवळ कॉन्स्टॅन्टीनोपल गेलंच होतं. महायुद्ध समयीं हें शहर इंग्रजांच्या हातांत असून, तुर्कस्थानचा सुलतान त्यांच्या हातचं बाहुलं होतं. पण, याच वेळीं आपल्या लोकांच्या मुक्ततेकरितां केमालपाशा हा महान नेता पुढें आला व वीर्यशाली लढ्या नंतर त्यानं यश संपादन केलं. आज तुर्कस्थान प्रजासत्ताक असून, सुलतान कायमचाच नाहिसा झाला आहे. केमालपाशा

हा या प्रजासत्ताक राज्याचा अध्यक्ष आहे. प्रथम रोमन साम्राज्याची व नंतर तुर्की साम्राज्याची अशी १५०० वर्षें राजधानी असलेलं कॉन्स्टॅन्टी-नोपल अद्यापहि तुर्की राज्यांत मोडतं; पण तें राजधानीचं ठिकाण नाहीं. तुर्क लोकाना या शहराच्या बादशाही प्रथेंपासून दूर राहणंच बरं वाटलं. त्यांनीं आपली राजधानी, आशियामायनॉरमध्यें दूर—आगोरा (किंवा अंकारा) येथें ठेविली आहे.

२००० वर्षांच्या काळांतून सपाट्यानं प्रवास करून, कॉन्स्टॅन्टीनो-पलची स्थापना, रोमन साम्राज्याच्या राजधानीचं नवीन शहरांत स्थलांतर वगैरे एकामागून एक झालेल्या परिवर्तनाचा आपण मार्ग काढला. या शिवाय कॉन्स्टॅन्टाईननं आणखी एक थक्क करून सोडणारी गोष्ट केली. त्यानं खिश्चन धर्माचा स्वीकार केला व तो बादशहा असल्यामुळें, खिश्चन धर्म हा साम्राज्याचा अधिकृत धर्म बनला. खिश्चन धर्माचा हा स्थानपालट अजब होता.ज्या पंथाचा छळ होत होता त्यालाच बादशाही धर्माचं स्थान प्राप्त झालं ! या परिवर्तनाचा थोडा काळपर्यंत फारसा फायदा झाला नाहीं. खिश्चन धर्मातील निरनिराळे पंथ आपसांत भांडू लागले व परिणामीं सदर धमातील लॅटिन व ग्रीक या दोन्ही पंथांत मोठाच भेद पडला. लॅटिन खिश्चनांचं मध्यवर्ति स्थान रोम येथें असून, रोमचा बिशप हा त्यांचा मुख्य समजला जाई; हाच बिशप पुढें रोमचा पोप बनला. ग्रीक पंथाचं केंद्र कॉन्स्टॅन्टीनोपल येथें होतं. लॅटिन चर्चचा प्रसार सर्व उत्तर व पश्चिम यूरोपभर होऊन, तें रोमन कॅथॉलिक चर्च म्हणून ओळखलं जाऊं लागलं. ग्रीक चर्च हें सनातनी चर्च समजलं जाई. पूर्व रोमन साम्राज्याच्या पतनानंतर ज्या ठिकाणीं सनातनी चर्च

उन्नत स्थितींत होतं, असा रशिया हा एकच प्रमुख देश होता. आता रशियांत समाजसत्तावाद असल्यामुळें या चर्चलाच काय पण कोणत्याच चर्चला तेथें अधिकृत मान्यता नाहीं.

मी पूर्वेकडील रोमन साम्राज्याचा उल्लेख करीत असतो; पण त्याचा रोमशीं फार थोडा संबंध होता. त्यांची प्रचारांतील भाषा देखील लॅटिन नसून ग्रीक होती. एका अर्थी शिकंदरच्या ग्रीक साम्राज्याची ती पुरवणी समजावयास हरकत नाहीं. पाश्चिमात्य देशांचं स्वातंत्र्य, हें साम्राज्य बराच काळ मान्य करीत नसलं तरी पश्चिम युरोपशीं या साम्राज्याचा अतिशय थोडा संबंध होता. आणि अशा स्थितींतही हें पूर्व साम्राज्य रोमन या शब्दाला चिकटून राहिलं. तेथील लोकांना रोमन म्हणण्यांत येई; जणूं काय त्या शब्दांत जादूच साठवून ठेविली होती ! याहीपेक्षां अजब गोष्ट म्हणजे, साम्राज्याचं मुख्य ठिकाण म्हणून रोमचं असलेलं महत्व नाहींसं झालं तरी, त्याचा दरारा कांहीं कमी झाला नाहीं. पुढें, खुद्द हें शहर जिंकायला आलेले रानटी लोक सुध्दां त्याच्या नाममहात्म्यामुळें कचरल्याचं दिसून येतं. त्यांनीं देखील या शहराला एकंदरींत सन्मानानंच वागविलं. मोठ्या नांवांचा व कल्पनांचा प्रभाव असा असतो !

पूर्वीचं साम्राज्य हातचं गेल्यावर, रोमनें नवीन साम्राज्याची निराळ्या धर्तीवर आंखणी केली. रोम येथें आलेला ख्रिस्तचा आद्य शिष्य पीटर, हाच तेथील पहिला बिशप झाला असं म्हणतात. यामुळें या स्थानाला अनेक ख्रिश्चनांच्या दृष्टीनं पावित्र्य येऊन, रोमच्या बिशपांना विशेष महत्व प्राप्त झालं. प्रारंभीं, रोमचा बिशप बाकीच्या बिशपाहून

वेगळा नव्हता; पण बादशहानं आपला मुक्काम कॉन्स्टॅन्टीनोपल येथें हालविल्यामुळें त्याला महत्व आलं. रोममध्यें त्यावेळीं त्याच्यावर प्रभाव पाडील असा कोणीही नव्हता. पुढें पीटरच्या जागेवर आलेला वारस, सर्व बिशपांचा प्रमुख समजण्यांत येऊं लागला व त्याला पोप अशी संज्ञा मिळाली. तुला माहितच आहे कीं, पोप आजही अस्तित्वांत असून, तो रोमन कॅथॉलिक चर्चचा प्रमुख समजला जातो.

रोमन चर्च व ग्रीक सनातनी चर्च यामध्यें दुफळी पडण्याचं एक चमत्कारिक कारण म्हणजे प्रतिमांचा उपयोग. रोमन चर्चनं आपल्यांतील साधुसंतांची विशेषतः जीजसची आई मेरी हिच्या प्रतिमेची आराधना करण्यास प्रोत्साहन दिलं होतं. सनातनी चर्चचा या गोष्टीला तीव्र विरोध होता.

रोमवर उत्तरेकडील टोळ्यांच्या नायकांनीं अनेक पिढ्या राज्य केलं; पण ते सुद्धां बहुधा कॉन्स्टॅन्टीनोपलच्या बादशहाचें अधिराज्य मान्य करीत. मध्यंतरी धर्माचा मुख्य म्हणून पोपची सत्ता इतकी वाढली कीं, कॉन्स्टॅन्टीनोपलला आपण धुडकावून लावूं असं त्याला वाटूं लागलं. मूर्तीपूजेच्या प्रश्नावर जेव्हां तेढ उद्‌भवली, तेव्हां पोपनं रोमचा पूर्वेशीं असलेला संबंध पार तोडून टाकण्याचं ठरविलं; पण या मध्यंतरीच्या काळांत बऱ्याच घडामोडी झाल्या. अरबस्थानांत इस्लाम हा नवीन धर्म उदयास आला. सर्व उत्तर आफ्रिका व स्पेन पायाखालीं घालून, अरब युरोपच्या मध्य विभागापर्यंत धडक मारूं लागले होते. उत्तर व पश्चिम युरोपांत नवीन राज्यें बनत होतीं आणि पूर्व रोमन साम्राज्यावर अरबांचे उग्र हल्ले चालू होते—पण याबद्दल आपल्याला पुढें बोलायचंच आहे कीं.

पोपनं उत्तरेकडील फ्रँक्स या जर्मन टोळीच्या एका नेत्याकडे मदतीची याचना केली. त्याचं नाव कार्ल किंवा चार्लस. पुढें त्याला रोममध्यें बादशहा म्हणून राज्याभिषेक करण्यांत आला. हें अगदींच नवीन साम्राज्य होतं; पण तरीही त्याला "रोमन साम्राज्य" व पुढें "पवित्र रोमन साम्राज्य" असं संबोधण्यांत येऊं लागलं. रोमन या उपपदाशिवाय साम्राज्य ही कल्पनाच त्याना शिवत नसे आणि चार्लस दी ग्रेट म्हणून संबोधल्या जाणाऱ्या शार्लमेनचा रोमशीं फारसा संबंध नव्हता तरीही त्याला रोमन बादशहांचे सीझर, ऑगस्टस वगैरे किताब मिळाले. हें नवीन साम्राज्य पूर्वीच्या साम्राज्याची पुरवणी असं समजण्यांत येत असलं तरी, साम्राज्याच्या नावांत एका नवीन विशेषणाची भर पडली. हें साम्राज्य "पवित्र" बनलं. पवित्र म्हणण्याचं कारण म्हणजे तें विशेषतः ख्रिश्चन धर्मीय असून, त्याचा शास्ता पोप होता.

पुन्हां तुला कल्पनांचं अद्भुत सामर्थ्य दिसून येईल. मध्य युरोपांतील एक फ्रँक किंवा जर्मन रोमन बादशहा बनला! या "पवित्र" साम्राज्याचा भावी इतिहास तर यापेक्षाही अजब आहे. साम्राज्य या दृष्टीनं तें नुसतं नाममात्र राहिलं होतं. कॉन्स्टॅन्टीनोपल येथील पूर्व रोमन साम्राज्य निदान राष्ट्र या दृष्टीनं तरी अस्तित्वांत होतं; पण पश्चिमेकडील साम्राज्य सारखं बदलत गेलं, नाहींसं झालं व पुन्हा अस्तित्वांत आलं. वस्तुतः तें म्हणजे एक मृत साम्राज्य असून, रोमन नांव व ख्रिश्चन चर्च यांच्या आधाराखालीं केवळ तत्वतः अस्तित्वांत होतं. एका दृष्टीनं हें साम्राज्य म्हणजे सत्यसृष्टीपेक्षां कल्पनेचा खेळ होता. कोणीतरी, मला वाटतं व्हॉल्टेरनं या "पवित्र रोमन साम्राज्याची" तें पवित्रही नव्हतं

रोमनही नव्हतं व साम्राज्यही नव्हतं, अशी व्याख्या केली आहे. हिंदी सनदी सेवकवर्गाचं ( Indian Civil Service ) वर्णनही असंच कोणीतरी एकानं, जो हिंदी नाही, विनीत नाही व सेवकही नाही, असं केलं आहे. दुर्दैवानं तो अद्यापही आपल्या बोकांडी बसला आहे.

कांहीही असो, रोमन साम्राज्याचं हें भूत, नाममात्र कां होईना, कमीत कमी हजार वर्षं टिकलं आणि अवघ्या शंभर वर्षांपूर्वी, नेपोलियनच्या काळांत, त्याला एकदांची मूठमाति मिळाली. हा अंत फारसा डोळ्यात भरण्याजोगा किंवा अद्भूत नव्हता. दीर्घकालीन वास्तव अस्तित्वाभावीं फारच थोड्या लोकांच्या तो लक्षांत आला असेल. हें पिशाच्च गाडलं गेलं; पण कायमचं नव्हें. कैसर, झार आदींच्या रूपानं तें पुन्हां वावरूं लागलं. फक्त चौदा वर्षांपूर्वींच, महायुद्धांत, यापैकीं बहुतेकांना राम म्हणावं लागलं.



# ३५

# जागतिक राज्याची कल्पना

२५ एप्रिल १९३२

मला वाटतं, या पत्रांमुळं तूं कंटाळून जाऊन पुष्कळदां तुझा घोंटाळा उडत असावा. विशेषतः रोमन साम्राज्यासंबंधींची माझीं गेलीं दोन पत्रें म्हणजे तुला एक दिव्यच वाटलं असलं पाहिजे. हजारों वर्षं नि हजारों मैलांच्या प्रवासांत, मी पुढें मागें वाटेल तसं भ्रमण केलं आहे. त्यामुळें, तुझ्या मनांत जर गोंधळ उडाला असेल, तर त्याची सर्वस्वी चूक माझ्याकडेच आहे. नाराज होऊं नकोस. पुढें चाल. कांहीं ठिकाणीं मी काय म्हणतो, तें तुला समजलं नाहीं तर त्याबद्दल त्रास करून न घेतां तशीच पुढें जा. हीं पत्रें तुला इतिहास शिकवण्याकरितां नसून, इतिहासाचं ओझरतं दर्शन देऊन, तुझ्या मनांत जिज्ञासा निर्माण करण्याकरितां आहेत.

रोमन साम्राज्याचा तुला बराच कंटाळा आला असेल. मी कबूल करतो कीं, मी देखील कंटाळलो आहे. पण आज आपण त्यांच्या बरोबर आणखी थोडा वेळ काढूं आणि नंतर त्याची, तात्पुरती रजा घेऊं.

तुला माहितच आहे कीं, अलीकडे राष्ट्रीयत्व—देशप्रेम—वगैरेची बरीचशी भाषा ऐकूं येते. आपण बहुतेक हिंदी लोक कट्टे राष्ट्रीयवादी आहोत. हें राष्ट्रीयत्व, इतिहासातील एक अगदींच नवीन चीज असून, तिची उत्पत्ति व वाढ कशी झाली, हें आपण पाहूं. पण रोमन साम्राज्याच्या

काळीं, अशा प्रकारच्या भावना क्वचितच अस्तित्वात होत्या. साम्राज्य म्हणजे सर्व जगावर सत्ता गाजवणारं मोठ राज्य अशी त्यावेळीं समजूत होती. अर्थात्, सर्व जगावर सत्ता गाजविणारं साम्राज्य अगर राज्य कधींच नव्हतं. पण भूगोलाचं अज्ञान, वाहतूक व दूरच्या प्रवासातील अडथळे, यामुळें जुन्या काळांतील लोकांना बहुधां असं वाटे कीं, अशा प्रकारचं राज्य अस्तित्वांत आहे. खुद्द यूरोप व भूमध्य प्रदेशांत, साम्राज्याचं स्वरूप येण्यापूर्वींही रोम हे एक प्रकारचं वरिष्ठ राज्य व बाकीचीं सर्व दुय्यम दर्जाचीं असं मानलं जाई. आणि रोमचा दराराही इतका मोठा होता कीं, आशियामायनॉर मधील पेर्गामम सारखं ग्रीक राज्य, इजिप्त वगैरे सारखे कांहीं देश, तेथील राज्यकर्त्यांनीं रोमन लोकाना बहाल केले. त्यांना वाटे, रोम सर्वशक्तीमान असून अनिवार्य आहे. आणि वस्तुस्थिती पाहिली तर मी तुला सांगितल्याप्रमाणें, रोमनें भूमध्य प्रदेशीय देशापेक्षां मोठ्या प्रदेशांवर कधींच राज्य केलं नाहीं. उत्तर युरोपांतील रानटी लोक रोमपुढें कधींच नमले नाहींत व रोमनंही त्यांना नमविण्याची फारशी पर्वा केली नाहीं; पण रोमच्या सत्तेची मर्यादा केवढी कां असेना त्यामागें जागतिक राज्याची कल्पना असून, ही कल्पना तत्कालीन अशा बहुतेक पाश्चात्यांनीं मान्य केली होती. याचमुळें रोमन साम्राज्यें दीर्घकाल टिकूं शकली. साम्राज्यांत कांहींच राम राहिला नव्हता तेव्हांही त्यांचं नांव व दरारा कायम होता.

एका मोठ्या राष्ट्रानं, बाकीच्या जगावर वर्चस्व गाजविण्याची कल्पना, रोमपुरतीच मर्यादित नव्हती. जुन्या काळांतील, चीन व हिंदुस्थानमध्येंही ती दिसून येई. तुला माहितच आहे कीं, चिनी राज्याचा

विस्तार बहुधा रोमन राज्यापेक्षां मोठा असून तें थेट कास्पियन समुद्रापर्यंत पसरलेलं होतं. ज्यांना "परमेश्वरपुत्र" असं चिनी लोक म्हणत, ते चिनी बादशहा म्हणजे जगाचे राजे असं मानलं जाई. अर्थात हें खरं कीं, पुष्कळ टोळ्या बादशहाला सतावून सोडून त्याना जुमानतही नसत; पण रोमन लोकांच्या दृष्टीनं, उत्तर युरोपांतील लोक जसे "रानटी" होते तसे हे लोकही रानटी होते.

हिंदुस्थानांतही अगदीं आरंभींच्या काळापासून चक्रवर्ती राजांचा उल्लेख आढळून येतो. अर्थात, जगाबद्दलची त्यांची कल्पना अगदींच मर्यादित होती. खुद्द हिंदुस्थानच इतका मोठा देश होता कीं, हिंदुस्थान म्हणजे जग, व हिंदुस्थानचा चक्रवर्ति होणं म्हणजे जगाचा चक्रवर्ति होणं असं त्यांना वाटे. हिंदुस्थान बाहेरील लोक ते त्यांच्या दृष्टीनं "रानटी" किंवा म्लेच्छ होत. ज्याच्या नांवावरून आपल्या देशाला भारतवर्ष असं नांव पडलं, तो पुराण प्रसिद्ध भरत हा चक्रवर्ती राजा होता, अशी समजूत आहे. महाभारतावरून युधिष्ठिर व त्याचे बंधु, चक्रवर्ती पदाकरतां लढले, असं दिसून येतं. अश्वमेध यज्ञ म्हणजे जागतिक वर्चस्वाचं आव्हान समजलं जाई. अशोकचाही, प्रथम अश्वमेध यज्ञ करण्याचा विचार असावा; पण अनुताप होऊन, त्यानं युद्ध करण्याचं सोडून दिलं. पुढें गुप्त राजा प्रमाणें हिंदुस्थानांतील दुसऱ्या कांहीं साम्राज्यवादी राजांचाही असा यज्ञ करण्याचा विचार असावा.

यावरून तुला कळून येईल कीं, पूर्वी चक्रवर्ति राजे व जागतिक राज्य, या दृष्टीनंच लोक विचार करीत. पुढें दीर्घ कालानंतर, राष्ट्रीयवाद व एक नवीन प्रकारची साम्राज्यशाही आली. या दोहोंनीं मिळून

जगांत भरपूर अनर्थ उडवून दिला. आजही पुन्हां जागतिक राष्ट्राची भाषा ऐकूं येते. पण तें म्हणजे मोठं साम्राज्य, चक्रवर्ति राज्य नसून, जागतिक लोक राज्य होय. या राज्यांत, एका देशाची, जनतेची अगर वर्गाची दुसऱ्याकडून पिळवणूक होणार नाहीं. भावी काळांत अशी एखादी गोष्ट घडून येईल कीं नाहीं हें सांगणं कठीण आहे; पण जगाची जी दुर्दशा उडाली आहे तींतून मुक्तता होण्यास याखेरीज दुसरा मार्ग नाहीं.

मी उत्तर युरोपांतील ' रानटी ' लोकांचा वारंवार उल्लेख केला आहे. मी रानटी हा शब्द वापरतो याचं कारण रोमन लोकांनीं त्यांचा तसा उल्लेख केला आहे. मध्य आशियांतील भटक्या वगैरे टोळ्याप्रमाणें हे लोक रोममधील आपलें शेजारी किंवा हिंदी लोक त्यांच्यापेक्षां खात्रीनं कमी सुधारलेले होते; पण खुल्या वातावरणांतील जीवन कंठणारे हे लोक अधिक कणखर होते. पुढें त्यांनीं ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला. रोम पादाक्रांत करणारे हे लोक, सामान्यतः क्रूर वैरी या नात्यानं आले नव्हते. उत्तर युरोपांतील आधुनिक राष्ट्रं म्हणजे या गॉथ, फ्रँक प्रभृती " रानटी " लोकांचें वंशज होत.

रोमन बादशहांचीं नांवें मी तुला सांगितलीं नाहींत. या नावांची एक दांडगी यादी तयार होईल. थोडे अपवाद सोडले तर बहुतेक बादशहा वाईटच होते आणि कांहींतर मूर्तिमंत सैतानच होते. तूं नेरोसारख्या एखाद्याचं नांव ऐकलं असशील; पण त्याच्यापेक्षांही वाईट असे कितीतरी बादशहा झाले. इरीन नांवाच्या एका स्त्रीनं सम्राज्ञी होण्याकरितां प्रत्यक्ष आपल्या मुलाला ठार केलं. हा प्रकार कॉन्स्टॅन्टीनोपल मधील.

रोमच्या एका बादशहाचं नांव इतरापेक्षां ठळक रीतीनं पुढें येतं. त्याचं नांव मार्क्स ऑरेलियस अॅन्टोनिनस. हा बादशहा तत्वज्ञानी होता, असं म्हणतात. त्याचे विचार व चिंतन ग्रथित केलेला एक ग्रंथ खास अभ्यासनीय आहे. मार्क्स ऑरलियसची उणीव त्याच्या मागून गादीवर आलेल्या त्याच्या चिरंजीवांनीं भरून काढली. रोमच्या इतिहासांतील अत्यंत दुष्ट माणसांपैकीं एक अशी त्याची ख्याती होती.

रोमन साम्राज्याच्या पहिल्या ३०० वर्षांत रोम पश्चिमेकडील केंद्र होतं. मोठमोठ्या इमारतींनीं गजबजलेलं असं तें भव्य शहर असलं पाहिजे व त्या ठिकाणीं सर्व साम्राज्यांतूनच नव्हे तर साम्राज्या पलीकडच्या देशांतून लोक येत असले पाहिजेत. दूर दूरच्या देशांतून वेंचक माल, दुर्मिळ खाद्य पदार्थ व मौल्यवान जिनसा, जहाजें भरून येत. असं सांगतात कीं प्रत्येक वर्षीं ११० जहाजांचा तांडा, तांबड्या समुद्रांतील इजिप्तच्या बंदरातून हिंदुस्थानकडे रवाना होई. हीं जहाजें पावसाळी वाऱ्यांच्या अनुरोधानं निघत व त्यांचा त्यांना खूप फायदाही होई. बहुधा तीं दक्षिण हिंदुस्थानच्या किनाऱ्याला येऊन लागत व तेथून मौलवान जिन्नस घेऊन तीं त्या समयींच्या वाऱ्याच्या अनुरोधानं इजिप्तकडे परतत आणि तेथून हा माल खुष्कीच्या व जलमार्गानं रोमकडे रवाना होई.

अर्थात, हा सर्व व्यापार बव्हंशीं धनिकांच्या फायद्याकरितां होता. थोड्या लोकांच्या चैनीमागें असंख्य लोकांच्या हालअपेष्टा होत्या. ३०० वर्षांहून अधिक काळ रोम पश्चिमेकडे सर्वश्रेष्ठ होतं. पुढें कॉन्स्टॅन्टी-नोपलची स्थापना झाल्यावर रोमनें या नवीन शहराच्या भागीदारींत

ऐश्वर्य भोगलं. आश्चर्याची गोष्ट ही कीं, प्राचीन ग्रीसनं वैचारिक दृष्ट्या अल्प काळांत जें कार्य केलं तें रोमला दीर्घ काळांत करितां आलं नाहीं. तसं पाहिलं तर रोमन संस्कृति म्हणजे अनेक दृष्ट्यां ग्रीक संस्कृतीची निस्तेज छायाच भासते. एका गोष्टीला मात्र रोमन लोकांनीं मोठीच चालना दिली. ही म्हणजे रोमन कायदा. आजही कायदेपंडितांना रोमन कायदा शिकावा लागतो व युरोपांतील सद्यःकालीन कायद्याचा तो बऱ्याच प्रमाणांत पाया आहे असं मानतात.

ब्रिटिश साम्राज्याची, विशेषतः इंग्लिश लोकांकडून स्वतःच्या समाधानासाठीं, रोमन साम्राज्याशीं तुलना केली जाते. सर्व साम्राज्यें कमीजास्त प्रमाणांत सारखीच असतात. बहुसंख्यांकाना लुबाडून तीं गलेलठ्ठ होतात. मात्र रोमन व इंग्लिश लोकांत एक मोठंच साम्य आहे व तें म्हणजे दोघांतील असामान्य कल्पनादारिद्य! गाजावाजा न करितां लुबाडण्याची वृत्ति, अल्पसंतोषीपणा व जग जणूं काय आपल्याच फायद्याकरितां निर्माण करण्यात आलं आहे ही भावना; यामुळं हे लोक शंका कुशंका व अडचणी यांनीं द्विधा न होता काळक्रमण करीत असतात.

## ३६

# पार्थिया व सॅसानीड्स

२६ एप्रिल १९३२

रोमन साम्राज्य व युरोप यांचा निरोप घेऊन, आपण जगाच्या इतर भागांना भेट दिली पाहिजे. आशियांतील घडामोडी नजरेखालीं घालून आपल्याला हिंदुस्थान व चीनची पुढील माहिती घ्यावयाची आहे. आतां ज्ञात इतिहासाच्या क्षितिजावर नवीन नवीन देश चमकूं लागले आहेत. त्यांचाही आपल्याला थोडा फार विचार केला पाहिजे. तसं पाहिलं तर, जसजसं आपण पुढें जाऊं तसतसा आपल्याला कितीतरी जास्त ठिकाणाबद्दल विचार करावा लागेल. कदाचित त्यामुळं त्रासून जाऊन, मी हें काम अर्धवट सोडून देणंही शक्य आहे.

मागील एका पत्रांत पार्थियामधील कारवाईच्या युद्धांतील रोमन प्रजासत्ताक फौजेच्या प्रचंड पराक्रमाचा मी उल्लेख केला आहे. पार्थियन हे कोण व त्यांनीं सध्यांच्या इराण व मेसॉपोटेमियाच्या ठिकाणीं राज्य कसं स्थापन केलं, हें त्यावेळीं मी सांगितलं नाहीं. तुला आठवत असेल कीं, आलेक्झांडरच्या मृत्यूनंतर त्याचा सेनापती सेल्यूकस व त्याच्या वंशजांनीं हिंदुस्थान ते आशियामायनॉरपर्यंतच्या साम्राज्यावर राज्य केलं. ३०० वर्षांनंतर पार्थियन या मध्य आशियांतील टोळ्यांनीं त्यांना तेथून हुसकून लाविलं. इराण अथवा तत्कालिन पार्थिया मधील याच पार्थीय-

आणि पुढें झालेल्या रोमन साम्राज्यालाही पार्थियनचा पूर्ण असा कधींच पराभव करतां आला नाहीं. पार्थियामध्यें जवळ जवळ २५० वर्षं राज्य केल्यानंतर अंतर्गत बंडाळी माजून, या लोकांची उचल बांगडी झाली. यावेळीं इराणी लोकांनींच खुद्द आपल्या परक्या शत्रूंविरुद्ध उठावणी केली व त्यांच्या जागीं स्वधर्मीय व स्ववंशीय राजा गादीवर बसविला. या राजाचं नांव आर्देसर ( पहिला ) असं असून, त्याच्या वंशाला सॅसानीड घराणं म्हणतात. आर्देसर झोरास्ट्रियन धर्माचा कट्टा पुरस्कर्ता असून, त्याच्यात फारशी परधर्म सहिष्णुता नव्हती. तुला माहितच आहे कीं, हा झोरास्ट्रियन धर्म म्हणजे पारशी लोकांचा धर्म. सॅसानीड व रोमन साम्राज्य यांच्यांत जवळ जवळ सतत लढाई चालू असे. पुष्कळवेळां इराणीसैन्य, कॉन्स्टॅन्टीनोपलपर्यंत जाऊन थडकलं होतं; एकदां त्यांनीं इजिप्तही पादाक्रांत केलं होतं. सॅसानीड साम्राज्य झोरो-ॲस्ट्रियन धर्माच्या जोरदार पुरस्काराबद्दल प्रसिद्ध आहे. मुख्यत्वेंकरून पुढं सातव्या शतकांत इस्लामचं आगमन होऊन त्यानं सॅसानीड साम्राज्य व तेथील अधिकृत धर्म या दोहोंनाही मूठमाती दिली. पुष्कळ झोरास्ट्रियनांनीं या परिवर्तनामुळें व धार्मिक छळाच्या भीतीनं देशत्याग करण्याचं ठरविलं व ते हिंदुस्थानांत आले. आपल्या आश्रयार्थ येणाऱ्या इतर लोकांप्रमाणें याही लोकांना हिंदुस्थाननं आसरा दिला. आजचे हिंदुस्थानांतील पारशी म्हणजे या प्रारंभींच्या झोरास्ट्रियनांचे वंशज होत.

निरनिराळ्या धर्मांना वागविण्याबाबत हिंदुस्थानशीं इतर देशांशीं तुलना करणं उद्बोधक आहे. पूर्वींच्या काळांत बहुतेक ठिकाणीं—विशेषतः युरोपांत अधिकृत धर्माला मान न तुकविणाऱ्या लोकांना असहिष्णुता व

धार्मिक छळाला तोंड द्यावं लागे. सक्ती, चौकशीचें भयंकर सत्र व चेटकिणी समजण्यांत येणाऱ्या अबलांना जिवंत जाळणें, या विषयीं तुला युरोपच्या इतिहासांत पावलोपावलीं वाचावयास मिळेल. पण हिंदुस्थानांत मात्र पूर्वीच्या काळीं बरीचशी सहिष्णुता दिसून येते. पाश्चात्य देशांतील निरनिराळ्या धर्मांमधील उग्र कलहाचा विचार केला तर हिंदुस्थानांतील हिंदू व बौध्द धर्मांमधील झगडा कांहींच नव्हे. आपण या गोष्टी चांगल्या लक्षांत ठेवणं जरूर आहे. दुर्दैवानं आपल्या देशांत अलीकडे धार्मिक व जातीय झगडे उद्भवत आहेत व इतिहासाचं ज्ञान नसलेल्या कांहीं लोकांची अशी समजूत आली आहे कीं, हे झगडे शतकानुशतकें हिंदुस्थानांत चालू आहेत; पण तें निखालस खोटें आहे. हे कलह बहुतांशीं अलिकडेच उद्भवले आहेत. तुला आढळून येईल कीं, इस्लामचा प्रारंभ झाल्यानंतरही, कित्येक शतकापर्यंत, मुसलमान लोक हिंदुस्थानच्या सर्व भागांतील आपल्या शेजाऱ्यांबरोबर शांततेनं कालक्रमणकरीत होतें. जेव्हां त्यांनीं व्यापारी म्हणून या देशांत प्रवेश केला, तेव्हां त्यांचं स्वागत केलं जाऊन स्थायिक होण्याकरितांही प्रोत्साहन देण्यांत आलं. पण या भविष्यकाळांतील गोष्टी.

हिंदुस्थाननें वरीलप्रमाणें झोरास्ट्रियन लोकांना आसरा दिला. यापूर्वी कांहीं शतकें किंवा इसवी सनाच्या पहिल्या शतकांत, रोम मधून धार्मिक छळाबद्दल पळून आलेल्या कित्येक ज्यू लोकांनाही हिंदुस्थानांत आश्रय मिळाला होता.

इराणमध्यें सॅसानीड घराण्याचं राज्य असतां, सिरीया वाळवंटांत पामिरा हें एक छोटं राज्य अल्पकाल चमकून गेलं. पामिरा हें सिरीयाच्या

वाळवटांतील एक व्यापारी केंद्र होतं. आजही तेथें दिसून येणारे मोठे अवशेष, तेथील भव्य इमारतींची साक्ष देतात. येथील राज्यकर्त्यांत झेनोबिया नांवाची एक स्त्रीही होऊन गेली. रोमनांनीं तिचा पराभव केला व त्यांच्यांत इतकं (अ) स्त्रीदाक्षिण्य होतं कीं, त्यांनीं तिला बेड्या ठोकून रोमकडे नेण्या कमी केलं नाहीं.

इसवीसनाच्या आरंभीं, सिरीया मोठा आल्हादकारक देश होता. बायबलच्या नवीन करारांत, त्याबद्दल कांहीं माहितीही मिळते. बेजबाबदार राज्यव्यवस्था व जुलुमी राजवट असूनही तेथें मोठीं शहरें व दाट लोकसंख्या होती तसंच देशांत मोठमोठे कालवे असून व्यापारही विस्तृत प्रमाणावर चाले; पण सतत लढाया नि बेदिली यामुळें ६०० वर्षांचं हें राज्य उजाड झालं. मोठीं शहरें निर्जन बनलीं. जुन्या इमारतींची धूळधाण उडाली. हिंदुस्थान ते युरोप हा प्रवास विमानानं करतांना तुला पामिरा बालबाकवरून जावं लागेल. बाबिलोन व दुसरी अनेक इतिहास प्रसिद्ध स्थळें कोठें होतीं हें तुला दिसेल. आंता तीं आस्तित्वांत नाहींत.



## दक्षिण हिंदुस्थाच्या वसाहती

२८ एप्रिल १९३२

आपण लांब लांब भटकलों. आतां हिंदुस्थानांत परत येऊन तेथील आपलें वाडवडील काय करीत होते तें पाहूं. सरहद्दीवरील कुश साम्राज्य तुला आठवतच असेल. हें बौद्ध साम्राज्य सर्व उत्तर हिंदुस्थान व मध्य आशियाभर पसरलेलं असून त्याची राजधानी पुरुषपुर किंवा पेशावर ही होती. तुला कदाचित् हेंहि आठवत असेल कीं, याच सुमारास दक्षिणेत या समुद्रापासून त्या समुद्रापर्यंत पसरलेलें असं नांवानं मोठं राज्य आंध्रराज्य होतं. सुमारें ३०० वर्षं कुश व आंध्रराज्यें उन्नत स्थितींत होतीं. इ. सनाच्या ३ ऱ्या शतकांत हीं दोन्हीं साम्राज्यें संपुष्टांत येऊन कांहीं काळ हिंदुस्थानांत अनेक छोटीं छोटीं राज्यें निर्माण झालीं; पण शंभर वर्षांच्या आतच पाटलीपुत्रांमध्यें दुसरा एक चंद्रगुप्त उदयास आला व त्यानं प्रखर अशा हिंदु-साम्राज्यशाहीला सुरवात केली. या गुप्त घराण्याचा विचार करण्यापूर्वी आपण दक्षिण हिंदुस्थानांतील मोठमोठ्या घडामोडी-कडे दृष्टि-क्षेप करूं. कीं, ज्यामुळें हिंदी शिल्पकलानीं पूर्वेकडील दूरदूरच्या प्रदेशांत प्रवेश केला.

तुला हिंदुस्थानचा आकार चांगला माहीत आहे. तो हिमालयपर्यंत व दोन समुद्र यामध्यें पसरलेला आहे. उत्तरभाग समुद्रापासून फार दूर आहे. पूर्वीच्या काळांतील उत्तरभागापुढील महत्वाचा प्रश्न

म्हणजे सरहद्द. इकडूनच शत्रू व आक्रमक लोक येत. पण पूर्व, पश्चिम व दक्षिण या बाजूंना अफाट समुद्रकिनारा आहे. हिंदुस्थान दक्षिणेकडे इतका चिंचोळा होत गेला आहे कीं, कन्या–कुमारी अगर केप कामोरीन जवळ, पूर्व पश्चिमेला मिळते. येथील सर्व लोक समुद्रांजवळ रहाणारे. त्यांना समुद्राबद्दल स्वाभाविकच आस्था वाटे. कोणाचीही अशीच अपेक्षा असणार कीं, त्यांच्यापैकीं पुष्कळजन दर्यावर्दी असले पाहिजेत. फार पूर्वीपासून दक्षिण हिंदुस्थानचा पाश्चिमात्य देशांशीं कसा व्यापार चाले, याबद्दल मी तुला पूर्वींच सांगितलं आहे. यामुळें पूर्वींपासून हिंदुस्थानांत जहाजें बांधण्याचा धंदा अस्तित्वात असावा व लोकांनीं व्यापाराच्या शोधाकरितां किंवा केवळ साहसासाठीं समुद्र ओलांडावा यांत कांहींच आश्चर्य नाहीं. गौतम बुध्दाच्या काळांत विजयानं हिंदुस्थानांबाहेर जाऊन सिलोन पादाक्रांत केलं होतं, असा समज आहे. मला वाटतं, अजंठा कोरीव लेण्यांत विजय सीलोनला जाण्याकरितां समुद्र ओलांडत असून त्याचे हत्ती–घोडे जहाजांतून समुद्रापार केले जात आहेत, अशाप्रकारचं एक चित्र कोरलेलं आहे. विजयानं या बेटाला सिंहल असं नांव दिल्यानं तें ‘ सिंहलद्वीप ’ झालं. सिंहल हा शब्द सिंहावरून आला. सिलोनमध्यें सिंहाविषयीं एक कथा प्रचलित आहे. मी ती विसरून गेलो आहे. सिलोन हा शब्द सिंहलपासून आला असावा.

दक्षिण हिंदुस्थानांतून खाडी ओलांडून सिलोनला जाणं ही अर्थातच मोठीशी मर्दुमकी नव्हती. कारण, बंगालपासून गुजराथपर्यंतच्या समुद्र किनाऱ्यावर जीं कित्येक बंदरें विखुरलेलीं होतीं त्यावरून जहाजें बांधलीं जात व लोक समुद्रपर्यटनें करीत यांचा पुष्कळ पुरावा मिळतो. चंद्रगुप्ताचा

प्रसिद्ध मंत्रि चाणक्य यानं आपल्या अर्थशास्त्रांत आरमाराविषयीं थोडं फार लिहिलं असून त्याचा उल्लेख मी माझ्या नैनीहून लिहिलेल्या पत्रांत केलाच आहे. चाणक्याशिवाय चंद्रगुप्ताच्या दरबारांतील मेगॅस्थिनीस या ग्रीक वकीलानंही आरमाराचा उल्लेख केला आहे. यावरून असं दिसतं कीं, या साम्राज्याच्या सुरवातीलासुद्धां जहाजं बांधणं हा हिंदुस्थानांतील एक भरभराटीचा धंदा होता; आणि जहाजांचा तर उपयोग केला जातो हें उघड आहे. त्याकाळीं हिंदुस्थानांतील कितीतरी लोकांनीं समुद्र ओलांडला असला पाहिजे. या प्राचीन गोष्टी ध्यानात घेतल्यावर आज कांहीं लोकांनीं समुद्रपर्यटनाला घाबरावं नि तें धर्मबाह्य असं मानावं याचं आश्चर्य वाटतं. या लोकांना भूत–काळचे वारस म्हणतां यावयाचं नाहीं. कारण भूत–काळांतील लोक कितीतरी समंजस होते. सुदैवानं असल्या विचित्र कल्पना आतां बहुतेक नाहींशा झाल्या असून त्यांना अद्यापी कवटाळून बसणाऱ्या व्यक्ति फार थोड्या आढळतात.

उत्तरेपेक्षां दक्षिण हिंदुस्थानची समुद्राकडे अधिक नजर लागलेली होती. परदेशी व्यापार बव्हंशी दक्षिणेशीं चालत असून तामिळी कवनांतून "यावनी" मद्यें, पुष्पपात्रें, दिवे यांचा भरपूर उल्लेख आढळून येतो. यवन हा शब्द प्रामुख्यानं ग्रीक लोकांना उद्देशून असला तरी बहुतेक सर्वच परकीयांच्या बाबतींत वापरला जाई. दुसऱ्या व तिसऱ्या शतकांतील आंध्र नाण्यांवर दोन शिडाच्या मोठ्या जहाजाचं जें चित्र आहे, त्यावरून प्राचीन लोकांना जहाजं बांधणं व समुद्र व्यापार याबद्दल किती

सहाजिकच दक्षिणहिंदुस्थान मोठमोठ्या योजना हातीं घेण्यांत अग्रेसर असून त्याचं पर्यवसान पुढें पूर्वेकडील सर्व बेटांतून हिंदी वसाहती स्थापन होण्यांत झालं. इसवीसनाच्या पहिल्या शतकांत वसाहतींना जी सुरवात झाली ती पुढें कित्येक शतकें चालू होती. मलाया, जावा, सुमात्रा, कांबोडिया, बोर्निओ वगैरे ठिकाणीं जाऊन दक्षिणी लोक स्थाईक झाले व तेथें त्यांनीं हिंदी कला व संस्कृति याचा शिरकाव केला. याशिवाय ब्रम्हदेश, सयाम, व इंडो–चायनांमध्येंही हिंदुस्थानच्या वसाहती होत्या. इतकंच नव्हेतर, त्यांनीं आपल्या नवीन शहरांना व वसाहतींना हस्तिनापूर, तक्षीला, गांधार हीं नावें देतांना हिंदुस्थानचीच उसन-वारी केली. इतिहासाची पुनरावृत्ति कशी होते तें पहा! अमेरिकेंत गेलेल्या अँग्लो–सॅक्सन वसाहतवाल्यांनीं हाच धडा गिरवला व त्यामुळें युनायटेड स्टेट्समध्यें जुन्या इंग्लिश शहरांच्या नांवांची पुनरावृत्ति झाल्याची दिसते.

अर्थात् सर्व वसाहतवाल्याप्रमाणें हे हिंदी वसाहतवालेही ज्या ज्या ठिकाणीं जात त्या त्या ठिकाणीं अनाचार करीत, यांत शंका नाहीं. वसाहतींतील मूळच्या रहिवाश्यांना लुबाडून त्यांनीं त्यांच्यावर वर्चस्व गाजविलं; पण हिंदुस्थानशीं नियमित दळणवळण ठेवणं कठीण झाल्यामुळें पुढें हे वसाहतवालें तेथील मूळच्या राहिवाश्यांत मिसळून गेलें असले पाहिजेत. या पौर्वात्य बेटांवर हिंदु राज्यें व साम्राज्यें उदयास आलीं. नंतर बौध्यराज्यकर्ते आले व या दोघांत वर्चस्वाकरितां चुरस लागली. या चुरशीची हकीगत मोठी मनोरंजक व चित्तवेधक असून तिला ‘ व्यापक हिंदुस्थान ’ चा इतिहास म्हणतात. तेथील मोठमोठ्या अवशेषांवरून या हिंदी वसाहतींतील तत्कालीन भव्य इमारती व देवालयें यांची कल्पना

येते. कम्बोज, श्रीविजय, वैभवशाली अंगकोर, मदजापहित, हीं मोठीं शहरें उभारण्यांत हिंदी शिल्पकार व कारागीर यांचा हात होता.

सुमारें १४०० वर्षें हिंदी व बौद्ध राज्यें या बेटांत होतीं. प्रभुत्वा-करितां त्यांची चुरस असून त्याचे दोन हात होत व क्वचित् प्रसंगीं ते एकमेकांचा नाश करीत. शेवटीं पंधराव्या शतकांत मुसलमानांनीं या बेटावर वर्चस्व बसाविलं व लवकरच पोर्तुगीज, स्पॅनिश, डच, इंग्लीश व सर्वांमागून अमेरिकन लोक तेथें आले. चिनी लोक अर्थातच निकटचे शेजारी असून कधीं कधीं ते बेटांच्या कारभारांत हस्तक्षेप करून तीं हस्तगत करीत; पण बहुधा त्यांचे संबंध मित्रत्वाचे असून ते एकमेकांना नजराणा देत, हा सर्वकाळ त्यांच्या महान् संस्कृतिसुधारणाचा पगडा या बेटांवर बसतच होता.

या पूर्वेकडील हिंदु वसाहतींतील अनेक गोष्टी उद्बोधक आहेत. सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे दक्षिण हिंदुस्थानांतील त्या वेळच्या एका प्रमुख राज्यानं वसाहतींची योजना हातीं घेतली होती. प्रथम एकएकटे अ संशोधक गेले असले पाहिजेत. पुढें जशी व्यापाराची अभिवृद्धि होऊं लागली तसतशी कुटुंबें, टोळ्या स्वतःच्या जबाबदारीवर गेल्या असल्या पाहिजेत. असं म्हणतात कीं, प्रारंभीचे वसाहतवाले कलिंग ( ओरिसा ) व पूर्व किनाऱ्यावरील होते. बंगालमधूनही कांहीं लोक गेले असावेत. आपल्या शेतीला मुकलेले गुजराथमधील कांहीं लोक या बेटावर गेले अशीही माहिती मिळते; पण हे केवळ तर्क वितर्कच. वसाहतवाल्यांचा मोठा लोंढा पालव देशांतून—तामिळच्या दक्षिण भागांतून निघाला. यावेळीं तेथे पालव नांवाच्या बलाढ्य वंशाचं राज्य असून याच घराण्यानं मलाशियामध्यें

वसाहती करण्याची योजना हातीं घेतली असं दिसतं. कदाचित उत्तर हिंदुस्थानांतील लोक खालीं सरकूं लागल्यामुळें लोकसंख्येवर ताण पडूं लागला असावा. कारण कांहीं कां असेना हिंदुस्थानापासून दूर, इतस्ततः पसरलेल्या प्रदेशांत वसाहती करण्याची योजना मुद्दाम आंखण्यांत आली व या सर्व स्थळीं जवळ जवळ एकाच सुमारास वसाहतींना प्रारंभ झाला हें खरें. इंडोचायना, मलायाद्वीपकल्प, बोर्निओ, सुमात्रा, जावा वगैरे ठिकाणच्या वसाहती म्हणजे हिंदी नावें धारण करणाऱ्या पालव वसाहती होत. इंडोचायनांमधील वसाहतीला कंम्बोड (सध्यांचे कम्बोडिया) म्हणत. हें नांव गांधार देशांतील काबूल खोऱ्यांत असलेल्या कम्बोजवरून आलं.

सुमारें ४००—५०० वर्षे वसाहती धार्मिक दृष्ट्या हिंदूच राहिल्या. पुढें बौद्धधर्म हळूं हळूं पसरूं लागला व बऱ्याच उशीरा मुसलमानी धर्म आला. मलाशियाच्या एका भागांत हा धर्म फैलावला, तर एक भाग बौद्धधर्मीय राहिला.

मलाशियामध्यें साम्राज्यें नि राज्यें आलीं व गेलीं. तथापि, दक्षिण हिंदुस्थानच्या वसाहतिक योजनांची परिणति म्हणजे या भागांत हिंदी—आर्य—संस्कृतीतीची प्रविष्टता. कांहीं मर्यादेपर्यंत मलाशियातील आजचे लोक म्हणजे आपल्याच संस्कृतीची अपत्यें होत. या शिवाय त्यांच्यावर इतरही, विशेषतः चिनी संस्कृतीची छाप पडली. चिनी व हिंदी या दोन प्रभावी प्रवृत्तींचा मलाशियांतील निरनिराळ्या देशांवर कसा परिणाम झाला हें पाहणं उद्बोधक आहे. कांहींचं हिंदीकरण अधिक प्रमाणांत झालं आहे तर कांहीं टिकाणीं चिनी अंश विशेष रीतीनं दिसतो. मुख्य भूप्रदे-

यापैकीं मलाया खेरीज करून ब्रह्मदेश, सयाम, इंडोचायना यांठिकाणीं चिनी प्रवृत्तीचं वर्चस्व दिसतं. जावा सुमात्रा आदि करून या बेटांत हिंदी प्रवृत्ति प्रकर्षानं असून त्यावर नंतरच्या काळांतील इस्लामाची छाप दिसते.

या हिंदी व चिनी प्रवृत्तींत तेढ नव्हती. त्यांच्यात साम्य नव्हतं तरी अडचणी न येतां त्या समांतर दृष्टया कार्य करूं शकल्या. त्या धर्मांच्या बाबतींत मग तो हिंदुधर्म असो वा बौद्धधर्म असो, हिंदुस्थान हें अर्थातच उगमस्थान होतं. कलेच्या बाबतीतसुद्धां हिंदी प्रवृत्ति मलाशियामध्यें परमोच्च होती. खुद्द इंडोचायनामध्यें चिनी प्रवृत्ति प्रभावी असूनही तेथील शिल्पकला संपूर्णत: हिंदी पध्दतीची होती. या उलट या देशांतील राज्यपध्दति, जीवनाचें सर्वसाधारण तत्त्वज्ञान, या बाबतींत चीनचा विशेष प्रभाव दिसून येत होता. याचा परिणाम म्हणजे इंडोचायना, सयाम, ब्रम्हदेशातील लोक हिंदुस्थानापेक्षां चीनला जवळ असल्यासारखे वाटत. तसंच वांशिकदृष्टया त्यांच्यात मंगोलियन रक्त अधिक उतरलं असल्यानं चिनी लोकांशीं त्यांचं साम्य आहे.

हिंदी कारागिरांनीं बांधलेल्या भव्य देवालयांचे अवशेष, आजही जावांतील बोरोबोदूर येथें दृष्टीस पडतात. बुद्धाचा सर्व जीवन—वृत्तांत या देवालयांतील भिंतीवर कोरलेला असून तीं देवालयें म्हणजे बुध्दाचींच नव्हे तर तत्कालिन हिंदी कलेचीं अपूर्व स्मारकें होत.

पण हिंदी संस्कृतीनं याहीपलिकडे मजल मारली होती. फिलीपाईन, इतकंच नव्हेतर फोर्मोसांतही तिनं प्रवेश केला होता. हे दोन्ही देश कांहीं काळ श्रीविजयाच्या साम्राज्यांत मोडत असुन पुढं बऱ्याच वर्षांनीं फिलिपाईन स्पॅनिशांच्या अंमलाखालीं गेलं व आतां तेथें अमेरिकनांची सत्ता

आहे. मनिला ही फिलिपाईनची राजधानी. थोड्यांच वर्षापूर्वी तेथे कायदे मंडळाची एक नवीन इमारत उभारण्यांत आली व या इमारतीच्या दर्शनी भागावर फिलिपाईन संस्कृतीची उत्पत्ति दर्शविणाऱ्या चार आकृति कोरण्यांत आल्या आहेत. यापैकी एक प्राचीन हिंदुस्थानांतील प्रख्यात कायदे-प्रवर्तक मनू याची असून, दुसरी चीनचा तत्वज्ञानी लावो-त्सी याची आहे. बाकीच्या दोन अँग्लो-सॅक्सन कायदा व न्याय तसेच स्पेन यांची प्रतीकें होत.

---

## ३८

# गुप्त अंमलाखालील हिंदू–साम्राज्य

२९ एप्रिल १९३२

दक्षिण हिंदुस्थानातील लोक, समुद्रपर्यटनें करून दूरदूरच्या देशांत वसाहती व शहरें स्थापत असतां उत्तर हिंदुस्थानांत एक निराळाच क्षोभ निर्माण झाला होता. कुश साम्राज्याचा जोम नि वैभव नाहींसं होऊन त्याचा विस्तार घटत चालला होता. सर्व उत्तर हिंदुस्थानांत छोटीं राज्यं निर्माण झालीं असून त्यावर बव्हंशी सरहद्दीकडून आलेल्या शक, सिथियन किंवा तुर्की लोकाचं अधिपत्य होतं आणि हे लोक बौध्दधर्मीय होते. मध्य आशियांतील टोळ्यांवर पाठीमागून चिनी सरकारचं जें दडपण येई त्याचा परिणाम म्हणजे त्या टोळ्या या लोकांनां दयामाया न दाखविता पुढें चेपीत असत. हिंदुस्थानांत आल्यावर या लोकांनीं बव्हंशी हिंदी–आर्य चालीरिती व रुढी स्वीकारल्या. हिंदुस्थानकडे ते धर्म, संस्कृति व सुधारणा यांचं माहेरघर या दृष्टीनं पहात. कुश लोक स्वतः बऱ्याच प्रमाणांत हिंदी–आर्य रुढी प्रमाणें वागत व याचमुळें त्यांना हिंदुस्थानांत राहतां येऊन मोठ्या भागावर इतका काळ राज्य करतां आलं. हिंदी आर्यांची रहाणी त्यांनीं उचलण्याचा प्रयत्न केला. आपण कोणी परके आहोंत हें या देशांतील लोकांनीं विसरून जावं असं त्यानां वाटे. या बाबतींत त्यांनां कांहींसं यश आलं. तरी मूळच्या क्षत्रियांना आपल्यावर कोणी [illegible] राज्य करीत आहेत हें शल्य डांचतच होतं.

परकीय सत्तेमुळें ते जळफळत आणि त्याचा परिणाम म्हणजे लोकांचीं मन प्रक्षुब्ध झालीं. या असंतुष्ट लोकांना एक कर्तबगार नेता मिळाला व त्याच्या निशाणाखालीं त्यांनीं आर्यावर्ताच्या मुक्ततेसाठीं " पवित्र युध्दा " ची घोषणा केली.

या पुढाऱ्याचं नांव चंद्रगुप्त. दुसऱ्या चंद्रगुप्तशीं-अशोकच्या पितामहाशीं-याच्या नावाचा गोंधळ करूं नकोस. याचा मौर्यवंशाशीं कांहींच संबंध नाहीं. हा एक पाटलीपुत्र येथील छोटा राजा होता. यावेळीं अशोकाचे वंशज स्मृतीच्या पडद्याआड झाले होते. लक्षांत ठेव, आपण ख्रिस्तानंतरच्या चौथ्या शतकांत सुमारें ३०८ मध्यें आहोंत. यावेळीं अशोकाचा मृत्यू होऊन ५३४ वर्षें लोटलीं होतीं.

हा चंद्रगुप्त महत्वाकांक्षी व तडफदार होता. उत्तर-हिंदुस्थानांतील बाकीच्या आर्य अधिपतींना आपल्या बाजूस वळवून एक प्रकारची संयुक्त राज्यघटना बनविण्याचं कार्य त्यानं हातीं घेतलं. लिच्छवी या प्रख्यात व बलाढ्य घराण्यांतील कुमारी देवीशी विवाह करून त्यानं या घराण्याचं सहाय्य मिळविलं. अशारीतीनं सर्व सिध्दता झाल्यावर चंद्रगुप्तानं परकीय राज्यकर्त्यांविरुध्द " पवित्र युध्द " पुकारलं. परकीय अंमलाखालीं सत्ता व अधिकार यांना मुकलेले सर्व आर्य सरदार चंद्रगुप्ताच्या झेंड्याखालीं गोळा झाले एक तपाच्या युध्दानंतर चंद्रगुप्त, उत्तर हिंदुस्थानचा कांहीं भाग, -संयुक्त प्रांतासह-पादाक्रांत करूं शकला. यानंतर सम्राट या नात्यानं त्यानं आपल्याला राज्याभिषेक करून घेतला.

चंद्रगुप्तापासून गुप्तवंशाला सुरवात झाली. सुमारें २०० वर्षें या वंशानं राज्य केल्यावर हूणांच्या स्वाऱ्या सुरूं झाल्या. गुप्तवंशीय काळ

म्हणजे काहीसा प्रखर हिंदुत्व व राष्ट्रियत्वाचा काळ होय. तुर्की, पार्थियन आदिकरून सर्व यवनांना उखडून काढून त्यांना घालवून देण्यांत आलं. यावेळीं वांशिक विरोधाची प्रवृत्ति दिसून विशेष: येते. हिंदी-आर्यांना बरीचशी आपल्या वंशाबद्दल अभिमान असून ते या "रानटी" लोकांकडे व म्लेच्छांकडे हेटाळणीच्या दृष्टीनं पहात. गुप्तांनीं पराभव केलेल्या हिंदी-आर्य राजांना सौम्यपणानं वागविलं; पण यवनांच्या बाबतींत दयेमायेला जागा नव्हती.

चंद्रगुप्ताचा मुलगा समुद्रगुप्त हा आपल्या पित्यापेक्षांही बडफार योध्दा निघाला. तो महान सेनापति असून सम्राट झाल्याबरोबर त्यानं सर्व देशभर व दक्षिणेकडे विजयी मोहिमा केल्या. गुप्त साम्राज्याचा विस्तार बराच वाढवून त्यानं हिंदुस्थानचा मोठा भाग आपल्या सत्तेखालीं आणला; पण दक्षिणेवरील त्याचं प्रभुत्व मात्र नाममात्रच होतं. उत्तरेकडे कुशानां सिंधुनदाच्या पलीकडे पिटाळण्यात आलं होतं.

समुद्रगुप्ताचा पुत्र दुसरा-चंद्रगुप्त हाही योध्दा होता. बराच काळ शक किंवा तुर्की घराण्याच्या अमलाखालीं असलेले काठेवाड व गुजराथ हे दोन प्रांत त्यानं हस्तगत केले. त्यानं विक्रमादित्य हें नांव धारण केलं व याच नावानं त्याला सर्वजण ओळखतात; पण सीझरप्रमाणें हें नांव पुढें अनेक राजांनीं धारण केल्यामुळें बराच गोंधळ उडतो.

दिल्लीतील कुतुबमिनारजवळचा हा भव्य लोहस्तंभ पाहिल्याचं तुला आठवतं का? विक्रमादित्यानं एक प्रकारचं विजय चिन्ह म्हणून तो उभारला असं म्हणतात. हा मनोरा मनोहर कृतीचा उत्कृष्ट नमुना असून त्याच्या कळसावर साम्राज्याचं चिन्ह म्हणून कमळाचं चित्र कोरण्यांत आलं आहे.

गुप्तकाळ म्हणजे यादेशांतील हिंदुसाम्राज्यशाहीचा काळ होय. यावेळीं प्राचीन आर्यसंस्कृति व संस्कृत विद्यांचं मोठं पुनरुज्जीवन झालं. ग्रीक, कुश प्रभृति लोकांनीं हिंदी जीवनक्रम व संस्कृतींत समाविष्ट केलेल्या ग्रीक, मंगोलियन या घटकांना उत्तेजन मिळालं नाहींच; उलट हिंदी-आर्य परंपरेवर विशेष भर देऊन त्यानां बुद्धिपुरस्सर दडपून टाकण्यात आलं. संस्कृत ही दरबारची अधिकृत भाषा, पण त्या काळांत ती सामान्य लोकांच्या प्रचारांतील भाषा नव्हती. प्राकृत ही सर्व सामान्य बोली असून तिचं संस्कृतशीं बरंच साम्य होतं. अर्थात संस्कृत ही प्रचारांतील भाषा नसली तरी, बरीचशी जिवंत भाषा असून यावेळीं संस्कृत काव्यें, नाटकें व हिंदी-आर्य कालकृतींचा फुलोरा फुलला होता. वेद खंडकाव्यांच्या वैभवशाली कालानंतर गुप्तकाळ म्हणजे संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासांतील सर्वांत दैदिप्यमान काळ होय. कालिदास हा अद्वितीय साहित्यिक याच काळांत होऊन गेला. विक्रमादित्याचा दरबार तेज:पुंज असून या दरबारांत तत्कालिन सर्व श्रेष्ठ साहित्यिक व कलावंत जमा झालेले होते. या दरबारांतील नवरत्नाबद्दल तूं ऐकलं असशीलच. कालिदास या नवरत्नांपैकींच एक होता.

समुद्रगुप्तानं आपली राजधानी पाटलीपुत्राहून अयोध्या येथें नेली होती. वाल्मिकीनं रचलेल्या महाकाव्यांतील—रामचंद्राच्या अमरकथेंतील—ही नगरी आपल्या प्रखर हिंदी-आर्य दृष्टीकोनाला अधिक योग्य पार्श्वभूमि ठरेल, असं त्याला वाटलं असावं.

गुप्तांच्या कारकीर्दीतील पुनरुज्जीवनांत आर्य किंवा हिंदुधर्माचा काल स्वाभाविकपणच बौद्धधर्माला फारसा अनुकूल नव्हता. याचं एक

कारण म्हणजे ही पुनरुज्जीवनाची चळवळ कांहींशी सरदारी असून तिच्यामागं क्षत्रिय सरदारवर्ग होता; तर बौध्दधर्मांत लोकशाही अधिक होती. आणि दुसरं एक कारण म्हणजे बौध्दधर्मातील महायान पंथाचा उत्तरेकडील कुश आदी करून यावनी राज्यकर्त्यांशीं निकटचा संबंध होता. मात्र यावेळीं बौध्यधर्मियांचा छळ झालेला दिसत नाहीं बौध्द विहारे अस्तित्वांत असून ती अद्यापही मोठीं शैक्षणिक केंद्रं समजलीं जात. गुप्त राजांचे सीलोनच्या राज्यकर्त्यांशीं सलोख्याचे संबंध असून सिलोनमध्यें तर बौध्यधर्म अस्तित्वांत होता. सीलोनचा राजा मेघवर्ण यानं समुद्रगुप्ताकडे मौल्यवान नजराणा पाठवून, गया येथें सिंहली विद्यार्थ्यांकरिता एक विहारही स्थापिलं होतं.

पण एकंदरींत बौद्धधर्माला हिंदुस्थायानांत उतरती कळा लागली. अर्थात याचं कारण ब्राह्मणवर्ग किंवा तत्कालिन सरदार यांचं बाहेरील दडपण हें नसून हिंदुधर्माची हळू हळू ग्रहण करून घेण्याची शक्ति हीच प्रामुख्यानं कारणीभूत होती.

याच सुमारास एका प्रसिद्ध चिनी प्रवाशानं—ह्युएन शँगनं नव्हे—, तर मी तुला ज्याच्याविषयीं मागं सांगितलं आहे त्या फा—हिएननं, हिंदुस्थानला भेट दिली. एक बौद्धधर्मीय या नात्यानं बौध्दधर्मीय पवित्र-ग्रंथांच्या शोधार्थ तो आला होता. तो म्हणतो “ मगधाचे प्रजाजन सुखी व संपन्न आहेत. न्यायदान पध्दति सौम्य असून देहांत शासन अमलांत नाहीं. गया नाशवंत व निर्जन स्थितींत आहे, कपिलावस्तूच्या ठिकाणी अरण्य वाढलेलं आहे; पण पाटलीपुत्रांतील लोक धनवान, उन्नत स्थितींत असून सद्गुणी आहेत. ” या काळांत अनेक संपन्न व भव्य बौद्ध विहा

अस्तित्वांत होतो. मुख्य रस्त्यावर धर्मशाळा असून, या ठिकाणीं प्रवाशांना मुक्काम करतां येई व त्यांना अन्नसामुग्री सार्वजनिक खर्चानं पुरविण्यांत येई. मोठमोठ्या शहरांतून मोफत दवाखाने होते.

सर्व हिंदुस्थानात फिरल्यावर फा–हिएन सीलोनमध्यें गेला. तेथें तो दोन वर्षे होता. ताओ–चिंग नांवाच्या त्याच्या एका सहकाऱ्याला हिंदुस्थान देश फारच आवडला; आणि बौद्ध भिक्षूच्या धर्मनिष्ठेचा तर त्याच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, त्यानं हिंदुस्थानांतच वास्तव्य करण्याचं ठरविलं. फा–हिएन सिलोनहून समुद्रमार्गे चीनकडे रवाना झाला व अनेक साहसं नि अनेक वर्षांनंतर मायदेशाला जाऊन पोहोचला.

दुसऱ्या चंद्रगुप्तानं किंवा विक्रमादित्यानं सुमारें २३ वर्षे राज्य केल्यावर त्याचा मुलगा कुमारगुप्त गादीवर आला. कुमारगुप्तानं दीर्घकाळ —४० वर्षे—राज्य केलं. यानंतर सन ४५३ मध्यें, स्कंदगुप्त गादीवर आला. त्याला एका नवीन आरिष्टाला तोंड द्यावं लागलं व शेवटीं हेंच अरिष्ट बलाढ्य गुप्त साम्राज्याच्या नाशाला कारणीभूत झालं. पण त्याविषयीं मी तुला पुढील पत्रांत सांगेन.

अजंठा येथील कांहीं सर्वोत्कृष्ट कोरीव लेणीं व त्याचप्रमाणें तेथील दिवाणखाने व देवालयें गुप्त–कालीन कलाकृतींचे नमुने होत. प्रत्यक्ष पाहिल्यावर या कृति किती आश्चर्यकारक आहेत, हें तुला कळून येईल. खेदाची गोष्ट ही कीं हीं लेणीं हळूं हळूं नाहीशीं होत आहेत. खुल्या स्थितींत तीं फार काळ टिकाव धरूं शकणार नाहींत असं दिसतं.

हिंदुस्थानांत गुप्तांचा अंमल असतां जगाच्या बाकीच्या भागांत काय चाललं होतं? पहिला चंद्रगुप्त हा कॉन्स्टँटिनोपलचा संस्थापक

कॉन्स्टन्टाईन दी ग्रेट या रोमन बादशहाचा समकालीन. नंतरच्या गुप्त राजांच्या अमदानींत रोमन साम्राज्याचं पूर्वेकडील व पश्चिमेकडील साम्राज्य असें दोन भाग पडून, शेवटीं पश्चिमेकडील साम्राज्य त्याच्या उत्तरेकडील रानटी टोळ्यांनीं जमीनदोस्त केलं. अशारीतीनं रोमन साम्राज्य दुर्बल बनत असतां हिंदुस्थानांत बलाढ्य राज्य असून, मोठमोठे सेनापति व प्रबल सैन्यें तेथें होतीं. कांहीं कांहीं वेळेला समुद्रगुप्ताचा " हिंदुस्थानचा नेपोलियन " म्हणून उल्लेख करण्यांत येतो; पण तो जरी महत्वाकांक्षी असला तरी पादाक्रांत करण्यासाठीं त्याची नजर हिंदुस्थानच्या सरहद्दीपलीकडे वळली नाहीं, हें लक्षांत घेण्याजोगं आहे.

गुप्त कारकीर्द म्हणजे प्रखर साम्राज्यशाही, पादाक्रांत व विजय यांचा काल. अर्थात, प्रत्येक देशाच्या इतिहासांत असा साम्राज्यशाहीचा काळ येऊन जातो व परिणामीं त्यांला थोडं फार महत्व असतं. गुप्तकाळ प्रामुख्यानं नजरेंत भरण्याचं व हिंदुस्थानच्या दृष्टीनं अभिमानास्पद वाटण्याचं कारण म्हणते या काळांतील कला, वाङ्मय यांचं अद्‌भूत पुनरुज्जीवन !

---

३९

# हूणांचे हिंदुस्थानांत आगमन.

ता. ४ मे, १९३२

वायव्यपठारावरून, हिंदुस्थानवर आलेलं आरिष्ट म्हणजे, हूणांचं आरिष्ट रोमन साम्राज्याची चर्चा करीत असतां, मी तुला हूणांबद्दल थोडंफार सांगितलंच आहे. युरोपांतील त्यांचा मुख्य पुढारी अतिला हा असून, कित्येक वर्षं त्यानं रोम व कॉन्स्टॅन्टीनोपलचा थरकांप उडवून दिला होता. या हूणांसारखे जे श्वेतहूण नांवाचे लोक, ते याच सुमारास हिंदुस्थानांत आले. हे लोकही मध्य आशियांतील भटकेच होत. दीर्घ कालपर्यंत त्यांनीं सरहद्दीवर घिरट्या घालून बराच धुमाकूळ माजविला होता. लोकसंख्या वाढत चालली, म्हणून म्हणा किंवा पाठिमागून, इतर टोळ्यांचं दडपण असल्यामुळें म्हणा, त्यांनीं स्वाऱ्या करायला सुरवात केली.

गुप्त घराण्यांतील पांचव्या राजाला, स्कंधगुप्ताला हूणांच्या स्वाऱ्यांना तोंड द्यावं लागलं. त्यानं त्यांचा पराभव करून, त्याना पिटाळून लावलं खर पण एक तपानंतर पुन्हां ते आले. हळूं हळूं सर्व गांधार देशभर पसरत जाऊन त्यांनीं उत्तर हिंदुस्थानचा मोठा भाग व्यापला. बौध्द धर्मियांचा छळ व इतर अघोरकृत्यांना ते जबाबदार होते.

त्यांच्याशीं सारख्या लढाया चालूं असल्या तरी गुप्ताना, त्यांना हांकून देतां आलं नाहीं. हूणांची नवीन लाट येऊन, मध्यहिंदुस्थानभर

पसरली व तोरोमन या हूणांच्या नेत्यानं राज्यपद धारण केलं. तोरोमन अतिशय वाईट होता; पण त्याच्या मागून आलेला मिहिरागूल हा तर क्रूरपशु व कर्दनकाळच होता. उंच उंच कड्यावरून हत्ती खालीं ढकलून देणं, हा मिहिरागूलचा एक करमणुकीचा प्रकार होता, असं कल्हणनं आपल्या काश्मिरच्या इतिहासांत—राजतरंगिणींत—नमूद केलं आहे. शेवटीं त्याच्या अघोरी कृत्यांनीं सर्व आर्यावर्त प्रक्षुब्ध झाला व गुप्तवंशांतील बलादित्य व मध्यहिंदुस्थानांतील यशोधर्मन या दोघां राजांच्या निशाणाखालीं आर्यांनीं गोळा होऊन हूणांचा मोड केला व मिहीरागुलला कैद केलं; पण बलादित्य फार उदार होता. त्यानं मिहीरागुलला मुक्त करून त्याला देशाबाहेर जाण्यास सांगितलं. मिहिरागुलनं काश्मीरमध्यें आश्रय घेतला व पुढें, ज्या बलादित्यानं त्याला उदारपणें वागविलं होतं, त्याच्यावरच त्यानं विश्वासघातानं हल्ला केला.

हळुं हळूं हूणांची हिंदुस्थानांतील सत्ता कमजोर झाली; पण कित्येक हूणांचे वंशज येथें स्थायिक होऊन, क्रमशः आर्यांत मिसळून गेले. मध्यहिंदुस्थान व राजपुतान्यांतील आपल्या कांहीं रजपूत बांधवांत श्वेत हूणांच्या रक्ताचा अंश असणं शक्य आहे. हूणांनीं अल्पकाळच—पन्नास वर्षांहूनही कमी काळ राज्य केलं. पुढें ते शांतपणें स्थायिक झाले; पण हूणयुध्दें व त्यांचे अत्याचार यांचा हिंदी आर्यांवर मोठाच परिणाम झाला. हूणांचा जीवनक्रम व त्यांची राज्यपद्धत आर्यांपेक्षां फारच वेगळी होती. यावेळींही आर्यलोक बऱ्याच प्रमाणांत स्वातंत्र्यप्रिय होते. आर्य राजांनाही लोकमतापुढें नमावं लागे व त्यांच्या ग्रामसभांना मोठाच अधिकार होता.

बलादित्य हा गुप्त घराण्यांतील शेवटचा राजा सन ५३० मध्यें मरण पावला. नमूद करण्याजोगी गोष्ट ही कीं, हा राजा एका नमुनेदार आर्य घराण्यांतील असूनही तो बौद्ध धर्माकडे आकृष्ट झाला होता. त्याचा गुरुही एक बौद्ध भिक्षू होता. कृष्णपूजेच्या पुनरुज्जीवनाबद्दल, गुप्त कारकीर्द विशेष प्रसिध्द आहे. तेव्हां बौध्दधर्माशीं उघड अशी तेढ उद्भवल्याचें दिसत नाहीं.

गुप्त घराण्याच्या २०० वर्षांच्या कारकिर्दीनंतर कोणत्याही मध्यवर्ति सत्तेला जबाबदार नसलेलीं अशीं अनेक स्वतंत्र संस्थानें उत्तरेकडे उद्भवलीं. दक्षिण हिंदुस्थानांत मात्र एक बलाढ्य राज्य विकास पावत होतें. स्वतःला रामचंद्राच्या वंशांतील म्हणविणाऱ्या, पुलकेशीन नांवाच्या एका राजानें दक्षिणेंत चालुक्य नांवाचें साम्राज्य स्थापलें. यावेळीं दक्षिणी लोकांचा पूर्वेकडील बेटांतील हिंदी वसाहतींशीं निकटचा संबंध असून हीं बेटं व हिंदुस्थान यांच्यांत अनिर्बंध व्यापार चालू असला पाहिजे. याशिवाय, हिंदी जहाजांतून इराणकडे वारंवार माल रवाना होत असल्यांचेंही दिसून येतें. चालुक्यवंशीय राजे व इराणचे ससॉनिड्स, विशेषतः त्यांच्यांतील खुशरु ( दुसरा ) यांचे परस्परांच्या दरबारांत वकील होते.

## ४०

# हिंदुस्थानचें परकीय बाजारपेठांवर नियंत्रण

ता. ५ मे, १९३२

ज्या भागाचा आपण सध्यां विचार करीत आहोत त्या थेट १००० वर्षांत, हिंदुस्थानचा पश्चिम युरोप, पश्चिम आशिया व पूर्वेकडे अगदी चीनपर्यंत व्यापार चालू असल्याचं दिसून येतं. याचं कारण तत्कालीन हिंदीलोक, उत्कृष्ट खलाशी नि तरबेज व्यापारी होते यांत संशय नाहीं. तसंच त्यांचें उद्योगधंद्यांतील कौशल्य दांडगं होतं, याबद्दलही वाद नाहीं; पण त्यांच्या उत्कर्षाला एवढेंच कारणं नव्हतीं. दूरदूरच्या बाजारपेठांतील हिंदुस्थानच्या नियंत्रणाचं एक प्रमुख कारण म्हणजे हिंदुस्थानची रसायनशास्त्रांतील, विशेषतः रंगकामांतील प्रगति हें असावं, असं दिसतं. तत्कालीन हिंदी लोकानीं कापडांचें रंगकाम पक्के व्हावं यासाठीं कांहीं विशेष साधनं सोधून काढलीं होतीं. याशिवाय, एका विशिष्ट वनस्पतीपासून, नीळ तयार करण्याची पध्दतही त्यांना माहित होती. तुला दिसून येईल कीं, निळीला असलेला प्रतिशब्द Indigo हा India ( हिंदुस्थान ) या शब्दावरून आलेला आहे. याशिवाय पोलादाला पाणी देऊन, उत्कृष्ट पोलादी शस्त्रें बनविण्याची कला तत्कालीन हिंदी लोकांना अवगत असावी. अॅलेक्झांडरच्या स्वाऱ्या संबंधीच्या जुन्या इराणीकथांतून, उत्तम तरवारी, खंजीर यांचा उल्लेख असल्याचं मी तुला सांगितलेलंच आठवत असेलच. त्या तरवारी नि खंजीर हिंदुस्थानांतून आल्याचं नमूद करण्यांत आलं आहे.

कोणत्याही देशांपेक्षां, रंग व इतर जिन्नस हिंदुस्थानांत चांगले होत असल्यामुळें, हिंदुस्थानचं या बाजारपेठांवर प्रभुत्व असावं, हें सहाजिक होतं. ज्या व्यक्तीजवळ अगर देशाजवळ, अधिक चांगलें हत्यार किंवा कोणताही जिन्नस तयार करण्याची अधिक चांगली अगर सुलभ पद्धत असते, ती व्यक्ति अगर तो देश, ज्यांच्याजवळ तितकं चांगलं हत्यार अगर तितकीशी चांगली पद्धति नाहीं, अशा व्यक्तीचं अगर देशाचं कधीं ना कधीं उच्चाटण करणारच. गेल्या २०० वर्षांत, युरोप आशियाच्या पुढें जाण्याचं कारण झालं तरी हेंच. नवीन नवीन शोधामुळें, युरोपला नवीन व जोरकस हत्यारें आणि माल तयार करण्याची नवीन साधनें उपलब्ध झालीं आणि त्यांच्या जोरावर जगाच्या बाजारपेठा काबीज करून युरोप प्रबल व धनाढ्य बनलें. युरोपच्या भरभराटीला आणखीही कांहीं कारणं होतीं; पण सध्यां, तूं हत्याराचें महत्व किती आहे एवढंच लक्षांत घ्यावंस असं मला वाटतं. "मनुष्य हा हत्यारें बनविणारा प्राणी आहे," असं एका थोर पुरुषानं एकदां उद्गार काढले होते. आणि पाषाण युगांतील आरंभीचे शीला, बाण व हातोडे यापासून, आजच्या रेल्वे, वाफेचीं इंजिनें व अवाढव्य यंत्रे यापर्यंतचा, प्राचीन काळापासूनचा तो हल्लींच्या काळापर्यंतचा मनुष्याचा इतिहास म्हणजे, अधिकाधिक कार्यक्रम हत्यारांचांच इतिहास होय. वस्तुतः प्रत्येक बाबतींत हत्यारांची गरज असते. खरंच हत्याराभावीं आपली काय गत होईल!

हत्यार ही चांगली वस्तु आहे, त्यामुळं आपलं काम हलकं होतं; पण हत्याराचा दुरुपयोगही होऊं शकतो. करवत हें उपयुक्त हत्यार आहे; पण एकादं मूल त्यामुळें, आपल्याला दुखापत करून घेईल.

चाकू ही तर एक अत्यंत उपयोगी वस्तू! प्रत्येक बालवीराजवळ ती असणं आवश्यक आहे. तरी सुध्दां एकादा मूर्ख मुलगा त्याचा उपयोग दुसऱ्याचा जीव घेण्याकरितांही करील. अर्थात हा दोष बिचाऱ्या चाकूचा नाही; दोष आहे तो त्याचा दुरुपयोग करणाऱ्या व्यक्तीचा.

याच प्रमाणें, आधुनिक यंत्रसामुग्री मूलतः उपयुक्त असली तरी तिचा अनेक प्रकारें दुरुपयोग होई व होत आहे. जनतेच्या कामाचा बोजा हालका करण्याऐवजीं हत्यारामुळें त्यांचं जीवित आधिकच दुःसह झालं आहे. लाखों लोकांना त्यामुळें सुखसमाधान मिळालं पाहिजे होतं; पण त्याऐवजी असंख्यांच्या नशिबी विपन्नावस्थाच आली. हत्यारामुळें सरकारच्या हातांत इतकी सत्ता आली आहे कीं, त्यामुळं ते स्वतःच्या युध्दांत लाखों लोकांच्या कत्तली उडवूं शकतें.

पण हा दोष यंत्राचा नसून, तिचा दुरुपयोग करणारांचा आहे. केवळ पैसा करण्यासाठीं धडपडणाऱ्या बेजबाबदार लोकांऐवजीं, जनतेचं त्यावर नियंत्रण राहून जनतेच्याच हिताकरितां, त्याचा उपयोग केला जाईल तर केवढा मोठा बदल होईल! असो.

त्या काळांत आजच्या आगदीं उलट पध्दती होती. माल बनविण्याबाबतींत, हिंदुस्थान जगांत अग्रेसर होता. सहाजिकच हिंदी कापड, रंग व इतर वस्तू दूरदूरच्या देशांत निर्यात होत व त्यांना मागणीही असे. या व्यापारामुळें हिंदुस्थानांत संपत्ति आली. इतकंच नव्हे तर, या व्यापाराशिवाय दक्षिण हिंदुस्थान मिरी मिरची व इतर मसाल्यांचाही पुरवठा करी. तसंच पूर्वेकडील बेटांतूनही मसाले, हिंदुस्थानमार्गे पश्चिमेकडे निर्यात होत.

मिरी मिरचीला रोम व पाश्चिमात्य राष्ट्रांत फारच किंमत येई. असें म्हणतात की, गॉथचा नायक ॲलारिक यानें सन ४१० मध्यें रोम काबीज केल्यावर तेथून ३००० पौंड मिरीमिरची नेली. ही सर्व मिरी मिरची हिंदुस्थानांतून किंवा हिंदुस्थान मार्गें आली असली पाहिजे हें निःसंशय!

# देशांच्या व संस्कृतीच्या इतिहासांतील चढउतार

ता. ६ मे १९३२

चीनचा विचार करून फार दिवस झाले. चीनमध्यें परत जाऊन तेथील हकिगत पुढें चालू करूं. पश्चिमेकडे रोमचं पतन आणि हिंदुस्थानांत गुप्त राजांच्या अंमलाखालीं राष्ट्रीय पुनरुज्जीवन होत असतां, चीनमध्यें कसल्या घडामोडी होत होत्या ? रोमचा उदय नि नाश यांची चीनला फारच थोडी झळ लागली. दोहोंमध्यें फारच अंतर होतं; पण मी तुला सांगितलंच आहे कीं, चिनी सरकार, मध्य आशियांतील टोळ्यांना जें पिटाळून देई, त्याचा युरोप व हिंदुस्थान यांच्या दृष्टीनं घातुक परिणाम होई. या टोळ्या किंवा ज्यांना त्यांनीं पुढें रेटलं त्यांनीं, दक्षिणपश्चिमेकडे मोर्चा वळवून तेथील राज्यं उलथून पाडलीं; गोंधळ माजविला. यापैकीं पुष्कळजण पुढें पूर्व युरोप व हिंदुस्थानांत स्थायिक झाले.

अर्थात, यावेळीं रोम व चीनमध्यें संघर्ष असून, दोघांच्याही एकमेकांकडे वकिलाती असत. चिनी ग्रंथाप्रमाणं, अगदीं आरंभीच्या वकिलाती, सन १६६ मध्यें, रोमचा बादशहा आनटून यानं पाठविल्या होत्या असं दिसतं. हा आन–टून म्हणजे दुसरा कोणी नसून, मी मागच्या माझ्या एका पत्रांत ज्याचा उल्लेख केलेला आहे, तो मार्कस ऑरेलियस् ॲन्टॉनिनस हा होय.

यूरोपमधील रोमचं पतन म्हणजे उल्कापातच होय. ते केवळ एका शहराचं किंवा एका साम्राज्याचं पतन नव्हतं. एका अर्थी, पुढें कित्येक

वर्षे रोमन साम्राज्य कॉन्स्टॅन्टीनोपल येथें अस्तित्वांत होत आणि या साम्राज्याच्या पिशाच्याची छाया युरोपवर पुढं १४०० वर्षेपर्यंत पडली होती. पण रोमचं पतन म्हणजे, एका महत्वाच्या कारकिर्दीची—प्राचीन ग्रीस व रोम जगताची—समाधी होती. रोमच्या थडग्यावर एक नवीन जग, नवीन संस्कृती व नवीन सुधारणा उदयास येत होती. शब्द व वाक्प्रचार यामुळं पुष्कळ वेळां आपली दिशाभूल होते. तेच तेच शब्द यामुळं आपल्याला असं वाटतं कीं, त्यांचा अर्थ एकच असावा. रोमच्या पतनानंतरही, पश्चिम युरोप, रोमच्या भाषेंत बोले; पण त्यापाठीमागें निराळ्या—कल्पना, निराळा अर्थ होता. लोक म्हणतात, आजचीं युरोपियन राष्ट्रं ग्रीस व रोमचीं अपत्यें होत. कांहींसं हें खरं असलं तरी, एकंदरींत, सदर विधान दिशाभूल करणारं आहे. सध्यांची युरोपियन राष्ट्रं ग्रीस—रोमपेक्षां कांहींतरी अगदीं वेगळ्या भूमिकेवर उभारलेलीं आहेत. रोम—ग्रीसचं प्राचीन जग जवळ जवळ ढासळलेलं आहे. हजारों वर्षांपेक्षांही अधिक काळ जिची जोपासना केली गेली, अशी ही संस्कृती—तिच्या ठिकऱ्या उडाल्या; तिचा ऱ्हास झाला. याच सुमारास पश्चिम युरोपांतील अर्धवट सुधारलेलं, थोडेफार आडदांड देश, इतिहासांत प्रकट होऊं लागले व हळुहळू त्यांनीं नवीन संस्कृती व सुधारणांची उभारणी केली. रोमपासून ते बरेच शिकले. प्राचीन जगापासूनही त्यांनीं उसनवारी केली; पण एकंदरींत शिकण्याची ही गति खडतर नि कंटाळवाणी होती. शेकडों वर्षेपर्यंत संस्कृती व सुधारणा, युरोपांत झोपीं गेल्या आहेत कीं काय असं वाटे. जिकडे तिकडे अज्ञानांधःकार नि दुराग्रह. या काळाला तमोयुग म्हणतात.

हें असं कां ? जगाची पिच्छेहाट कां व्हावी ? शेकडों वर्षें परिश्रमानं केलेला ज्ञानसंचय नाहींसा व्हावा अगर विसरून कां जावा ? आपल्यापैकीं अत्यंत शहाण्या माणसांनाही भेडसावणारे मोठे प्रश्न हे ! मी त्यांचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न करीत नाहीं. हिंदुस्थानसारख्या विचारानं व संस्कृतीनं भरून असा देशाची इतकी शोचनीय स्थिती व्हावी, अनेक वर्षें तो गुलाम राहावा, हें चमत्कारिक नाहीं कां ? चीनभागें इतका उज्वल भूतकाल असतांना तें अनिरुद्ध लढायांना बळी पडावं ? युगांयुगांतून मनुष्य जें ज्ञान नि शहाणपण कणशः संचित करतो, तें नाहींसं होणं संभवनीय नाहीं; पण कसं कां होईना, आपल्या डोळ्यावर पटल येऊन, आपल्याला कधींकधीं दिसेनासं होतं. खिडकी बंद केली कीं, अंधार होतो; पण बाहेर व सभोंवार प्रकाश असतो. आपण डोळे झांकले किंवा खिडकी बंद केली कीं त्याचा अर्थ असा नव्हे कीं, सारा प्रकाश नाहींसा झाला आहे.

कांहीं लोक म्हणतात, युरोपांत तमोयुग आलं तें खिश्चन धर्मामुळं. हा धर्म म्हणजे जीजसचा खिश्चन धर्म नव्हे, तर कॉन्स्टन्टाईन या रोमन बादशहानं स्वीकार केल्यानंतर, पाश्चिमात्य देशांत जो प्रचलित होता, तो अधिकृत खिश्चन धर्म. या लोकांच्या मतें, चवथ्या शतकांत, कॉन्स्टन्टाईननं खिश्चन धर्माचा स्वीकार केल्यामुळें, इतिहासांतील एका नवीन युगाला प्रारंभ झाला व या काळांत, " बुद्धिप्रामाण्याला बांधून टाकण्यांत आलं, विचाराला गुलाम करण्यांत आलं आणि ज्ञानाची प्रगति खुंटली." छळवाद, हटवादीपणा नि असहिष्णुता, या गोष्टी बोकाळल्या; एवढंच नव्हे तर, लोकांना शास्त्रीय—विज्ञान आदिकरून बहुतेक बाबतींत प्रगति

करणं कठीण झालं. धर्मग्रंथ, बरेचवेळा प्रगतीच्या मार्गात धोंड उत्पन्न करतात. ज्या काळीं हे धर्मग्रंथ लिहिले गेले त्यावेळीं जग कसं होतं याची माहिती त्यांत मिळते, तत्कालीन कल्पना व चालीरीती त्यांत निवेदन केलेल्या असतात आणि त्या कल्पना नि चालिरीती, 'धर्म' ग्रंथांत लिहिलेल्या असतात म्हणून, त्या विरुद्ध ब्र काढण्याची कोणाची छाती होत नाहीं. जग कितीही बदललेलं असो, बदललेल्या परिस्थितीला योग्य ठरतील अशा रीतीनं आपल्या कल्पना नि चालिरीती बदलण्याची आपल्याला मोकळीक नसते. याचा परिणाम म्हणजे, आपण कालमानानं अपात्र बनतो आणि मग अर्थातच दुष्परिणाम ओढवतात.

युरोपांत तमोयुग आणल्याबद्दल कांहीं लोक ख्रिश्चन धर्माला दोष देतात; याच्या उलट इतर कांहींचं असं म्हणणं आहे कीं, या तमोयुगात, ज्ञानाची ज्योत तेवत ठेवण्याचं काम ख्रिश्चनधर्म व ख्रिश्चन धर्मगुरूंनींच केलं आहे. कला व चित्रकला यांची त्यांनीं जोपासना केली व मौल्यवान ग्रंथ जतन करून, त्यांच्या नकला काढून ठेवल्या.

लोकांमधील मतभेदांचं स्वरूप असं आहे. कदाचित् दोन्ही पक्षांचं म्हणणं बरोबर असावं. पण रोमच्या अधःपातामागोमाग ज्या अनिष्ट गोष्टी आल्या, त्याला ख्रिश्चनधर्म जबाबदार होता, असं विधान करणं हास्यास्पद आहे. वस्तुतः याच अनिष्ट गोष्टींमुळं रोमचा अधःपात झाला.

मी फारच वाहवलो. मला तुझ्या निदर्शनास हें आणायचं आहे कीं, युरोपांत आकस्मिक असा सामाजिक पात व परिवर्तन झालं; पण चीन, इतकंच नव्हे तर हिंदुस्थानांत तसं कांहीं आकस्मिक स्थित्यंतर घडून आलं नाहीं. युरोपमध्ये, एक संस्कृती संपुष्टांत येऊन, दुसरीचा प्रारंभकाळ

सुरू झाला. या दुसऱ्या संस्कृतीचाच पुढं हळुं हळूं विकास होत जाऊन, तिला आजचं स्वरूप आल. या उलट चीनमध्यें, उच्चतम संस्कृती व सुधारणा, खंड न पडतां चालूं राहिल्याच दिसतं. चढउतार हे असायचेच. चांगल्या कारकिर्दी नि वाईट राजे-महाराजे येतात नि जातात, घराणीं बदलतात, पण सांस्कृतिक वारसा भंग पावत नाहीं. चीनचे तुकडे पडून, अनेक राज्यें झालीं, परस्थांत तेढ आली, पण याही स्थितींत, कला व वाङ्मय उन्नत स्थितींत होत. मोहक चित्रें, नक्षीचीं सुंदर भांडीं व प्रेक्षणीय इमारती जिकडे तिकडे दिसत होत्या. तसंच मुद्रणकला प्रचारांत आली, चहापानाचा परिपाठ पडून, तो काव्याचा विषय बनून राहिला. चीनमध्यें अखंड अशी जी ढब व कलात्मकता दिसते, ती उच्च दर्जाच्या संस्कृतींतच शक्य आहे.

हीच गोष्ट हिंदुस्थानची. रोमप्रमाणें, येथेंही आकस्मिक खंड पडला नाहीं. अर्थात हिंदुस्थानांतही बरेवाईट दिवस येऊन गेले. रमणीय वाङ्मय व कलात्मक उत्पादन याबरोबर विध्वंस नि ऱ्हासाचा काळ झाला, पण संस्कृतीचा प्रवाह एका ठराविक मार्गानं वहातच होता. हिंदुस्थानांतून बाकीच्या पौर्वात्य देशांतही हा प्रवाह गेला नि ज्या रानटी टोळ्या लूटमार करायला आल्या होत्या, त्यांनाही या संस्कृतीनं आपल्यांत विलीन करून घेऊन शिक्षण दिलं.

पश्चिमेला गौण लेखून मी चीन—हिंदुस्थानची स्तुती करीत आहे, असं समजूं नकोस. हिंदुस्थान किंवा चीन यांच्या सद्यःकालीन परिस्थितींत अभिमान वाटण्याजोगं कांहीं नाहीं आणि पूर्वींचा मोठेपणा लक्षांत घेऊनही, राष्ट्रांच्या भरभराटीच्या दृष्टीनं, या दोन्ही देशांचं पारडं खालीं

गेलं आहे, हे एखाद्या आंधळ्यालासुद्धां दिसून येईल. त्यांच्या प्राचीन संस्कृतीच्या प्रवाहांत खंड पडला नसेल, पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यात शोचनीय असा बदल झाला नाहीं. पूर्वीं आपण वर असूं, तर आज खालीं गेलो आहोंत; याचा अर्थ आपला जगाच्या दृष्टीनं अधःपात झाला आहे, हें उघड आहे आपली संस्कृती अखंडपणे चालत आली, याचं कदाचित आपल्याला समाधान वाटत असेल, पण जिथं मुळीं संस्कृतीच्याच ठिकऱ्या उडाल्या आहेत, तिथं या समाधानाला काय महत्व? एका दृष्टीनं आपल्या प्राचीन संस्कृतींत आकस्मिक खंड पडला असता तर बरं झालं असतं असं वाटूं लागतं. त्यामुळें आपल्यात नवीन जोम व नवीन जीवन निर्माण झालं असतं. कदाचित सध्या हिंदुस्थानात व जगांत ज्या घडामोडी होत आहेत, त्यामुळे आपल्या या प्राचीन देशाला चालना मिळून, त्याला पुन्हा तारुण्य व नवीन जीवन मिळेलही.

भूतकाळातील, हिंदुस्थानचं सामर्थ्य नि ते टिकविण्याची शक्ती हीं येथील ग्रामीणपद्धत किंवा स्वयंशासित पंचायतींत होती. आजच्याप्रमाण त्यावेळीं बडे वतनदार किंवा बडे जमिनदार नव्हते. जमीन ही, ग्राम-समाज किंवा पंचायत अथवा जमिनीवर राबणाऱ्या रयतेच्या मालकीची असे; आणि या पंचायतींना बरीच सत्ता नि अधिकार असत. ग्रामवासीय पंचांची निवड करीत व अशारीतीनं या पद्धतींत एक प्रकारची लोकशाही होती. राजे आले नि गेले. ते एकमेकांशीं झगडलेही, पण त्यांनीं ग्रामीण-पद्धतींत ढवळाढवळ केली नाहीं कीं, पंचायतीचं स्वातंत्र्य हिरावून घेतलं नाहीं. सहाजिकच साम्राज्ये बदलत असतां ग्रामीणपद्धतीवर उभारलेली समाजव्यवस्था, फारसं मोठं स्थित्यंतर न होतां चालूंच राहिली. स्वाऱ्या व लढाया यांची हकीगत, राज्यकर्त्यांचा बदल यामुळें, आपला बरेच वेळां गैरसमज होतो. व त्यांचा संसर्ग सर्व जनतेला लागला असावा

असं वाटतं. अर्थात जनतेला, विशेषतः उत्तर हिंदुस्थानांतील लोकांना त्यांची कधीं कधीं झळ लागे. पण एकंदरीत त्यांना त्रास असा फार थोडा झाला. वर स्थित्यंतरें होत असतांही ग्रामवासियांची दैनंदिनी पूर्ववत् चालूच होती.

हिंदुस्थानांतील समाजपध्दतीला बळकटी येण्याचं आणखी एक कारण म्हणजे येथील मूळची जातीय पद्धत. नंतरच्या काळाप्रमाणें, जातीय पध्दत यावेळीं कडक नव्हती किंवा ती फक्त जन्मावर अवलबून नव्हती. तीमुळें हिंदुस्थानातील जीवनपध्दती हजारों वर्षे टिकली आणि त्याला कारण फक्त एकच व ते म्हणजे प्रतिबध न करता जातीयपध्दतीनं स्थित्यंतर किंवा विकास होऊं दिला. धर्म नि जीवनाच्या बाबतींत, प्राचीन हिंदी दृष्टीकोन नेहमीच सहिष्णु, प्रयोगात्मक नि स्थित्यंतराला अनुकूल असे. बळकटीचं कारण झालं तरी तेंच आहे. हळू हळू, वारंवार होणाऱ्या स्वाऱ्या, इतर अडचणींमुळें जातीयपध्दत कडक झाला व त्याबरोबरच सारा हिंदी दृष्टीकोन ताठर नि निग्रही बनला. या प्रवृत्तींचं पर्यवसान म्हणजे, हिंदी लोकांना, सध्यांची शोचनीय परिस्थिती येऊन, जातीय पध्दत म्हणजे प्रगतीची वैरीण बनली. सामाजिक संघटना शाबूत राखण्याऐवजीं, या पध्दतीनं, शेकडोभेद निर्माण करून, आम्हाला दुबल करून टाकलं; भावाविरुध्द भाऊ लढूं लागले.

गत काळांत, हिंदी समाजपद्धतीला बळकटी आणण्याला जातीची मदत झाली. पण त्या वेळींही तींत ऱ्हासाची बीजें होतीं. असमता नि अन्याय स्थायी करण्यावरच जातीय पद्धतीची उभारणी असल्यामुळें, ती परिणामीं निष्फळ ठरणं अपरिहार्यच होतं. असमता, अन्याय नि एका वर्गाची अथवा समाजाची दुसऱ्याकडून पिळवणूक यावर

भक्कम अथवा टिकावू समाज उभारणं शक्य नाहीं. आणि आज अशीच अयोग्य पिळवणूक चालू असल्यामुळें, सर्व जगभर इतक्या हाल आपेष्टा नि दुःखं दिसतात. लोकांना आतां त्याची जाणीव होऊन, त्यांतून मुक्त होण्यासाठीं ते धडपडत आहेत, ही गोष्ट निराळी.

हिंदुस्थानप्रमाणें चीनमधील सामाजिक पद्धतीची बळकटी, खेडीं-पाडीं नि स्वतःच्या मालकीच्या जमिनी मशागत करणाऱ्या लाखों शेतकऱ्यां-वर अधिष्ठित होती. तेथेंही मोठें जमिनदार नव्हते. धर्माला कट्टर किंवा असहिष्णु बनण्याला कधींच वाव मिळाला नाहीं. जगातील सर्व लोकांत, धर्मदृष्टया चिनी लोकच, किमान धर्मवेडे होते व अद्यापही आहेत.

या शिवाय हिंदुस्थान व चीन या दोन्ही देशांत, ग्रीस—रोम किंवा त्याही पूर्वीच्या इजिप्त प्रमाणे श्रमजीवी गुलामगिरी नव्हती. घरगुती कामांकरितां, नोकर चाकर किंवा गुलाम असत. पण त्यामुळें, सामाजिक व्यवस्थेवर फारसा परिणाम झाला नाहीं. व त्यांच्या अभावींही ही व्यवस्था ठराविक मार्गे चालू राहिली असती. प्राचीन ग्रीस किंवा रोम यांची गोष्ट निराळी होती. सामाजिक व्यवस्थेचे अपरिहार्य घटक म्हणून तेथें गुलामांची मोठी संख्या असून, कामाचा खरा बोजा त्यांच्यावरच पडे. आणि इजिप्त-मध्यें गुलाम राबले नसते तर तेथील भव्य पिरामिड्स् कोठून दिसलीं असतीं ?

चीन पासून, मी या पत्राला सुरवात केली व चीनची हकीगत पुढें चालू करण्याचा माझा विचार होता. पण मी दुसऱ्या विषयांत वाहावत गेलो. अर्थात माझ्या बाबतींत हें कांहीं विलक्षण नाहीं ! कदाचित् पुढील खेपेस आपण चीनचाच विचार करूं.

---

४२

# तांग बादशहांच्या अंमलाखालील चीन

ता. ७ मे, १९३२

चीनमधील हन घराणं, बौध्द धर्माचा प्रवेश, मुद्रण कलेचा शोध आणि सार्वजनिक अधिकारी नेमण्याकरितां सुरू करण्यांत आलेली परीक्षा-पध्दत, याविषयीं, मी तुला सांगितलंच आहे. इसवीसनाच्या तिसऱ्या शतकांत, हन घराण्याचा शेवट होऊन, चिनी साम्राज्याचीं तीन शकलें पडलीं. त्रिराष्ट्र विभागणीचा हा काल कित्येक शतकांपर्यंत टिकला. शेवटीं तांग नांवाच्या एका नवीन राजवंशानं, चीनचं पुन्हां एकीकरण करून, ७ व्या शतकाच्या प्रारंभी प्रबळ असं अखंड राष्ट्र निर्माण केलं.

पण या विभागणी कालांतही व त्याचप्रमाणें उत्तरेकडून तार्तरांच्या स्वाऱ्या होत असतांही चिनी संस्कृती नि कलेचा अनिर्बंध प्रवाह चालूच होता. या कालातील मोठमोठीं ग्रंथालयें व रमणीय चित्रकलेची माहिती उपलब्ध झाली आहे. हिंदुस्थानांतून जाणाऱ्या सुंदर कापडाबरोबरच हिंदी तत्वज्ञान, धर्म नि कलेचाही तेथें प्रसार होऊं लागला. हिंदुस्थानांतून चीनमध्यें जे अनेक बौध्द भिक्षू गेले, त्यांनीं आपल्याबरोबर हिंदी कला-परंपरा नेली. तसंच यावेळीं बरेच हिंदी कलावंत व कारागीरही तिकडे गेले असण्याचा संभव आहे. बौध्दधर्म व हिंदुस्थानांतील नवविचारसरणीचं आगमन यांचा चीनवर मोठाच परिणाम झाला. खुद्द चीन हा अतिशय सुसंस्कृत देश होता. हिंदुस्थानांतील धर्म, तत्वज्ञान व कला यांनीं

चीनमध्यें प्रवेश केला, म्हणजे कांहीं मागासलेल्या देशांत प्रवेश करून त्यावर छाप बसविली असं नव्हे. चीनच्या स्वतःच्या प्राचीन कला-तत्वज्ञानांत हा नवीन हिंदीप्रवाह येऊन मिसळला व दोहोंचा मिलाफ होऊन दोहोंपेक्षां कांहींशा निराळ्याच गोष्टीची निर्मिती झाली. या निर्मितींत काहीसा हिंदी भाग असला तरी ती मूलतः चिनी असून तिला चिनी स्वरूप प्राप्त झालेलं होतं. अशा रीतीनं, हिंदुस्थानांतून वहात आलेल्या विचार प्रवाहामुळें चीनच्या कलात्मक व चिंतनात्मक जीवन-क्रमाला चालना व उसळी मिळाली.

याचप्रमाणें, आणखी पूर्वेकडे कोरिया जपान या देशांत बौध्दधर्म व हिंदीकला यांचा प्रवेश होऊन तेथें त्यांची कशी छाप पडली, हें पहाणंही उद्बोधक आहे. मात्र प्रत्येक देशानं, आपल्या विशिष्ट कल्पनेला जुळतील, अशा रीतींनं या गोष्टींचा स्वीकार केला. बौध्दधर्म आज,चीन व जपान या दोन्ही देशांत रूढ आहे, पण या प्रत्येक देशांत त्यानं वेग-वेगळें स्वरूप धारण केलें आहे व दोन्हींचं कदाचित् हिंदुस्थानांतून बाहेर गेलेल्या बौध्द धर्मांशीं पुष्कळ बाबतींत साम्य नसावं. बदललेलं वातावरण नि लोक या बरोबर कला बदलते, तींत फरक पडतो. हिंदुस्थानांत, सध्यां आपल्याला कला व सौंदर्याची विस्मृती पडलेली आहे. गेल्या बऱ्याच शतकांत आपण नितांत रमणीय अशी कोणतीही कृति निर्माण केली नाहींच, पण आपल्यापैकीं बहुतेकांना सौंदर्याबद्दल रसिकता कशी व्यक्त करावी याचाही विसर पडला आहे. जो देश स्वतंत्र नाही, त्या देशांत सौंदर्य व कला यांचा विकास कसा व्हावा ? गुलाम-गिरीचा काळोख व निर्बंध यामुळे त्याचा ऱ्हास होतो; पण आतां स्वातं-

त्याचा साक्षात्कार आपल्याला होत असल्यामुळं आपल्यांतील सौंदर्य-संवेदना हळुहळू जागृत होऊं लागली आहे. ज्या दिवशी आपल्याला स्वातंत्र्य मिळेल, त्या दिवशीं तुला कला व सौंदर्याचं प्रभावशाली पुनरुज्जीवन होऊन घरेंदारें नि देश यामधून विरूपतेचं उच्चाटन झालं असल्याचं दिसून येईल. चीन व जपान, हिंदुस्थानपेक्षां अधिक सुदैवी; त्यांच्यांत अद्यापही कितीतरी प्रमाणांत सौंदर्य संवेदना व कलात्मकता आढळून येते.

चीनमधील बौद्धधर्माच्या प्रसारामुळें, हिंदी बौद्ध भिक्षू तिकडे जाऊं लागले. या उलट चिनी भिक्षूही हिंदुस्थान व इतरत्र प्रवास करूं लागले. मी तुला फा–हिएनबद्दल सांगितलंच आहे व तुला हुयएन शँगचीही माहिती आहे. दोघेही हिंदुस्थानांत आले होते. याशिवाय, हुईशेंग नांवाच्या एका चिनी भिक्षूनं, पौर्वात्य महासागरांतून केलेल्या प्रवासाचीही उद्बोधक माहिती मिळते. सन ४९९ मध्यें चीनच्या राजधानींत आल्यासमयीं, आपण चीनच्या पूर्वेकडील हजारों मैल दूर असलेल्या देशाला भेट दिल्याचं तो सांगत असे. या देशाला तो फुसांग म्हणे. पूर्व चीन व जपान यामध्यें असलेला पॅसिफिक महासागर, हुईशेंगनं उल्लंघिला असल्याचा संभव आहे. कदाचित् त्यानं मेक्सिकोलाही भेट दिली असावी. मेक्सिकोंत, या वेळीं प्राचीन अशी संस्कृती अस्तित्वांत होती.

चीनमधील बौध्दधर्माच्या प्रसारामुळें एका हिंदी बौध्दधर्मीय नेत्याचं वा महाजनाचं तिकडे लक्ष वेधलं. त्याचं नांव [ किंवा पद ] बोधीधर्म असं असून, दक्षिण हिंदुस्थानांतून, तो चीनमधील कँटन येथें सन ५२६ मध्यें गेला. हिंदुस्थानांत बौध्दधर्माचा जो हळुहळू ऱ्हास होऊं लागला होता, त्यामुळेंही त्याला तिकडे जावसं वाटलं असावं. प्रयाणसमयीं तो

म्हातारा झाला होता. त्यांचं अनुकरण करून त्याच्याबरोबर व नंतरही अनेक बौध्द भिक्षु चीनला गेले. असं म्हणतात कीं, चीनच्या लो-यांग या एकाच प्रांतांत त्यावेळीं, कमींतकमीं ३००० हिंदी भिक्षू व १०००० हिंदी कुटुंबे होतीं.

लवकरच, हिंदुस्थानांत बौध्दधर्माच्या पुनरुज्जीवनाचा आणखी एक काळ येऊन गेला. बुध्दाची जन्मभूमि व त्याच्या पवित्र साहित्याचं स्थान यामुळें, हिंदुस्थानाकडे धार्मिक वृत्तीचे बौध्दधर्मीय आकृष्ट होऊन येत; पण एकंदरींत हिंदुस्थानांतलि बौध्दधर्माचा वैभवकाळ अस्तंगत होऊन चीन हाच आतां बौद्धधर्मीय असा प्रमुख देश बनला होता.

तांग घराण्याला सन ६१८मध्ये, बादशहा काओत्सूपासून सुरवात झाली. त्यानं चीनचं फक्त एकीकरणच घडवून आणलं नाहीं, तर दक्षिणेकडील अन्नाम व कंबोडियापासून, पश्चिमेकडे थेट इराण व कास्पीयन समुद्रापर्यंतच्या अवाढव्य प्रदेशावर आपली सत्ता प्रस्थापित केली. या बलाढ्य साम्राज्यांत कोरियाचाही कांहीं भाग समाविष्ट होई. साम्राज्याची राजधानीं सी–आन–फू ही असून तीं पूर्व आशियांत वैभव नि संस्कृती याबद्दल नामख्यात होती. जपान व यावेळपावेतों स्वतंत्र असलेल्या दक्षिण कोरियामधून, तेथें कला, तत्वज्ञान व सुधारणाचा अभ्यास करण्याकरितां शिष्टमंडळें नि प्रतिनिधी येत.

तांग घराण्यांतील राजे परदेशीय व्यापार व परकीय प्रवाशयांना उत्तेजन देत. चीनमध्यें स्थानिक झालेल्या किंवा आलेल्या परकीय लोकांकरितां खास कायदे करण्यांत आले होते. एवढ्याच करितां कीं, शक्य तेथें या कायद्याप्रमाणें त्यांच्या विवक्षीत चालीरीतींना अनुसरून त्यांची चौकशी

व्हावी. विशेषत: सन ३०० च्या सुमारास, अरबलोक दक्षिण चीनमध्यें कँटन जवळ स्थायिक झाल्याचं आढळून येतं. इस्लामचं आगमन किंवा महमंद पैगंबराच्या जन्मापूर्वींची ही गोष्ट. या अरबांच्या मदतीनं समुद्रावरील व्यापाराची वाढ करण्यांत आली. चीनमधील व्यापार, अरब व त्याचप्रमाणं चिनी जहाजांतून चाले.

तुला आश्चर्य वाटेल, पण शिरगणती किंवा लोकसंख्या किती आहे हें जाणण्यासाठीं लोक मोजण्याची प्रथा—चीनमध्यें फार पुरातनकाळापासून चालू आहे. असं म्हणतात कीं, फार पूर्वीं म्हणजे सन १५६ मध्यें शिरगणती करण्यांत आली व ती हन कारकिर्दींत झाली असली पाहिजे. यावेळीं, व्यक्ती न मोजता कुटुंबं मोजण्यांत येत व प्रत्येक कुटुंबांत साधारणत: पांच माणसं आहेत, असं समजण्यांत येई. या अंदाजाप्रमाणें सन १५६ मध्यें चीनची लोकसंख्या पांचकोटी होती. अर्थात, ही फारशी बिनचूक पध्दत नव्हती; पण लक्षांत ठेव कीं पाश्चात्य देशांत, ही अगदींच नवीन प्रथा आहे. मला वाटतं, पाहिली शिरगणती अमेरिकेंमध्यें १५० वर्षांपूर्वीं झाली.

तांग घराण्याच्या आरंभीच्या काळांत, ख्रिश्चन व इस्लाम हे नवीन धर्म चीनमध्य दिसू लागले. ख्रिश्चन धर्म ज्या पंथानं आणला, तो पंथ पाखंडी समजण्यांत येवून, युरोपमधून त्याची हकालपट्टी झाली होती. त्यांना नेस्टोरियन म्हणत. थोड्या दिवसापूर्वीं मी तुला ख्रिश्चन पंथांतील भांडणतंट्याबद्दल लिहिलं आहेत. अशाच एका भांडणामुळें नेस्टोरियन पंथीयांची रोम मधून हकालपट्टी झाली. पुढें ते चीन, इराण आदिकरून आशियाच्या बऱ्याच भागांत पसरले. याशिवाय ते हिंदुस्थानतही आले व त्यांना येथें

थोडं बहुत यशही मिळालं. सध्यां मात्र इतर ख्रिश्चन पंथ व इस्लामी धर्मानं नेस्टोरियनाना गिळकृत केल्यामुळं, या पथाचा क्वचितच मागमूस दृष्टीस पडतो. गेल्यावर्षी, आपण दक्षिण हिंदुस्थानाला भेट दिल्यावेळीं, त्यांची तेथें एक वसाहत पाहून मला मोठच आश्चर्य वाटलं. त्यांच्या बिशपनं आपल्याला चहाला बोलाविल्याचं आठवतं कां तुला ? म्हातारा मोठा मजेदार प्राणी होता.

ख्रिश्चन धर्म चीनमध्यें फारच उशीरा पोहोंचला. इस्लामी धर्मानं तेथें केव्हांच प्रवेश केला होता. तसं पाहिलं तर, नेस्टोरिअन लोक येण्यापूर्वी आणि पैगंबराच्या हयातींतच, इस्लामी धर्म चीनमध्यें आला. चिनी बादशहानं, इस्लामी व ख्रिश्चन या दोन्ही धर्मांच्या प्रतिनिधींचं आदरपूर्वक स्वागत करून, त्याचं म्हणण ऐकून घेतलं. तसंच बादशहानं त्यांच्या मताबद्दल आदर व्यक्त करून, त्यांच्याबद्दल निःपक्षपाती वृत्ति ठेविली व अरबांना, कँटनमध्यें एक मशिद बांधण्यासही परवानगी मिळाली. ही मशीद तेराशें वर्षांपूर्वीची जुनी असूनही अद्याप अस्तित्वांत आहे व जगांतील अत्यंत जुन्या मशिदींत तिची गणना होते.

तसंच, तांग बादशहानं ख्रिश्चनांना एक चर्च व मठ बांधण्यास परवानगी दिली. ही सहिष्णुता व त्याच काळांतील युरोपांतील असहिष्णुता, यामधील फरक फारच ठळकपणें नजरेस येतो.

असं सांगण्यांत येतं कीं, अरब हें चिनी लोकांपासून कागद करण्याची कृती शिकले व नंतर त्यांनीं ती युरोपला शिकविली. सन ७५१ मध्यें मध्य आशियांतील तुर्कस्थानांत, चिनी व अरब यांच्यामध्यें लढाई होऊन अरबांनीं कित्येक चिनी लोकांना कैद केलं. याच कैद्यांनीं त्यांना कागद कसा करावा हें शिकविलं.

तांग घराण्याची कारकिर्द ३०० वर्षे—सन ९०७ पर्यंत टिकली काहीं लोकांच्या मतें, हा ३०० वर्षांचा काल म्हणजे चीनमधील अत्युत्कृष्ट काळ असून यावेळीं तेथें उच्च संस्कृतीचा प्रकर्ष झाला होता एवढंच नव्हे तर, लोकांच्या सर्वसाधारण सौख्यांतही बरीच भर पडली होती. ज्या गोष्टी पाश्चात्यांना पुढें कळल्या त्या चिनीलोकांना त्यावेळीं ज्ञात होत्या. कागदाचा उल्लेख मी केलाच आहे दुसरी गोष्ट म्हणजे बंदुकींची दारू. चीनलोक उत्तम एंजीनियर असून, सामान्यतः प्रत्येक बाबतींत, युरोपपेक्षा किती तरी पुढारलेले होते. अर्थात ते जर इतकें पुढें होते तर ते पुढेंच कां राहू शकले नाहींत व त्यांनीं शास्त्रीय विज्ञान नि संशोधन यांत युरोपचं अग्रेसरत्व कां घेतलं नाहीं ? युरोपनं त्यांना हळु हळू मागं टाकलं व प्रौढ माणसावर एकादा तरुण मात करतो त्या प्रमाणें, तो यूरोप निदान कांहीं बाबतींत तरी चीनच्या पुढें गेला. राष्ट्रांच्या इतिहासांत अशा गोष्टी कां घडतात हा बिकट प्रश्न—मोठमोठ्या तत्वज्ञानांही डोकें खाजविण्यास लावणारा आहे. तूं अद्याप तत्वज्ञ नसल्यामुळें या प्रश्नाबाबत डोक्याला शीण देण्याचं कारण नाहीं व मलाही त्याची गरज वाटत नाहीं.

या काळांतील चीनच्या मोठेपणाचा बराच प्रभाव बाकीच्या आशियावर पडला होता. आशिया कला व सुधारणा या बाबत, चीनच्या मार्गदर्शनाची अपेक्षा करी. गुप्त साम्राज्याच्या समाप्तीनंतर हिंदुस्थानचे ग्रह तितके उच्चीचे नव्हते. पण नेहमींप्रमाणें चीन मधील प्रगती व सुधारणांचे पर्यवसान अतिऐषआरामी व चैनी जीवनक्रमांत झाले. यानंतर राज्यांत लांचलुचपत सुरूं झाली व त्यामुळें जबर कर-बसविणं अपरिहार्य झालं आणि मग जनतेनं त्रासून जाऊन तांग कारकिर्द रसातळाला नेली.

---

४३

# कोरिया व जपान

ता. ८ मे १९३२

जसजसं आपण पुढें जाऊं, तसतसं अधिकाधीक देश आपल्या कक्षेत येतील. आतां आपण कोरिया व जपानकडे नजर टाकूं. हे दोन्ही देश चीनचे शेजारी असून, पुष्कळ बाबतींत ते चिनी संस्कृतीचीं अपत्यं होत. आशियाच्या सीमान्त—अतिपूर्वेकडे असलेल्या या देशापलीकडे अफाट पॅसिफिक महासागर आहे. अमेरिकाखंडाशीं अर्थात, अलीकडच्या काळापर्यंत दळणवळण नसल्यामुळें या देशांचा सर्व संबंध मुख्य भूप्रदेशा-वरील चीन या महान राष्ट्राशींच होता. चीनपासूनच व चीनद्वारेंच. त्यांना आपला धर्म, कला व सुधारणांचा लाभ झाला. कोरिया व जपान वरील चीनचं ऋण मोठं असून, हिंदुस्थानचेंही ते थोडेबहुत ऋणी आहेत; पण हिंदुस्थानपासून, त्यांना जी कांहीं प्राप्ती झाली, ती चीनच्या द्वारें व चिनी स्वरूपांत.

कोरिया व जपान या दोन्ही देशांची भौगोलिक रचना अशी आहे कीं, त्यांचा आशियांतील मोठमोठ्या घडामोडींशीं क्वचितच संबंध आला. मध्यवर्ति स्थानापासून हे देश फार दूर असल्यामुळें कांहीं मर्यादेपर्यंत हे दोन्ही देश विशेषतः जपान सुखी होतं, असंच म्हटलं पाहिजे. अशा स्थितींत आपण अगदीं अलिकडच्या काळापर्यंतच्या या देशाच्या इतिहासाकडे दुर्लक्ष केलं तरी फारशी अडचण भासणार नाहीं कीं, त्यामुळें बाकीच्या आशियांतील घडामोडी समजावून घेण्यांत व्यत्यय येणार नाहीं.

पण मलाशिया आदिकरून पौर्वात्य बेटांच्या इतिहासाकडं जसं आपण दुर्लक्ष केलं नाहीं, तसंच या देशांच्या इतिहासाकडे दुर्लक्ष करतां कामा नये. कोरिया—बिचारा चिमुकला देश—आज जवळजवळ विस्मृतीच्या पडद्याआड झाला आहे. जपाननं हा देश घशाखालीं घालून आपल्या साम्राज्यांत समाविष्ट केला असला तरी कोरियाला अद्यापही स्वातंत्र्याची स्वप्नं पडत असून स्वातंत्र्याकरितां तो झगडत आहे. जपान आज खूप गाजत असून त्याच्या चीनवरील स्वाऱ्यांनीं वृत्तपत्रे भरलेलीं असतात. मी तुला हें पत्र लिहीत असतांना मांचुरियांत युद्ध चालू आहे. म्हणूनच कोरिया व जपान यांच्या गतकालाविषयीं थोडीफार माहिती घेतली तर त्यामुळें सद्यःस्थितीचा उलगडा होण्यास खास मदत होईल.

पहिली लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट म्हणजे या दोन्ही देशांची दीर्घकालीन विभक्तता. वस्तुतः विभक्तता नि अनाक्रमण्यता या बाबतींत जपाननं अद्वितीय विक्रम केला आहे. इतिहासाच्या सर्व काळांत, जपानवर स्वारी करण्याचे फारच थोडे प्रयत्न झाले व झालेले प्रयत्नही अयशस्वी ठरले. अगदीं अलिकडच्या काळापर्यंतच्या जपानच्या सर्व भानगडी अंतस्थ स्वरुपाच्या होत्या. कांहीं काळापर्यंत तर जपाननं बाह्य जगाशीं असलेला संबंध पूर्णपणें तोडून टाकला होता. कोणत्याही जपानी गृहस्थाला बाहेर जाणं किंवा परकीय—चिनी माणसालासुद्धां जपानमध्यें येणं क्वचितच शक्य असे. परकीय युरोपियन लोक व ख्रिश्चन मिशनरी यांच्यापासून आपलं संरक्षण करण्याकरितां हा मार्ग अवलंबिण्यांत आला होता. जपानचं हें कृत्य घातकी व मूर्खपणाचं होतं. याचा अर्थ सर्व राष्ट्रालाच बंदीखान्यांत टाकून, बाह्य अशा प्रवृत्तीपासून—चांगल्या वा वाईट—त्यांना

पारख करण्यांत आलं आणि नंतर जपाननं आकस्मिकरीत्या सर्व दारें खिडक्या उघडल्या व युरोपपासून जें जें शिकण्यासारखं होतं, तें तें शिकण्याकरितां धाव घेतली. जपानन हें शिक्षण इतकं मनापासून घेतलं कीं एकदोन पिढ्यातच जपान बाह्यतः कोणत्याही युरोपियन राष्ट्रासारखा बनला व इतकंच नव्हे तर त्यानं त्यांचे सर्व दुर्गूणही उचलले! गेल्या सत्तर वर्षांच्या अवधितील जपानचा इतिहास असा आहे.

कोरियाच्या इतिहासाला चीननंतर पुष्कळ वर्षांनीं प्रारंभ झाला व जपानी इतिहासाला कोरियानंतर दीर्घकालानं सुरवात होते. गेल्या वर्षींच्या माझ्या एका पत्रांत मी तुला सांगितलंच आहे कीं, कि-त्सी नांवाच्या एका हद्दपरीत चिनी गृहस्थाला चीनमधील राजकीय परिवर्तन न आवडून त्यानं ५००० अनुयायांनिशीं पूर्वेकडे प्रयाण केलं. तो कोरियामध्यें स्थायिक झाला व त्यानं या देशाला "शांत प्रभात कालचा देश" असं नांव दिलं ही गोष्ट इसवी सनापूर्वी ११२२ मधील. कि-त्सीनं आपल्याबरोबर चिनी कला, हरहुन्नरी, शेतकी व रेशीम धंदा वगैरे गोष्टी आणल्या. जवळ जवळ ९०० वर्षे कि-त्सीच्या वंशजांनीं कोरियामध्य राज्य केलं. पुष्कळ देशांतर केलेले चिनी लोक कोरियांत येऊन स्थायिक होत असत व यामुळं चीनबरोबर कोरियाचा बराच संबंध चालू राहिला.

चीनमध्यें शीह-हुआंगती हा बादशहा असतां, चिनी लोकांची एक मोठी टोळी कोरियांत आली. या बादशहाची तुला कदाचित आठवण असेल. तो अशोकचा समकालीन होता. हाच आपल्याला "आदि बादशहा" ह्मणवी व यानंच सर्व ग्रंथ अग्नेयस्वाहा करायला लाविलें होतें. शीह हुआंगतीच्या जाचाला कंटाळून, ज्या चिनी लोकांनीं कोरियाचा

आश्रय घेतला. त्यांनींच पुढें किन्सीच्या दुबळ्या वंशजांचं उच्चाटन केलं. या प्रकारानंतर ८०० वर्षांपेक्षांही अधिक काल कोरियामध्यें अनेक राज्यें असून तीं आपसांत भांडत. या राज्यांपैकीं एकानं तर एकदां चीनचीही मदत मागितली होती—अंगशी येण्याजोगीच ही विनंती होती ! चीनहून मदत आली; पण तिनं परत जाण्याचं नाकारलं ! प्रबळ राष्ट्रांचं नेहमींच असं असतं. चीननं कोरिया न सोडतां, त्याचा कांहीं भाग चीनला जोडला. बाकीच्या कोरियानंही पुढे कित्येक शतकेपर्यंत चीनमधील तांग बादशहांचं सार्वभौमत्व मान्य केलं होतं.

सन ९३५ मध्यें कोरियाचं संघटीत असं स्वतंत्र राष्ट्र निर्माण झालं. वांग कीएननं हें कार्य यशस्वीरीत्या पार पाडलं व पुढं ४५० वर्षे-पर्यंत त्यांच्या वंशजानीं राज्य केलं.

दोन तीन परिच्छेदात मी तुला कोरियाचा २००० वर्षांचा इतिहास सांगितला. त्यातील लक्षांत घेण्याजोगी गोष्ट म्हणजे कोरियावरील चीनचं मोठं ऋण. चीनमधूनच कोरियात लेखनकला आली. हजार वर्षें-पर्यंत ते चिनी लिपी उपयोगांत आणित तुला आठवतच असेल कीं, चिनी लिपींत अक्षरें नसून कल्पना, शब्द, वाक्यें यांची प्रतीकें आहेत. पुढें या लिपीतूनच, त्यांनीं आपल्या भाषेला योग्य अशी विवक्षित मूळाक्षरें तयार केलीं.

बौद्धधर्म चीनमार्गे तर कॉन्फ्युसियन तत्वज्ञान खुद्द चीनमधून आलं. हिंदुस्थानातील कलात्मक प्रवृत्तीही चीनमधूनच कोरिया व जपानला जाऊन पोहोंचल्या. कोरियानं कलेच्या, विशेषत: शिल्पकलेच्या, रमणीय कृती निर्मिल्या आहेत. कोरियन वास्तुकलेचं चीनशीं साम्य आहे. जहाजं

बांधण्याच्या धंद्यांतही कोरियानं पुष्कळ प्रगति केली. एके काळीं तर कोरियाचं बलाढ्य आरमार असून, या आरमारानं जपानवरही स्वारी केली होती.

कदाचित् आजच्या जपान्यांचे पूर्वज कोरियांतील असावेत. कांहीं दक्षिणेकडून मलाशियामधून आले असावेत. तुला माहितच आहे कीं, जपानी लोक मंगोलियन वंशाचे होत. जपानमध्यें अद्यापही आईनूस नांवाचे लोक असून, ते जपानमधील मूळचे रहिवाशी समजले जातात. हे लोक वर्णानं गोरे व साधारणतः केसाळ असून, ते सर्व सामान्य जपानी लोकांपेक्षां अगदींच निराळे आहेत. या आईनूस लोकांना जपानी बेटांच्या उत्तरेकडील भागात पिटाळण्यांत आलं आहे.

इसवी सन २०० मध्यें यामाटो राज्याची सम्राज्ञी कोणी जिंगो नांवाची स्त्री असल्याचं आढळून येतं. यामाटो हें जपानचं मूळचं नांव असावं किंवा ज्या भागांत हे देशांतरीत लोक स्थायिक झाले, त्या भागाचं नांव असावं. या सम्राज्ञीचं जिंगो हें नांव लक्षांत ठेव अगदीं आरंभींच्या जपानच्या एका राज्यकर्त्या व्यक्तीचं हें नाव असावं, हा चमत्कारिक योगायोगच, "जिंगो" या शब्दाला इंग्लीशमध्यें एक ठाम अर्थ आहे. जिंगो म्हणजे बढाईखोर व आपलंच घोडं पुढं दामटणारा साम्राज्यवादी. आपण नुसतंच साम्राज्यवादी म्हणूं. कारण प्रत्येक साम्राज्यवादी व्यक्ती, बढाईखोर व आपलंच घोडं पुढं दामटणारी असते. जपानलाही हा जिंगोशाही अगर साम्राज्यशाहीचा रोग जडलेला आहे व अलिकडच्या काळांत, कोरिया व चीन या राष्ट्रांच्या बाबतींत जपाननं पुष्कळच दांडगाई

चालविली आहे. अशा स्थितींत जपानच्या पहिल्या ऐतिहासिक राज्यकर्त्या-व्यक्तीचं नांव जिंगो असावं हा चमत्कारीक योगायोगच.

यामाटोनं कोरियाशीं निकटचा संबंध ठेविला व कोरियाद्वारेंच चिनी संस्कृतीनं जपानमध्यें प्रवेश केला. तसंच चीनची लिखीत भाषाही कोरिया-मार्गेंच आली. तीच गोष्ट बौद्ध धर्माची सन ५५२ मध्यें पाकचेच्या राजानं (कोरियांतील तीन विभागापैकीं एक विभाग). यामाटोच्या राजाकडे बुद्धाची सुवर्ण मूर्ति व बौद्धधर्मोपदेशक धर्मग्रथ देऊन पाठविले.

शिंटो जपानचा जुना धर्म होता. शिंटो हा शद्ब चिनी असून, त्याचा अर्थ "देवाचे मार्ग" असा आहे. हा धर्म म्हणजे निसर्ग व पूर्वजांची पूजा यांचं मिश्रणच. भावी जीवनक्रम, गूढवाद किंवा प्रमेयें याबद्दल हा धर्म फारशी फिकीर करत नसे. शिंटो हा योद्धयांचा धर्म होता. जपानी लोक चिनी लोकाचे निकटवर्ति असून, संस्कृतीच्या बाबतींत त्यांच्यावर चिनी लोकाचं ऋणही आहे आणि तरीही चिनी लोकांत व त्यांच्यांत फार फरक आहे. चिनी लोक मूलतः शांततावादी होते व आहेत. त्यांची सर्व संस्कृती व जीवनाचं तत्वज्ञान शांततावादी आहे. या उलट जपानी लोक युयुत्सु होते व अद्यापही आहेत. सैनिकाचा मुख्य गूण म्हणजे आपला नेता व सहकाऱ्याविषयीं निष्ठा. जपानी लोकांत हा गूण असून, त्यांचं बरंचसं सामर्थ्य यावरच अवलंबून आहे. शिंटोनं याच गुणाची— 'देवाना माना व त्यांच्या वंशजाविषयीं निष्ठा दाखवा"— शिकवण दिली. आजही शिंटोपंथ जपानमध्यें बौद्धधर्माच्याबरोबरीनं अस्तित्वांत आहे. शिंटोची शिकवणूक खरोखरीच भूषणास्पद आहे कां? सहकाऱ्यांविषयीं व ध्येयाविषयीं एकनिष्ठ राहाणं, हा खरोखरीच गूण

आहे; पण शिंटो व त्याचप्रमाणे इतर धर्म, या निष्ठेचा उपयोग, आपल्या-वर राज्य करणाऱ्या एकाद्या विशिष्ट समूहाचा फायदा करून देण्याकडे करतात. सत्तेपुढे मस्तक लवविणं हीच गोष्ट धर्मांनीं जपान, रोम व इतरत्र शिकविली. असल्या शिकवणुकीमुळे आपला किती घात झाला आहे, हें तुला नंतर कळून येईल.

जपानांमध्यें आलला नवीन बौद्धधर्म व जुना शिंटोपंथ यामध्यें कांहींशी तेढही उद्भवली होती; पण लवकरच ते गुण्यागोविंदानं नांदू लागले व आजही नांदत आहेत. यापैकीं शिंटो अद्यापही अधिक लोक-प्रिय आहे आणि हा धर्म राज्यकर्त्या वर्गाविषयीं आज्ञाधारकता व निष्ठा यांचं शिक्षण देत असल्यामुळं त्याला या वर्गाकडून उत्तेजन मिळतं. बौद्ध-धर्म हा अशा लोकांच्या दृष्टीनं थोडासा घातकी धर्म आहे. कारण त्याचा प्रणेताच मुळीं बंडखोर होता.

जपानच्या कलात्मक इतिहासाला बौद्धधर्माबरोबरच प्रारंभ होतो. यावेळीं जपान किंवा यामाटोनं थेट चीनबरोबर संबंधास सुरवात केली. चीनमध्यें विशेषतः तांगवंशाच्या कारकिर्दींत वरचेवर शिष्टमंडळें जात व चीनची सी-आन्-फू ही नवी राजधानी सर्व पूर्व आशियांत प्रख्यांत होती. खुद्द जपान्यांनीं किंवा यामाटोच्या लोकांनीं नारा नांवाची नवी राजधानी बसवून तिच्या रचनेच्या बाबतींत सी-आन-फू-ची बरोबर नक्कल करण्याचा प्रयत्न केला. जपानी लोकांना नक्कल किंवा अनुकरण करण्याची आश्चर्यकारक कला नेहमींच अवगत असावी असं दिसतं.

जपानच्या सर्व इतिहासांत एक गोष्ट दिसून येते व ती ह्मणजे, बड्या घराण्यांतील परस्पर विरोध व सत्तेकरितां झगडा. इतरत्रही प्राचीन

काळीं हीच स्थिती असल्याचं आढळून येईल. या घराण्यांत जुन्या वांशीक कल्पना रूढ असत. अशा रीतीनं, जपानचा इतिहास म्हणजे मुख्यत्वेकरून निरनिराळ्या घराण्यांतील तेढींचीच हकिगत त्याचा बादशहा मिकॅडो ! हा सर्व सत्ताधीश, देवरूपी व सूर्यवंशीय समजला जातो शिंटो व पूर्वजपूजा, यामुळें लोक, बादशहाची मुखत्यारी मानूं लागले व देशांतील बलाढ्य लोकांशीं ते आज्ञाधारक बनले; पण जपानचा बादशहा बहुतेक नामधारी असून त्याला खरी सत्ता नाहीं. सर्व अधिकार एखाद्या मोठ्या घराण्याकडे किंवा वंशाकडे असून हे "राजे बनविणारे" आपल्या पसंतीप्रमाणं, राजे व सम्राट गादीवर आणीत.

राज्याचीं सूत्रें हातीं ठेवणारं सोगा हे इतिहासांतील पहिलं जपानी मोठं घराणं. या घराण्यानंच बौद्धधर्माचा स्वीकार केल्यामुळें बौद्ध हा दरबारी व अधिकृत धर्म होऊं शकला. या घराण्यांतील एक पुढारी शोतूकु ताईशी हा जपानच्या इतिहासांतील महान पुरुषांपैकीं एक समजला जातो. आपल्या सर्व कल्पना कॉन्फ्युसियसच्या चिनी साहित्यांतून घेऊन नैतिक अधिष्ठानावर—बळावर नव्हे—अनुशासन संस्थेची उभारणी करण्याचा त्यानं प्रयत्न केला. जपानमध्यें यावेळीं अनेक वंश होत त्यांचे सरदार बहुधां स्वतंत्र असून ते एकमेकांशी लढत व कोणाचीच सत्ता जुमानत नसत. बादशहाचं पद भपकेदार असलं तरी तोही एक सरदारच होता. ताईशीनं ही परिस्थिती बदलण्याचं व मध्यवर्ती सरकार प्रबळ करण्याचं कार्य हातीं घेतलं. त्यानं निरनिराळ्या सरदारांना व उमरावांना बादशहांचे मांडलीक किंवा दुय्यम बनविलं. ही गोष्ट सुमारें इ. स. ६०० मधील.

पण शांतूकू ताईशीच्या मृत्युनंतर, सोगाघराण्याची उचलबांगडी झाली. थोड्या काळानंतर जपानी इतिहासांतील आणखी एक विख्यात पुरुष उदयास आला. त्याचं नांव ककाटोमीनो कामाटोरी. राज्यव्यवस्थेत अनेक बदल घडवून आणून त्यानं चिनी पध्दतीचं अनुकरण करण्याचा प्रयत्न केला. एका बाबतींत मात्र त्यानं चीनचं अनुकरण केलं नाहीं व ती म्हणजे अधिकारी नेमण्याची वैशिष्ट्यपूर्ण चिनीपरीक्षा पद्धत. आतां बादशहाला केवळ सरदारापेक्षां कांहीतरी अधिक महत्व येऊं लागलं होतं व मध्यवर्ति सरकारही प्रबळ बनत चाललं होतं.

याच कारकिर्दीत नारा हें राजधानीचं शहर होतं; पण तें अगदीं थोडावेळ. सन ७९४ मध्यें क्योटो ही राजधानी करण्यांत आली व सुमारें ११०० वर्षे तेंच राजधानीचं ठिकाण राहिलं. अगदीं अलिकडे मात्र त्या ऐवजीं टोकिओ येथें राजधानी हालविण्यांत आली. टोकिओ हें अद्यावत असं मोठं व भव्य शहर आहे; पण खरं जपान क्योटोंतच पहावयास मिळतं. जपानविषयींच्या गेल्या १००० वर्षांतील स्मृती या शहरामुळें डोळ्यापुढें उभ्या राहतात.

ककाटोमीनो कामाटोरी हा फुजीवारा घराण्याचा संस्थापक असून, या घराण्यानं पुढें जपानच्या इतिहासांत महत्वाची भूमिका बजाविली. ३०० वर्षेपर्यंत त्यांनीं कारभार केला. बादशहांना नुसती बाहुली करून त्यांना ते आपल्या घराण्यांतील स्त्रियांशींच विवाह करायला लावीत. बाकीच्या घराण्यांतील ज्या कर्तबगार पुरुषांची त्यांना भीति वाटे, त्यांना धर्ममठांत जायला भाग पाडण्यांत येई.

नारा हें राजधानीचं ठिकाण असतांना, चिनी बादशहानं जपानी बादशहाकडे एक संदेश पाठविला. या संदेशांत जपानी बादशहाचा ताई—न्यीह—पुंग कोक किंवा "महान सूर्योदय राज्याचा बादशहा" असा उल्लेख करण्यांत आला होता. जपानी लोकांना हें नांव आवडलं. यामाटो-पेक्षांही तें त्यांना गोड वाटलं. त्यांनीं आपल्या देशाला "दाई निप्पोन"—"उगवत्या सूर्याचा देश"—ह्मणावयास सुरवात केली व जपानला ते अद्याप याच नांवानं संबोधतात. जपान हें नांव निप्पोनपासून चमत्कारिक-रीत्या आलं. पुढें सहाशें वर्षांनंतर मार्को पोलो नांवाच्या एका महान इटालियन प्रवाशानं चीनला भेट दिली. तो जपानला कधींच गेला नव्हता. पण आपल्या प्रवासवर्णनांत त्यानं जपानविषयीं लिहून ठेविलं आहे. त्यानं न्यीह—पुंग—कोक हें नांव ऐकलं होतं. आपल्या पुस्तकांत त्यानं या नांवाबाच "चिपँगो" करून टाकलं व चिपँगोवरून जपान हा शब्द आला.

आपल्या देशाला इंडिया व हिंदुस्थान हीं नांवें कशीं मिळालीं, याबद्दल मी तुला मागं सांगितलंच आहे! हीं दोन्ही नांवं इंडस व सिंधू नदीवरून आलीं व अशारीतीनं सिंधू ही हिंदुस्थानची एकमेव नदी बनली. सिंधूवरूनच ग्रीक लोक आपल्या देशाला इंडोस ह्मणूं लागले व त्यावरूनच पुढें इंडिया हें नांव आलं. तसंच सिंधूपासून इराण्यांना हिंदू हा शब्द मिळाला व त्यापासून हिंदुस्थान हें नांव आलं.